( दक्षिणा प्राइज कमेटीनें पहिलें बक्षीस दिलेलें. )

महासाधु.

# ॥ श्रीज्ञानदेवचरित्र. ॥

" सजयति चित्र चरित्रः श्री ज्ञानदेवः "
( ओंवी या मंगळी ॥ गाईन मी त्या-
सी ॥ अलंकापूर वासी ॥ज्ञानराज )



हें

वे. शा. सं. रा. रा. श्रीपति रघुनाथ
बोवा भिंगारकर

यांनीं केलें
तें

ग्रंथ प्रकाशकानीं त्यांचे परवानगीनें प्रसिद्ध केले

———o:o:o———

( हा ग्रंथ सन १८६७ चा आक्ट २५ प्रमाणें नोंदला आहे. )
सन १८८६ इ०

श्री. रा. रा. नामदार राव बहादुर.

# माधवराव गोविंद रानडे.

एम्. ए. एल्. एल्. बी.

मुंबई हायकोर्टाचे आडव्होकेट, पुणें स्मालकाज
कोर्टाचे जज्य, डेक्कन आग्रिकल्चरिस्टस् रिली-
फ आक्टा अन्वयें अक्टिंग स्पेशल जज्य
व हल्लीं गव्हर्नमेंट आफ इंडियानें नेमि-
लेल्या फायनान्सकमिटीचे मेंबर इ०इ०

यांस.

त्यांची थोर विद्वत्ता, व देशबांधवांच्या कल्याणाविष-
यीं परिश्रम इत्यादि गुणा प्रीत्यर्थ.

हा ग्रंथ

प्रकाशकानीं

परमादर पूर्वक व नम्रता पूर्वक

अर्पण केला

आहे.

# प्रस्तवना

ज्ञानदेवाचें उत्कृष्ट चरित्र लेखकांस ३०० रुपयाचें बक्षीस मिळेल ह्मणून सन १८८२ सालांत दक्षिणाप्राइज कमिटीनें जाहिरात प्रसिद्ध केली, त्याप्रमाणें कमिटीकडे चार ग्रंथ आले. त्यां चारींचें परीक्षण होऊन प्रस्तुत पुस्तकास पहिलें बक्षीस सन १८८४ सालांत मिळालें. या पुस्तकाचे कर्ते प्रसिद्ध वे० शा० सं० रा० श्रीपत रघुनाथबोवा भिंगारकर हे होत. यांची ज्ञानदेवाचे ठिकाणीं एकनिष्ठभक्ती असल्यामुळें यांनीं अश्रांतश्रमकरून ज्ञानेश्वराचें सर्व ग्रंथांचें अवलोकन करून इतर साह्यभूत ग्रंथ आदि, गीता, भागवत, मत्स्येंद्रसंहिता, भक्तिविजय, भक्तलीलामृत, भक्तिकथासार, संतमाला, आत्मपुराण इत्यादि अनेक ग्रंथांचें आलोडन केलें. व या महासाधूचें चरित्र लिहिण्याचें काम आंगावर घेऊन तें सुरस रीतिनें तडीस नेलें याजबद्दल त्यांची स्तुती करावी तितकीच थोडी होय.

या ग्रंथाचे एकंदर नऊ उल्लास (प्रकरणें) केले आहेत. (१) उल्लासांत ज्ञानदेवाच्या पूर्वजांचा वृत्तांत आहे. (२) यांत ज्ञानदेव आदिकरून बंधूंचेंबालपण व गुरूपदिष्टज्ञान ज्ञानदेवास कथन केलें आहे. (३) हा ज्ञानेश्वरकृत चमत्कारानें भरला आहे—मृतपितर जिवत करणें, रेड्याच्यामुखानें वेदबोलाविणें इत्यादि चमत्कार करून ज्ञानदेवादि मंडळीस पैठणस्थ ब्राह्मणाकडून शुद्धिपत्र मिळालें आहे. (४) यांत ज्ञानदेवानीं मशीद बोलविली आहे व चांगदेव साधूचा निर्जीवभिंत चालऊन गर्वपरिहार केला आहे (५) यांत ज्ञानदेव नामदेवादि संतमंडळींचें तीर्थाटन व मार्गांत अनेक चमत्कार करून लोकांचें मनांत पूज्यभाव उत्पन्न केला आहे. येथपर्यंत एकदंर चरित्राचा पूर्वभाग संपतो असें ह्मटल्यास हरकत नाहीं. (६) यांत निवृत्तीनें ज्ञानदेवास ब्रह्म, योग इत्यादि गहन विषयावर उपदेश केलेला प्रश्नोत्तर रूपानें ग्रथित केला आहे. (७) यांत ज्ञानेश्वरींतील उत्कृष्ट उतारे देउन व्याख्यान केलें आहे. (८) यांत अमृतानुभव, योगवासिष्ट, हरिपाठ, पासष्ठी इत्यादि ग्रंथांतील त्रोटक उतारे आहेत. (९) ह्या शेवटच्या उल्लासांत निवृत्ति ज्ञानदेवादि साधूंच्या समाधिस्थ

होण्याचें अति मनोरम वर्णन करून ग्रंथ समाप्त केला आहे. याशिवाय समाधीचे पूजे संबधीं पूर्वीची हकीकत व सनदा दिल्या आहेत.

येणेंप्रमाणें नऊ उल्लास हे ज्ञानदेवाच्या चारित्राची ओळख करून घेण्यास नऊ पायऱ्या होत. या चढून गेल्यावर वाचक कोणच्याही पंथाचा किंवा धर्माचा असो त्याचें अंतःकरणांत भिन्न वृत्तीचा ठसा उटल्याशिवाय राहणार नाहीं. हा ग्रंथ जुन्या पद्धतीच्या गृहस्थाकडून लिहिला गेल्या कारणानें याची भाषा आलीकडील सुधारलेल्या भाषेच्या नेमानें निबद्ध झालेली नाहीं. तरी हें पुस्तक वाचीत असतां मनांस उत्कंठा व आनंद झाल्यावाचून राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे.

एक महिन्यापूर्वी हें पुस्तक आमचे हातीं आलें. व तें तसेंच कांहीं दिवस ठेऊन हळूंहळूं चांगलें व जितकें शुद्ध करवेल तितकें करून नंतर छापावें असा आमचा मानस होता. परंतु ज्ञानोबा रायाचे भाविक भक्ताचा आग्रह पडला कीं कसें ही करून आम्हास कार्तिक वद्य ११ स ( ज्ञानदेवाच्या समाधीच्या सुमारास ) छापलेलें पुस्तक मिळेल असें करावें. व या श्रमाबद्दल आम्ही तुह्मास चांगला लोकाश्रय मिळवून देऊ, म्हणून भरंवसा दिला तव्हां हें जाखमीचें काम अंगावर घेण्याचा निश्चय केला. परंतु तत्वमर्सांचा पुरावा चांगला असल्याशिवाय काम छापून कसें निघेल या विचारांत होतो तों इतक्यांत चंद्रिका प्रेसचे मालकानीं माफक दरानें व दिलेल्या मुदतींत हें पुस्तक काढून देण्याचें अभिवचन दिलें. व आह्मांस लिहिण्यास आनंद वाटतो कीं यानीं आपले छापखानीं कारखान्यांत रात्रंदिवस झटून वेडीवांकडी ज्ञानोबारायाची सेवा मनोभावें केली असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

हे पुस्तक आमचे लोकप्रिय नामदार रावबाहादुर **माधवराव गोविंद रानडे** यांस नजर करण्याचा आह्मी आपला हेतु कळविला. व त्यांनीं उदार बुद्धीनें यास अनुमोदन दिलें याजबद्दल आम्ही यांचें फार उपकारी आहोत.

या पुस्तकांत घाईमुळें व परवशतेमुळें मुद्राचें चांगलें शोधन करण्यास सापडलें नाहीं, व त्यामुळें यांत बरीच अशुद्धें राहिली आहेत. व सुधारणा करण्यास व कठिण शद्बाचा कोश देण्यास झालें नाहीं, याबद्दल फार वाईट वाटतें परंतु ज्ञानेश्वराच्या कृपेनें थोड्या अवकाशांत आम्हांस चांगला लोकाश्रय मिळाला त्यावरून लौकरच पुनरावृत्ति काढ

ण्याचा सुदिन येईल असा अदमास आहे, तेव्हां या गोष्टीचा पूर्ण विचार केला जाईल. पृष्ठाच्या मानानें पुस्तकाची किम्मत खर्च भागण्यापुरतीच ठेविली आहे हें निराळें सांगणें नको.

सरते शेवटीं या पुस्तकाचे कर्ते श्रीपत रघुनाथ बोवा भिंगारकर यांचे व आमचे प्रियमित्र रा० रा० आबाजी रामचंद्र एकबोटे, विष्णु नारायण बुचके, व दत्तात्रय महादेव लिमये यांनीं हें पुस्तक छापून काढण्या संबंधीं जे अनवरत परिश्रम केले त्याजबद्दल आम्ही त्यांचे फार फार आभारी आहो, व आमची पक्की खात्री आहे कीं हें पुस्तक यांचे मदतीशिवाय इतक्या लौकर कधींच बाहेर पडलें नसतें.

पुणें, तारीख १८ माहे नोव्हेंबर सन १८८६ इसवी. — प्रकाशक.

# ॥ श्रीज्ञानदेवचरित्र. ॥

## ॥ प्रथमोल्लासः ॥

### ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

**॥ कलावज्ञ जीवोद्धरार्थावतारं । कलंकानभिज्ञ द्विजेंद्राननंतं ॥**
**खलानीश वादाप नोदार्ह दीक्षं । समाधिस्थ मूर्ति भजे ज्ञानदेवं ॥ १**

*पूर्वी, श्रीक्षेत्र **पैठणा**पासून पांच कोसांवर **आपेगांव** या नांवाच्या खेड्यांत **गोविंदपंत** कुळकर्णी यजुर्वेदी ब्राह्मण रहात असे. त्याची स्त्री **निराबाई** ही महासाध्वी असे, परंतु ता पोटीं संतान नसल्याकारणानें नित्य काळजी वाहत असे. त्यानीं पुत्र होण्यासाठीं **गंगातीरावर गायत्री** पुरश्चरणें करण्यास आरंभ केला. तीन पुरश्चरणें झाल्यानंतर एके दिवशीं रात्रौ निद्रिस्थ असतांना त्यास स्वप्न पडलें. त्यांत एक ब्राह्मण सूर्यासारिखा तेजस्वी व बृहस्पतीप्रमाणें वक्ता कपाळीं मुद्रांकित गोपीचंदन लावून व कंठीं तुलसी माळा घालून गायीस बरोबर घेऊन आला. त्यानें त्यास जागृत केलें, आणि ह्मणाला कीं, तूं पुरश्चरणें करून शरीरास इतकें दुःख कां देतास? तुझ्या मनांत काय इच्छा आहे ती सांग. असें वचन **गोविंदपंतानें** ऐकून भाषण केलें कीं माझ्या मनांत इतकेंच आहे कीं मला एक पुत्र जगविख्यात महासाधू—ज्याच्या योगानें पातकीलोकांचा उद्धार व्हावा व ज्याच्या दर्शनाची इच्छा इंद्रादिक देवांनींही करावी व ज्याचें नामस्मरण जनांनीं केलें असतां सर्व दोष मुक्त व्हावे,—असा एक पुत्र होण्यासाठीं मी

---

* ही कथा नामदेवकृत आदि या नांवाच्या ग्रंथांत, भक्तिविजयांत, भक्तितत्वामृतांत, व मत्स्येंद्रसंहितेंत, इत्यादि बहुत ग्रंथांत पुष्कळ संतांनीं वर्णन केली आहे.

गायत्री पुरश्चरणें करीत आहें. असें ऐकून स्वप्नांतील ब्राह्मण ह्मणाला कीं तुला एक वैराग्य संपन्न व तपस्वी पुत्र होईल व त्यापासून तीन पुत्र आणि एक कन्या अशी उत्पन्न होतील. ते महासाधू, व ज्ञानी, जग प्रसिद्ध होतील. त्याना सर्व लोक असें ह्मणतील कीं हे तीन पुरूष नव्हेत तर ब्रह्मा, विष्णू, आणि शंकर हे तीन देव जगाचा उद्धार करण्याकरितां मृत्युलोकीं आले कीं काय? अशी तुझी संतती होईल. आतां उद्यापासून पुरश्चरणें करून शरीरास दुःख देऊं नकोस. असें बोलून स्वप्नांतील ब्राह्मण गायीस घेऊन निघून जाता झाला व हा जागृत होऊन विचार करूं लागला कीं हें स्वप्न नव्हें तर हा ईश्वराचा प्रसादच झाला. आतां पुरश्चरणें करण्याचें कारण नाहीं असा त्याच्या वृत्तीनें निश्चय केला. असो; या गोष्टीला बहुत दिवस झाल्यानंतर त्याची स्त्री **निराबाई** गर्भधारण करती झाली, नवमास पूर्ण होऊन ती प्रसूत झाली तों तिला एक पुत्र रत्न झालें. बारा दिवस झाल्यानंतर त्याचें नांव **विठ्ठलपंत** असें ठेविलें. भक्तीच्या पोटीं सज्ञान मूर्तिमंत वैराग्य आलें कीं काय? असा मदनमूर्ति मुलगा पाहून **गोविंदपंतास** फार आनंद झाला. ज्यावेळेस **गोविंदपंतास** पुत्ररत्न झालें त्यावेळेस त्याचें वय पंचावन वर्षाचें होतें. बहुत दिवसांनीं व मोठ्या पुरश्चरणाच्या सायासानीं झालेला पुत्र मग त्या आनंदास काय विचारावें? असो जशी चंद्राची कला शुक्ल द्वितीयेपासून पौर्णिमेपर्यंत वृद्धिंगत होते त्याप्रमाणें तो पुत्र पितृगृहीं वाढूं लागला व जों जों बाळपणातील बोबडीं भाषणें, गुण करूं लागला तों तों **गोविंदपंतास** आनंद फार होई. त्याचें अष्टवर्षाचें वय झाल्यानंतर **गोविंदपंतानें** मौंजीबंधन केलें. नंतर त्यानें **विठ्ठलपंतास** त्यागांवांत एकावेदज्ञ पुरुषाजवळ विद्याभ्यास करण्यास पाठविलें. **विठ्ठलपंताची** बुद्धि फार तीव्र असल्याकारणानें वेदशास्त्राध्ययनास त्यास फारसे सायास पडले नाहींत. थोडक्यांच दिवसांत पदें, जटा, क्रम व घनसहित वेद, व्याकरण, न्याय, मीमांसा, व धर्मशास्त्र आदिकरून वेद शास्त्राचें त्यास पूर्ण अर्थज्ञान झालें. त्यायोगानें त्यास अनुताप उत्पन्न झाला. त्याच्या अंतःकरणांत वारंवार असें येई कीं मी मनुष्य देहांत येऊन काय केलें, माझी गति पुढें कशी होईल, ज्या **जगदीश्वरानें** माझ्यावर एवढा उपकार केला आहे कीं, नेत्रांनीं सहस्त्रावधि योजनें

उंच असलेले चंद्र, सूर्य, व तारे, मीं अवलोकन करावें, कर्णांनीं सहस्त्रावधि मनुष्यांचें शद्ब गृहण करून अंतःकरणानें त्या सहस्त्रावधि शद्बांच्या अर्थाचा विचार करावा, जिव्हेनें कटू, तीक्ष्ण, आम्ल असे जे नाना प्रकारचे रस आहेत त्यांची रुचि जाणावी, हस्तपादानीं सर्वकाळ क्रिया कराव्यात, याप्रमाणें ज्या ईश्वरानें आमच्या इंद्रियांस अगाध शक्ति दिली, त्याचें आह्मीं भजन व उपासना कांहींच केली नाहीं, केवळ वेद्शास्त्रांचा अभ्यास करून अभिमान मात्र झाला. सभेंत वाद विवाद करून मला विद्वान् ह्मणावें ह्मणून शेंकडों पंडितांचे अपमान केले. जगदीश्वराच्या उपासनेवांचून वेद शास्त्रांचें अध्ययन व्यर्थ होय, जसें मयुराच्या आंगीचे डोळे दृष्टीवांचून व्यर्थ, किंवा अजा कंठीचे स्तन दुग्धावांचून व्यर्थ, विधवेचें तारुण्य भ्रतारावांचून व्यर्थ, त्याप्रमाणें व्यर्थ अभ्यास करून शरीरास दुःख मात्र दिलं, आतां मी कोठें जाऊं, मला सत्संगती कशी होईल, काय करावें हें सुचत नाहीं. आहार, मैथून, निद्रा, आणि भय इतकेंच ज्ञान संपादन करून व्यर्थ पशूप्रमाणें देह वाढविला, किंबहुना मला असें वाटतें कीं माझ्यापेक्षां पशू उत्तम आहेत, गायीस काठ्या मारिल्या असतां ती कधींही द्वेष करीत नाहीं. पशूंच्या आंगीं काम, क्रोध, लोभ हे मनुष्यांपेक्षां कमी असतात. पशूंपेक्षां नीच असा जो माझा देह त्याला धिक्कार धिक्कार असो ! असे वारंवार विवेकाचे उद्गार स्फूरण पावूं लागले. मग विठ्ठलपंतानें आपल्या मनांत असा निश्चय केला कीं घरांत राहून व लौकिकाचा संबंध धरून सत्संगती व उपासना कांहींच होणार नाहीं यापेक्षां आईला व बाबाना विचारून तीर्थयात्रेच्या निमित्तानें घरांतून बाहेर पडावें, आणि अनेक देशांचे ठायीं जे सत्पुरुष वास कारितात त्यांचीं दर्शनें घ्यावीत व ईश्वराची उपासना करून देहाचें सार्थक करावें असा विठ्ठलपंताच्या वृत्तीनें दृढ निश्चय केला. दुसरे दिवशीं आपल्या बापास नमस्कार करून मधुर व गंभीर वाणीनें बोलला कीं बाबा माझ्या मनांत एक हेतु आहे तो आपण पूर्ण कराल अशी माझी खात्री आहे. तो असा कीं वेदांत व शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं मौंजीबंधन झाल्यानंतर मनुष्यांनीं वेदाध्ययन करून तीर्थयात्रेस जावें आणि पुढें गृहस्थाश्रम करावा असा नियम आहे ह्मणून मला आज्ञा द्यावी मी यात्रा करून लवकरच परत

येईन असें बोलून उत्तराची वाट पहात उगीच बसला. हें भाषण **गोविंदपंता**च्या अंतःकरणास भाल्यासारिखे लागलें आणि तो ह्मणाला कीं बाळा हे नियम पूर्वींच्या युगांत होते आतां नाहींत, त्यातून तुला तर मुळींच लागू नाहींत, व तुझ्या आंगीं शक्ति ही नाहीं. घरांत वृद्ध झालेलीं मातापितरें टाकून तीर्थयात्रेस जावें असें शास्त्रानें सांगितलें नाहीं, याप्रमाणें बोलतांनां **गोविंदपंता**चा कंठ सद्गदित होऊन नेत्रांतून अश्रू आले, आणि हुंबरडा फोडून उंच स्वरानें म्हणाला कीं बाळा तूं आह्मांला टाकून कोठें जातोस? आमची वाट काय केलीस, व कोणाच्या हातीं निरविलेंस? तुझ्यासाठीं मी किती दुःखें भोगिलीं हें **परमेश्वरा**ला माहित आहे आणि तूं मला दुःख समुद्रांत बुडवून यात्रेस जातोस हें तुझ्या मनांत चांगलें वाटतें काय? बोल बोल बाळा एकदां नाहीं जात असें बोल. याप्रमाणें **गोविंदपंता**नें भाषण करून मुखावर हात फिरवून त्यांचें चुंबन घेतलें. हें पाहून **विठ्ठलपंता**नें आपल्या मनांत असा विचार केला कीं, यांच्या नादीं लागून सोय नाहीं, कारण हें भाषण सर्व मायाजाळांतील आहे तर "स्वकार्य साधयेत् प्राज्ञः" या न्यायाप्रमाणें केलें असतां आपल्या चिंतित स्वकार्याची हानी होणार नाहीं स्वकार्य हानि करणें हें अज्ञ लोकांचें काम होय. असा विचार करून बापाला उत्तर न देतां स्तब्ध राहिला. या गोष्टीला तीन दिवस झाल्यानंतर चवथे दिवसाच्या मध्यरात्रीं उठून मातापित्याला न विचारतां तो **विठलपंत** आंगावर एक उपवस्त्र व हातांत पाणी पिण्याकरितां एक पात्र घेऊन घराचे बाहेर निघाला. आणि तीर्थयात्रेच्या मार्गास लागला. प्रातःकालपर्यंत आठ कोसाच्या पुढें गेला. इकडे **गोविंदपंत** जागृत होऊन शेजारीं पहातात तों **विठू** नाहीं हें पाहून आपल्या स्त्रीस विचारलें कीं, **विठू** तुजकडे आहे काय स्त्रीनें उत्तर केलें कीं, माझ्याकडे नाहीं तो तुमच्या शेजारीं निजला होता. हें ऐकून **गोविंदपंता**च्या काळजास धक्का बसला, आणि विचार करूं लागला कीं, परवा बोलल्याप्रमाणें **विठू** यात्रेस तर गेला नाहींना? कारण तें मूल फार हट्टी आहे, बरें शोध करूं असें ह्मणून हातात काठी घेऊन डोंक्यास पागोटें घालून वेदज्ञ गुरुच्या घरीं आला आणि गुरूस ह्मणाला कीं तुमच्याकडे **विठू** आला होता कीं काय?

हें ऐकून गुरू ह्मणाला तुमचा मुलगा **विठ्ठलपंत** हा तीन चार दिवस मजकडे येत नाहीं मींच आज **विठूस** बोलावणें पाठविणार होतों. हें ऐकून तर **गोविंदपंताची** अशी खात्री झाली कीं **विठू** यात्रेस गेला असावा, परंतु रहावेना ह्मणून गांवांतील जे **विठ्ठल**पंताचे मित्र होते त्यांच्या घरीं शोध केला व गांवाच्याबाहेर **महादेवाचें** देवालय होतें तेथेंही शोध केला असें सर्व ठिकाणीं शोधून **विठू** कोठें नाहीं असा वृत्तीनें पूर्ण निश्चय केला. आणि नेत्रांतून आश्रू गाळीतच घरीं आला आणि मोठ्या स्वरानें आपल्या **स्त्रीस** हांक मारून ह्मणाला कीं स्त्रिये, आज **विठूनें** आपणास संसारअरण्यांत एकटें सोडून आपण तीर्थयात्रेस निघून गेला हें त्यानें चांगलें केलें नाहीं. हाय हाय **विठू** तुला मी आतां कोठें पाहूं तुझा शोध कसा लागेल हें कांहीं मला सुचत नाहीं, तुझ्या वियोगाग्नीनें माझें अंतःकरण करपून गेलें. आतां माझें देहभान अगदीं ठिकाणीं नाहीं. असें बोलतांना त्याच्या नेत्रांतून आस्खलित अश्रूधारा वाहू लागल्या व धरणीवर लोळण घेऊन मोठ्यानें ह्मणाला कीं, बाळा मला एकदां भेटून जा, **विठू** तुझें सौंदर्य व बाळपणातील बोबडीं भाषणें आणि प्रीति इत्यादि तुझ्या गुणाचें स्मरण झालें ह्मणजे पोटांतून वरचेवर उमाळे येतात. असें बोलून मूर्च्छागत होतो इतक्यांत त्याची **स्त्री निरा**बाई तिच्या कर्णांत हे शब्द पडतांच ती ऊर बडवीतच बाहेर आली आणि दुःखाचा सुस्कारा टाकून ह्मणाली कीं, अहो **विठू** यात्रेस गेला काय, अरे बाळा माझी उपेक्षा करून एकटीस सोडून तूं गेलास ना? बाळा तूं कोठें आहेस व कोठें निजला असशील. तुला भूक फार लागली असेल, तुला खाण्यास कोण देईल? बाळा माझ्या बोलण्याचा तुला राग आला कीं काय ह्मणून तूं मला न विचारतां पायानेंच यात्रेला गेलास. रानांत हिंडतांना तुझ्या पायास काटें मोडले असतील ना? जन्मापासून आज चवदावर्षेपर्यंत प्राणाच्याही पलीकडे तुझें संरक्षण केलें आणि शेवटीं मला तूं प्रपंच रूपी नदींत मध्यभागीं सोडून गेलास. मला पूर्ण भरंवसा होता कीं माझा **विठू** मला सोडून कधींही कोठें जाणार नाहीं आणि हें असें कसें केलेंस? हर हर माझेंच दैव खोटें, पूर्व जन्मांतरीं मीं कोणाच्या पुत्राची आणि आईबापांची ताडातोड खचित केली असेल त्याचे हे झाडे प्रस्तुत

या देहीं मी देत आहें. असो; मीच हतभागी यांत तुझा अन्याय नाहीं. बाळा! असा पुस्कळ विचार करतें पण नाहींरे नाहीं तुझा वियोग पळभरही सहन होत नाहीं. काय करूं पोटांत कालवतें. आतां मला तुझ्यावाचून आई ह्मणून कोण हांक मारील? तुझ्या वियोगाची जी घटका ती मला युगाप्रमाणें जाते. तुझ्यासारखा पुत्र पुन्हा दृष्टीस पडेल काय? काय तुझे गूण आणि काय तुझी बुद्धि, काय तीं भाषणें. स्मरण झालें ह्मणजे माझ्या पोटांत भड भडतें! लोक मला असें ह्मणत होते कीं निराबाई तुझा विठू फार शाहणा आहे तो तुझ्या दृष्टीचीं पारणें लवकरच फेडील. हें ऐकून मला फार संतोष होई आणि आतां माझ्यासारख्या गरीब आईस सोडून गेलास हीं पारणें फेडलीस कीं काय असें बोलून मूर्छना येऊन पडते. इतक्यांत गोविंदपंत सावध होऊन आपले स्त्रीजवळ आला आणि तिच्या नेत्रास पाणी लावून म्हणाला कीं धीर धर, धीर धर, घाबरी होऊ नको. आज, उद्या महिन्यांनीं, किंवा वर्षांनीं आपणास विठू भेटेल यांत संदेह नाहीं, मी ही शोध करतों. “ यत्ने कृते यदि न सिध्यति कोत्र दोषः ” यत्न केला असतां आपणाकडे कांहीं दोष नाहीं. असें गोविंदपंताचे बोलणें ऐकून निराबाई म्हणाली कीं अहो धीर कसा धरूं, वृद्धपणीं आपणास एकुलता एक मुलगा तो गुणवान् पंडित आणि त्याचा वियोग कसा सहन होईल व विठूवाचून मला अन्नपाणी कसें गोड लागेल, त्याच्या वाचून मला सर्व गृह शून्य दिसतें, मला कांहीं एक सुचत नाहीं असें बोलून पुनः रडावयास लागते. मग गोविंदपंतानें आपल्या स्त्रीचें शांतवन केलें आणि तीस सांगितलें कीं तूं धीर सोडूं नको श्रीराम ज्या वेळेस अरण्यांत गेले त्या वेळेस त्यांच्या मातोश्रीनें [ कौसल्येनें ] काय केलें? असा कांहीं अंतःकरणांत तूं विचार कर व्यर्थ शोक कां करतेस. झाल्या गोष्टीचा शोक करणें हें तुला योग्य नव्हे. **भवितव्यं भवत्येव नारिकेल फलांबुवत् ॥ गंतव्यं गतमित्याहुःगजभुक्त कपित्थवत् ॥** हे स्त्रिये? एका सत्पुरुषाचें असें वचन आहें कीं होणारी गोष्ट होतेच. जसे नारळांतलि पाणी बाह्य जळाचा स्पर्श होऊं न देतां आणि किती जरी प्रयत्न केला तरी ज्या ऋतुमध्यें नारळाची उत्पत्ति होते त्या वेळेसच त्यांत पाणी येतें आणि दुसरें जाणारी जी वस्तू असते ती जाते.

जसें हत्तीनें भक्षण केलेलें कपित्थ [ कऊठ ] हत्तीच्या ×× द्वारांतून सावयव व अभग्न जरी बाहेर पडलें तरीं त्यांतील मगस मात्र जातो. एवंच होणें जाणें प्रालब्धाच्या आधीन आहे ह्मणून तूं दुःख करूं नकोस. ह्याप्रमाणें त्यानें तिचें समाधान केलें, आणि त्या दिवसापासून प्रत्यही प्रातःकालीं उठून हातांत काठी व डोंक्यास पागोटें घालून नित्य गांवाबाहेर पांच कोसांपर्यंत आपला मुलगा जो विठू त्याचा शोध करण्यास जाई व बैरागी, संन्यासी, तापसी, जटाधारी ह्या लोकांचा मेळ गांवांत नवीन आला ह्मणजे त्या मेळांत जाऊन विठूच्या रूपाच्या खाणाखुणा त्या मंडळीस सांगून असें ह्मणावें कीं ह्या प्रकारचा रूपानें व गुणानें युक्त असा जो चवदा वर्षांचा माझा मुलगा तो तुह्मीं पाहिला काय ? पाहिला असल्यास मला सांगा. जेथें तो असेल तेथें मी जाईन. असा सर्व ठिकाणीं शोध करून विठूचा कोठें शोध लागत नाहीं ह्मणून रडत माघारा घरीं येई. नंतर त्यानें आपला पुत्र भेटावा ह्मणून देवास अभिषेक व मृत्युंजयाचा जप असे अनेक उपाय आरंभिले व त्याच्या स्त्रीनें अश्वत्थ प्रदक्षिणा सहस्र करण्यास आरंभ केला. याप्रमाणें पुत्रासाठीं उभयतांचे नित्य नेमानें प्रयत्न चालले होते. इकडे **विठ्ठलपंत** मार्ग क्रमण करीत करीत अनेक देशांचें अवलोकन करून **प्रयाग, काशी, द्वारका, मूळमाधव, भालुकातीर्थ, प्रभासतीर्थ, सोरटी-सोमनाथ, गोकुळ, वृंदावन, मथुरा, धवलपुरी, सप्तशृंगी, त्र्यंबकेश्वर, भिमाशकर,** इत्यादि तीर्थें पाहून **आलंकापूर** ह्मणजे **अळंदी** ह्या ठिकाणीं **विठ्ठलपंत** येऊन पोहचले. तेथें दाक्षिण वाहिनी जी **इंद्रायणी** तिच्या पूर्व दिशेच्या बाजूस एक **श्रीसिद्धेश्वराचें** देवालय आहे त्या देवालयाच्या उत्तरेस एक रमणीय सरोवर होतें त्या सरोवराच्या कांठीं मोठ मोठाले **आंबे, फणस. अश्वत्थ,** व **वट** वगैरे असे अनेक प्रकारच्या वृक्षांची फार गर्दी झाली आहे. ते वृक्ष उंच असल्याकारणानें त्यांची सरोवरावर दांट सावली पडली असे. फलभारानें नम्रझालेल्या वृक्षावर कोकिलादिक पक्षी बसून पंचम स्वराचा ध्वनी सारखा करीत आहेत. तो ध्वनी ऐकून तपस्वी लोकांच्या वृत्तीस अत्यंत आनंद उत्पन्न होतो. व जे संसारामध्यें निमग्न झालेले त्यांच्याही मनांत असें वाटतें कीं सर्वकाळ येथेंच वास करावा. त्या

सरोवरामध्यें अनेक प्रकारचे चक्रवाकादिक पक्षी क्रीडा करितात, आणि त्या सरोवराच्या सभोंवती गुलाब, जाई, जुई, मोतिया, शेवंती, बकुली, पारिजातक, पाच, मरवा, इत्यादि योगानें तें सरोवर अद्वितीय व त्यामध्यें कमलावर भ्रमर मकरंद सेवन करून एकसारिखा गुंजारव करीत आहेत. व त्यापूर्वोक्त वृक्षावर राघू, मैना, साळुंक्या, चिमण्या, इत्यादिक बसून त्यांचा कलकलाट चालला आहे. याप्रमाणें त्या रमणीय स्थलाची शोभा पाहून **विठ्ठलपंताच्या** अंतःकरणांत फार आल्हाद उत्पन्न झाला. त्याच्या मनांत असें वाटलें मी **काशी, प्रयाग, मूलमाधव, गोकुल, वृंदावन, प्रयाग,** आदिकरून अनेक तीर्थांचें अवलोकन केलें, परंतु असें चित्तास अत्यानंद देणारें तीर्थ कोठें ही पाहिलें नाहीं. हें सुशोभित तीर्थ सोडून कोठेंही जाऊं नये व सर्वकाळ तेथेंच वासकरावा. यानंतर **विठ्ठलपंत** त्या **इंद्रायणीच्या** तीरीं स्नान करून संध्या सूर्योपास्ती ब्रह्मकर्म करीत बसले आहेत तों इतक्यांत त्या आळंदींत **सिदोपंत** या नांवाचा कुळकर्णी राहत असे तो आपल्या घरचा फार सुखी असून त्याजकडे **सोळ, धानोर, गोलेगांव, चरवली, भोस, वडगांव, पिंपळगांव, रास, खेडकलूस, चाकण, फुलगांव, तुळापूर, मरकळ,** व मुख्य **आळंदी** आदिकरून चोविस गांवची कुळकर्णपणाची वृत्ति असे. त्यानें प्रत्येक गांवावर आपली वृत्ति राहावी ह्मणून पुष्कळ कारकून ठेविले असत, व त्याच्या घरीं त्याची स्त्री तिचें नांव **उमाबाई** ती महापतीव्रता व प्रपंचदक्ष होती आणि त्यास एक कन्या अष्टवर्षांची तिचें नांव **रखुमाबाई** असें होतें. त्याच्या पोटीं पुत्र नसल्याकारणानें तो फार दुःख करीत असे. त्यानें सर्वकाळ द्रव्याचा व्यय सद्धर्माकडे करावा व ब्रह्मचारी, तापसी, बैरागी, संन्यासी व साधुमंडळीचे समुदाय **आळंदीस** आले ह्मणजे त्यास आनंद होऊन त्यांचा तो फार आदरसत्कार करी. असा पुरुष सदाचारसंपन्न व ब्रह्मकर्म निष्ट व आलेल्या गेलेल्या आतिथींचा सन्मान करणारा ग्रहस्थाश्रमी लोकांत फार विरल असतो. असो; असा जो **सिदोपंत** तो स्नान करण्यासाठीं त्या **इंद्रायणीच्या** तीरावर आला आणि संध्या करणारा तापसी व ब्रह्मचर्याच्या योगानें आणि शक्तीच्या उत्कर्षामुळें मुखावर अत्यंत आलेल्या तेजानें युक्त अशा **विठ्ठलपंतास** त्यानें अव-

लोकन केलें. **सिदोपंता**च्या मनांत हा कोणी ब्रह्मचारी सिद्धसाधु आहे ह्मणून करजोडून मोठ्या नम्रतेनें भाषण केलें कीं आपण कोण व कोठचे रहाणार व कोणचे देश पवित्र करीत आला व कोणीकडे गमन करण्याचा हेतु आहे व आपलें नांव काय, आपलें वास्तव्य कोठें असतें व घरांत कोण कोण आहेत हें सर्व वर्तमान निवेदन करा, असें **सिदोपंता**चें भाषण **विठलपंता**नें श्रवण करून असें भाषण केलें:–आमचें **आपेगांव** वास करण्याचें स्थान होय, माझें नांव **विठल.** मी यजुर्वेदी ब्राह्मण तीर्थयात्रा करण्याकरितां निघालों आहें. माझें आईबाप **आपेगावां**त स्वगृहीं आहेत.. मी **काशी**, **द्वारका**, आदिकरून तीर्थांचें अवलोकन करीत येथें आलों. पुढें रामेश्वरास जाण्याचा हेतु माझ्या मनांत आहे. असें भाषण **सिदोपंता**नें ऐकून गंभीर वाणीनें बोलला कीं, आज माझ्या घरीं भोजन करून आश्रम पवित्र करावा. आपल्या सारखे जे सत्पुरुष आहेत त्यांचें स्वगृहीं जें आगमन तें मत्सदृश पातक्याच्या कल्याणार्थ होय. ह्याविषयी भागवतांत वसुदेवोक्ति आहे. **भगवन् भवतो यात्रा स्वस्तये सर्व देहिनां ॥ कृपणानां यथा पित्रोरुत्तमश्लोक वर्त्मनां** ॥ १ ॥ ह्या उक्तिप्रमाणें आपलें आगमन आमच्या हितास कारण होय. असें बोलून स्तब्ध राहिला. तें **सिदोपंता**चें मधुर भाषण **विठलपंता**नें मान्य करून सांगितलें कीं माझें ब्रम्हकर्म झाल्यावर मी आपल्या घरीं येईन. यानंतर **सिदोपंता**नें स्नानसंध्यादि करून कांहीं वेळानें **विठलपंता**स घेऊन आपल्या गृहीं आला व मोठ्या हर्षानें उभयतांनीं भोजन करून संध्याकाळपर्यंत आत्मचिंतनादिक भाषण केलें. रात्रौ उभयता निद्रिस्त झाल्यावर **सिदोपंता**स असें स्वप्न पडलें कीं मी **पंढरपुरास** जाऊन **श्रीविठला**चे दर्शनास गेलों व नमस्कार करून **श्रीविठला**चे मुखाकडे अवलोकन करितों तों **विठलानें** असें भाषण केलें कीं **सिदोपंता,** तुझी जी कन्या **रखुमाबाई** ती तुझ्या घरीं आलेला **विठलपंत** या नांवाचा ब्रम्हचारी त्यास अर्पण कर. कारण **विठलपंता**पासून जे तुझ्या कन्येस पुत्र होतील ते महा ज्ञानी जगविख्यात व उभय कुलोद्धारकर्ते होतील. तस्मात् तूं विलंब न करितां उत्तम मुहूर्त पाहून कन्येच्या विवाहास आरंभ कर असें स्वप्नांत **श्रीविठलानें** **सिदोपंता**स सांगितलें. इतक्यांत

**सिदोपंत** जागृत होऊन अंतःकरणांत विचार करूं लागला कीं **स्वप्नांत** तर **श्रीविठलानें** आपली मुलगी जी **रखुमाबाई** ती **विठलपंतास** द्यावी असें सांगितलें परंतु **विठलपंत** हा मोठा कर्मनिष्ट ब्रम्हचारी आहे, तो ही गोष्ट मान्य करील किंवा नाहीं हा संशय वाटतो. असो आपण बोलावें, मान्य केल्यास उत्तमच होईल. असा निश्चय करून प्रातःकालीं **विठ्ठलपंतास** मोठ्या नम्रतेनें भाषण केलें कीं रात्रौ मला स्वप्न पडलें त्यांत **श्रीविठ्ठलानें** येऊन असें सांगितलें कीं **सिदोपंत** तूं आपली मुलगी **विठ्ठलपंतास** दे ; माझ्या कन्येस आपल्यासारिखा वेदशास्त्रसंपन्न कुलीन व स्वकर्माचरणीं दक्ष असा वर कोठून मिळणार. असो; त्यांतून **श्रीविठ्ठलाची** आज्ञा मग काय विचारावें, आधीच सोन्याचें त्यावर जडावाचें लेणें. " श्रीमंताचें शोभिवंत " ह्या ह्मणीप्रमाणें झालें. तर ही गोष्ट आपण मान्य कराल असी इच्छा आहे. हें भाषण **विठ्ठलपंतानें** ऐकून बोलला कीं जसें तुह्मास आपली मुलगी मला द्यावी असें स्वप्न पडलें तसेंच मला तुमच्या मुलीचें पाणिग्रहण करण्याविषयीं स्वप्न पडलें पाहिजे तर ही तुमची गोष्ट मान्य केली जाईल, नाहींतर स्वकार्येच्छु जे पुरुष आहेत ते असें मिथ्या स्वप्न सांगून आमच्या सारख्यांचें ब्रह्मचारित्व भ्रष्ट करण्यास तयार होतात अशी त्यांची रीतिच असते. ह्याप्रमाणें भाषण **सिदोपंतानें** ऐकून बोलला कीं आज माझ्या घरीं आपण वास्तव्य करावें **श्रीविठ्ठलाची** इच्छा असल्यास आपणास ही स्वप्न पडेल असें बोलून मोठ्या आग्रहानें **विठ्ठलपंतास** त्यादिवशीं राहून घेतलें. मग स्नानसंध्यादि ब्रह्मकर्म व भोजनादि प्रकार झाल्यानंतर रात्रौ **सिदोपंतानें नारायणाची** अशी प्रार्थना केली कीं **जगदीश्वरा** जसें मला स्वप्नांत येऊन आपली मुलगी द्यावी असें सांगितलें असें **विठ्ठलपंतास** ही माझ्या कन्येचें पाणिग्रहण करावें अशी आज्ञा द्यावी ही माझी विनयपूर्वक प्रार्थना आहे. माझे हेतू आपल्यावाचून कोण पूर्ण करील? कारण आपण जगत्रयाचे मातापितर व सर्व हें ब्रह्मांड तुह्मास चिरंजीवाप्रमाणें आहे तर मुलाची काळजी करणें हें मातापित्याचें कर्तव्य होय. त्यांतून माझ्यासारख्या अज्ञानी मुलाचें ओझें सर्वप्रकारें तुह्मावरच आहे. अशी प्रार्थना करून आपण अंगणांत तुळसीवृंदावन होतें तेथें **विठ्ठल**

पंताच्या निद्रेची व्यवस्था लावून आपण घरांत जाऊन निजला. इकडे तुलसीवृंदावनाच्या कट्यावर **विठ्ठलपंतास** झोंप लागल्यांनतर मध्यरात्रीच्या सुमारास त्यास स्वप्न पडल. त्यांत एक स्वामी हुरमुजी रंगाची छाटी आंगावर घेऊन अरुणासारखा तेजस्वी व पृथ्वीतलावर जे लोक पापपुण्य करितात त्यांचा स्पर्श न व्हावा ह्मणून हातांत दंड घेतला कीं काय? व पायीं खडावा चालतांनां शद्ब करतात तो शद्ब चरणार विंदीं भृंगाप्रमाणें दीन झालेल्या शरणांगतावर अभयाक्तिच होय. अशा गुणानें युक्त मुखानें नारायण नामाचा उच्चार करीत व कपाळीं गोपी-चंदन लावलेलें व कंठीं तुळसीमाळा धारण केलेली असा एक मोठा संन्यासी आला त्यानें **विठ्ठलपंतास** जागृत करून ह्मणाला कीं **विठ्ठल-पंत** मी तुझा गुरू होय. माझी आज्ञा तुला वेदाज्ञेपेक्षां जास्त आहे तर तूं सिदोपंताच्या मुलीचें पाणिग्रहण कर व तुझ्या यागानें ज तिला तीन पुत्र आणि एक कन्या होतील ती दिग्विजयी व सदा लोकांचें अभिष्ट करणारे होतिल तर तूं तिचें पाणिग्रहण करण्यास आलस्य करूं नको ही तुला माझी आज्ञा होय. हें न केल्यास गुरुची आज्ञा भंग करण्याचें पातक लागून परिणामी तूं अधःपातास जाशील गुर्वाज्ञा भंगाचें महत् पातक आहे अशा विषयीं एक युक्ति आहे.

**॥ यदि शिष्यो गुरोराज्ञा भंगं खलु करिष्यति ॥ व्रजेन्नरकमाकल्पं स्वयंहि पितृभिःसह ॥ १ ॥** अर्थः—शिष्यानें गुरुची आज्ञा मोडली तर तो आपल्या वाडवाडिलासह कल्पपर्यंत नरकाप्रत जातो. असें बोलून स्वप्नांतील संन्यासी निघून जाता झाला. इतक्यांत **विठ्ठल-पंत** जागृत होऊन स्वप्नांत झालेलें वर्तमान सर्व **सिदोपंतास** हांक मारून सांगितलें ते ऐकून **सिदोपंतास** जो आनंद झाला त्याची तर कल्पनाच करिता येणार नाहीं. असो बलीयसी केवलमीश्वरेच्छा, जग-दीश्वराचीइच्छा बलीयसी होय असे अनेक प्रकारचे विचार **विठ्ठलपं-ताच्या** अंतःकरणांत येऊं लागले. इकडे सिदोपंत सानंद होऊन आपली जी स्त्री **उमाबाई** तिला सर्व वर्तमान सांगून मोठ्या हर्षानें बोलला कीं आज आपल्या **रखुमाबाईचें** अत्यंत कल्याण झालें कारण **विठ्ठलपंता**सारखा वैदिक व शास्त्रज्ञ नवरा मिळण्यास फार दुर्लभ आहे असो. स्त्रिये तूं सामानाची तयारी त्वरित कर असें बोलून **विठ्ठलपंता-**

जवळ आला, आणि ह्मणाला कीं माझ्या पूर्वजन्माचें बलवत्तर पुण्याच्या योगानें आपल्यासारखा जामात मिळाला. आतां पुढें कसें करावयाचें तें सांगा. असें बोलून आपल्या घरच्या दूताकडून कुलोपाध्यायास बोलावून विचारलें कीं कन्येच्या विवाहाचा बेत केला आहे तर तुह्मीं या उभयतांचे गुण व गण कसे आहेत हें ज्योतिष शास्त्रांत पाहून सांगावें, हें ऐकून कुलोपाध्यायानें दोघांचें *टिपण पाहून सांगितलें कीं सिदोपंत या दोघांचें छत्तीस गुण येतात. असा वर तुमच्या कन्येस बहुत सायासानें शोध केला असतां मिळावयाचा नाहीं, आतां मार्गशार्ष वद्य पंचमी गोरज मुहूर्त आहे आपली तयारी असल्यास त्यामुहूर्तावर कन्येचा विवाह करावा. हें ऐकून सिदोपंतास फार आनंद झाला. मग त्यानें त्याच मुहूर्तावर विवाह निश्चय ठरविला. सिदोपंतानें आपले गावोगावीं राहणारे बंधुवर्ग इष्टमित्र या सर्वांस विवह पत्रिका पाठवून ते सर्व नियमीत तिथीच्या आधीं येऊन पोहोंचले. सिदोपंतानें आपले गडी, कारकून वगैरे लोक हाताखालीं घेऊन मोठा एक सुशोभित अत्यंत रमणीय लग्नमंडप घातला. असा लग्नमंडप व सर्व मंडळीचा समुदाय पाहून विठ्ठलपंताच्या अंतःकरणांत फार दुःख झालें कारण मला घरांत वृद्ध झालेलीं मातापितरें टाकून विवाह करणें योग्य नव्हे असें त्यास स्मरण होतांच तो त्या घरांत एक खोली होती तेथेंकोणी नाहीं असें पाहून बसला; आणि मोठ्यास्वरानें ह्मणाला कीं, बाबा मी प्रथम तुम्हाला न विचारतां तीर्थयात्रेस निघालों हाच माझा मूर्खपणा होय. कारण सर्व तीर्थें तुमच्या चरणीं वास करितात असें असून तुम्हांस दुःख देऊन यात्रेस जाणें हें नरकवासाचें साधन होय. व आई माझ्या साठीं तुला किती दुःख झालें असेल. **नमातुःपरदैवतं ॥** अशी शास्त्रनीति मला ठाऊक असून तुझा त्याग करून यात्रेस निघा-

---

*विठ्ठलपंताचें गोत्र पंचप्रवरान्वित वत्स; व जन्मनाम महादेव. सिदोपंताचे गोत्र त्रिप्रवरान्वित वाशिष्ट; व मुलीचें जन्मनाम मीनाक्षीदेवी. कोठे विठ्ठलपंताचें गोत्र वाशिष्ट; व सिदोपंताचें गोत्र वत्स असेंही प्रमाण आहे, परंतु आपेगावीं शोध केल्यानंतर वत्सगोत्र हेंच खरें आहे असें आढळलें.

लीं तस्मात् माझ्या सारखा कंटक हृदयी अधम पातकी या जगतात कोणी नसेल. बाबानां व आईला माझ्यावांचून घटकाभर ही चैन पडावयाचें नाहीं. सर्व प्रकारें त्यांनां दुःख समुद्रांत बुडविण्यास कारण मीच आहें. प्रपंचांत त्या दोघांस मीच एकुलता एक मुलगा आणि माझा वियोग त्यांनां कसा सहन होईल ? हर हर जगदीश्वरा, माझ्यासारखा दुष्ट पातकी वृद्ध मातापित्यांस दुःख देणारा या जगत्रयांत कोणी नसेल. काय माझी गती होईल कळत नाहीं. **विठ्ठलपंता**च्या कंठ सद्गदित होऊन नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि बोलला कीं **रामा**वांचून **कौसल्ये**ची अवस्था कशी झाली व **दशरथ** राजान तर **राम राम** म्हणून प्राणच टाकले अशीच आईची व बाबांची अवस्था झाली नसेल ना ! कारण पुत्रवियोग सहन करणें फार कठीण आहे. असो उपाय नाहीं लग्नाचा मुहूर्त फार जवळ येऊन पोहोचला; कांहीं दिवसाचा अवकाश असता तर आईच्या व बाबाच्या भेटीचा लाभ झाला असता. असो; **नारायणा** ! तुझी इच्छा, तुझ्या इच्छेपुढें कोणास ही जाववत नाहीं, आतां काय करावें कांहीं सुचत नाहीं. असा तेथें चार घटिका शोक करून **विठ्ठलपंत** त्या खोलीतून बाहेर आला आणि पूर्ववत् वर्तन करूं लागला. ह्या गोष्टीला तीन दिवस झाल्यानंतर लग्न समारंभ झाला. वराचें आईबाप व बंधुवर्ग दूरदेशीं असल्यामुळें उपाध्याचा एक बंधू होता, त्याला वराकडे नेमून **सिदोपंतानें** आपल्या घरासमोर उत्तम गृह पाहून नवरा मूल राहण्याची सोय तेथें केली. मग सर्व मंडळीस घेऊन गांवाबाहेर **मारुतीच्या** देवालयांत उपाध्याकडून सीमांतपूजन करून तेथें त्यानें **बाघुली, सोळ, धानोर, खेड, कडूस,** व **पिंपळगाव,** असें लांब लांबचे गांवांहून आलेल्या ब्राह्मणांस यथाशक्ति दक्षणा वाटली. मग वरास घोड्यावर बसवून मोठ्या आनंदानें मंगळवाद्याचा गजर करीत गांवांतून मिरवत आणून जानोसवाड्यांत पोहोचविले, नंतर पंचमीचे दिवशीं देवप्रतिष्ठा बसऊन आनंदोत्सवानें गोरज मुहूर्ती लग्न लाविलें; त्यावेळेस द्रव्य देऊन आलेल्या ब्राह्मणास व याचकांस संतोषित केलें. त्या वधुवरांचा अपूर्व जोडा पाहून सर्वत्र स्त्रीपुरुषांस आनंद झाला. असा चार दिवस लग्न सोहाळा उत्तम होऊन

मग परगांवांहून आलेले कारकून, बंधुवर्ग, व गांवांतील पाटील वगैरे मानकरी या सर्वांस योग्यतेनुरुप पोषाक देऊन बोळविले. त्याप्रमाणें कुलोपाध्यायाचा यथाशक्ति सन्मान करून संतोष केला. सोळा दिवस सोहळा होऊन सहा महिनेपर्यंत विठलपंतानें श्वशुर गृहीं वास केला. पुढें एके दिवशीं विठलपंत इंद्रायणीच्या तीरावर स्नान संध्यादि ब्रह्मकर्म करीत बसले असतां त्या मार्गानें आषाढशुद्ध एकादशीच्या वारीकरितां कांहीं संतमंडळी हातांत टाळ विणा घेऊन सुखानें विठ्ठल विठ्ठल नामस्मरण करीत चाललेलें त्यानें अवलोकन केलें. विठ्ठलपंत त्या संतमंडळीजवळ येऊन ह्मणाला कीं बाबांनों तुह्मीं नामस्मरण करीत कोठें जात आहां? मग त्यांस संतमंडळी बोलली कीं आह्मी आषाढी एकादशीकरितां पंढरपुरांत श्रीविठ्ठलाचे दर्शनास जात आहोत. असें त्यांचें भाषण श्रवण करून विठ्ठलपंताच्या अंतःकरणांत पंढरपूर पाहावें अशी उत्कंठा उत्पन्न झाली. मग घरीं येऊन सिदोपंतास माझी इच्छा पंढरपुरास जावयाची आहे असें सांगितलें. ती गोष्ट त्यानें मान्य करून त्यांस बोलले कीं आह्मास पंढरपूर पाहून बहुत दिवस झाले तर तुह्मी व आह्मी कुटुंबासहित जाऊं. तुमच्या योगानें मलाही श्रीविठ्ठलाचें दर्शन होईल. असें बोलून दुसरें दिवशीं निघण्याची तयारी करून रखुमाबाईस व कुटुंबास बरोबर घेऊन सिदोपंत विठ्ठलपंता सहवर्तमान निघाले. मार्गानें अनेक गांवचें अवलोकन करीत पंढरपुरास येऊन पोहोचले. जेथें द्विभुजमूर्ती जो श्रीविठ्ठल तो माता पित्यांची सेवा करणारा पुंडलीक त्याला वर देण्याकरितां आला त्यावेळेस सन्मानार्थ फेंकलेली जी वीट तिच्यावर समचरण व कटींवर दोन हात ठेऊन उभा राहिला. मला असें वाटतें कीं अनन्यभावानें दर्शनास येणारे जे लोक त्यांनां भव समुद्र कंबरे इतका आहे असें सर्वांस भवलक्षण दाखविण्याकरितांच कटींवर हात ठेवले काय? ज्या देवाच्या वामभागीं रुक्मिणी व दक्षिणभागीं लक्ष्मी पृष्ठभागीं राही व सत्यभामा सन्मुख मारुती व गरुड उभे आहेत. काय तो रमणीय देव कीं काकडआर्तीच्या वेळेस देवाचें मुखावलोकन केलें असतां विषयी मुमुक्षु व मुक्त या सर्वांचा कंठ सद्गदित जाहल्या वांचून कधींही राहत नाहीं. व देव दर्शन घेऊन चंद्रभागेच्या तिरावर आले

ह्मणजे हजारों लोक एकमेकांच्या पाया पडतात व कपाळीं बुका लावून हातांत पताका घेऊन मोठ्या उच्चस्वरानें **विठ्ठल विठ्ठल** या नामाचा गजर करीत असतात त्या पताका ह्मणजे शुद्ध उपासना मार्गांतील धर्म ध्वज होत. आह्मी **जगदीश्वराचे** उपासक अशी मनोवृत्ति सर्वकाळ रहावी ह्मणून वारकरी लोक आपल्या खांद्यावर त्या पताका वागवितात व असें घरावर किंवा रस्त्यावर तुलसीपत्र ठेविलें असतां तें सर्व ब्राह्मणास अर्पण करावें लागतें तसें ज्या लोकांनीं आपल्या देहावर तुळसीकाष्टमाला धारण करून सर्व देह ईश्वरार्पण केला. आतां ते काम क्रोधादिक जे षड्वैरी त्यांच्यावर विवेक शस्त्रानें वार करितात ह्मणून त्यांना वारकरी असें ह्मणतात. धन्य ते एकनिष्ट उपासक की वर्णाश्रम अभिमान न धरितां सर्वांभूतीं भगवद्भावना धरून परस्पर पाया पडतात. येथेंच सर्व लोकांचें अज्ञान दारिद्र्य जावे ह्मणून **श्रीविठ्ठल** रूप द्रव्य दाखविण्यास पायाळूच झाला कीं काय ? असा जो **पुंड-रीक** त्याचें दर्शन घेऊन नगर प्रदक्षिणेला गेलें असतां चहूंकडे नामस्मरणाचा गजर ऐकू येतो–हें क्षेत्र सर्व क्षेत्रांमध्यें उत्तम होय. कारण सर्व क्षेत्रीं कर्ममार्ग प्रधान क्षौरादिविधि आहे. कर्ममार्ग परोक्ष आहे. असें **श्रीमतच्छंकराचार्य विद्यारण्य प्रभृतींचें** मत आहे. ह्याविषयीं **भागवतीं** एक उक्ति ॥ **परोक्षवादो वेदोयं बालानामनुशासनं** ॥ अशी आहे. असा कर्ममार्ग निरूपित क्षौरादिविधि ह्या क्षेत्रीं मुळींच नाहीं. येथें उपासनामार्ग प्रधान होय. व **जगदीश्वराची** उपासना करणें हें मनुष्यमात्राचें कर्तव्य आहे. ॥ **कर्मिभ्यश्चाधिकाभक्तिः ज्ञानिभ्यश्चाधिकामता** ॥ **तस्मादुपासनाकार्याचेश्वरस्यसदानरैः** ॥ १ ॥ अशी **भट्टपादाचार्यकृत उपासनावली** ग्रंथांत ह्मटलें आहे; ह्मणून उपासना प्रधान क्षेत्र असें कोठें नाहीं असें जें **पंढरपूर** तेथें **विठलपंत** व **सिदोपंत** सहकुटुंब आल्यानंतर **चंद्रभागेचें** स्नान करून **पुंडरीकाचें** दर्शन घेऊन व नगर प्रदक्षिणा करून राउळांत गेले मग **विठ्ठलपंतानें श्रीविठ्ठलाच्या** चरणारविंदीं साष्टांग नमस्कार केला. तसेंच अन्य देवतांचें दर्शन घेऊन ठिकठिकाणीं भजनादि प्रकार पहात असतां **विठ्ठलपंताच्या** अंतःकरणांत अनुताप उत्पन्न झाला. त्यास असें वाटलें कीं, माझा नियम **रामेश्वरास** जाण्याचा असतां मी मध्येंच

मातापित्याला टाकून गृहस्थाश्रम करण्याच्या उपाधींत पडलों हें चांगलें केलें नाहीं. असो, **सिदो**पंतास विचारून **रामेश्वरास** जावें असा त्यानें निश्चय करून बिन्हाडीं आला आणि **सिदो**पंतास ह्मणाला कीं मी पूर्वी श्रुत केल्याप्रमाणें **रामेश्वरास** जातों. आपण मला आज्ञा द्यावी मी लवकरच येईन. असें ऐकून **सिदो**पंतानें सांगितलें कीं आपण यात्रेस जातां त्यास मी• नाहीं कसा ह्मणूं परंतु कुटुंबाची व्यवस्था काय केली. हें ऐकून **विठ्ठल**पंतानें सांगितलें कीं मी **रामेश्वराहून** आल्यानंतर तिला बरोबर घेऊन मातापित्याच्या दर्शनास **आपे**गांवीं जाईन. ही गोष्ट **सिदो**पंतानें मान्य करून ते उनयतां दहा दिवसपर्यंत **पंढर**पुरास राहिले. **मग** संकेताप्रमाणें **विठ्ठल**पंतानें **रामेश्वरास** जाण्याची तयारी केली हें सर्व वर्त्तमान **रखुमा**बाईस कळतांच तिला फार अंतःकरणांत वाईट वाटलें कारण तिला आपल्या पतीची प्रकृति प्रपंचाविषयीं उदासीन आहे असें सहा महिन्याच्या सहवासानें कळलें होते परंतु बाबापुढें उपाय नाहीं बाबा नसते तर मी त्यांच्या बरोबर गेल्यावाचून कधींही राहिले नसंते. असो मग **विठ्ठल**पंत **सिदो**पंताची व **उमाबाई**ची आज्ञा घेऊन व **श्रीविठ्ठलास** नमस्कार करून **पंढर**पुरांतून निघाले आणि **रामेश्वराचा** मार्ग क्रमण करूं लागले, इकडे **सिदोपंत** सह कुटुंब व **रखुमाबाई**स बरोबर घेऊन निघाले तों मार्ग उल्लंघन करीत **आळंदी** येथें स्वगृहीं येऊन पोहोंचले. तत्ववेत्ते जे पुरुष ते प्रपंचास उपाधी मानून एकांत सुखाचीच इच्छा करितात. पहा ते **विठ्ठल**पंत मातापित्यांचा व स्वकुटुंबाचा त्याग करून **पंढरपुरां**तून निघाले तों मार्गानें लागलेले **श्रीशैल, मल्लिकार्जुन, व्यंकटाद्री, शिवकांची, विष्णुकांची,** व **गोकर्णमहाबळेश्वरादि** तीर्थें करून **रामेश्वरास** प्राप्त झाले. तेथें **श्रीरामचंद्रानें** स्थापन केलेलें जें **लिंग** त्याचें दर्शन घेऊन **सेतुबंध** अवलोकन करून त्यास असें वाटलें कीं, आज आपला **रामेश्वर** पाहण्याचा हेतू **नारायणा**नें सिद्धीस नेला तेव्हां **विठ्ठल**पंत तेथून निघून परत येतांना **कोल्हापुरास** येऊन **पंचगंगे**चें स्नान करून **माहालक्ष्मीचें** दर्शन घेऊन **माहुली** व **वाई** वगैरे **कृष्णा**तीरचीं क्षेत्रें पहात पहात **आळंदी** येथें येऊन पोंहचले, मग **सिदो**पंतानें कुशल विचारलें. **रखु**-

सावाईस व उमाबाईस विठ्ठलपंतास पाहून फार आनंद झाला. नंतर तेथें तीन दिवस मोठ्या आनंदानें राहिल्यावर विठ्ठलपंताच्या मनांत आईबापाच्या दर्शनाविषयीं अत्यंत उत्कंठा उत्पन्न झाली. सिदोपंतास सांगितलें कीं, माझ्या भेटीसाठीं आईचे व बाबांचे प्राण कंठगत राहिले असतील. कारण ते फार वृद्ध झाले आहेत तर मला आपेगावीं जाण्याची परवानगी द्यावी. हें ऐकून सिदोपंतानें ही गोष्ट मान्य करून भाषण केलें कीं आपण आपल्या कुटुंबास बरोबर घेऊन जावें आणि मीही येतों. तुमच्यायोगानें मलाही त्यांच्या भेटीचा लाभ होईल. असा उभयतांचा संकेत झाल्यावर सिदोपंतानें व्याह्यास व विहिणीस सन्मानार्थ वस्त्रें भूषणें घेऊन निघण्याची तयारी केली. सुमुहूर्त पाहून विठ्ठलपंत रखुमाबाई व सिदोपंत या त्रिवर्गांनीं आपेगांवास जाण्याकरितां प्रयाण केलें. प्रत्यही मार्गक्रमण करीत श्रीक्षेत्रप्रतिष्ठान येथें येऊन एक दिवस तेथें वासकरून दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तेथून आपेगांव जवळ असल्याकारणानें स्नानसंध्यादि करून निघाले. इकडे गोविंदपंताच्या व निराबाईच्या शरीरांत पुत्रवियोग दुःखानें अस्थिमात्र राहिल्या होत्या. ज्या दिवशीं विठ्ठलपंत स्वगृहीं येणार त्या दिवशीं नित्यनेमाप्रमाणें गोविंदपंतानें उठून व मुखमार्जन करून पुत्राचा शोध करण्यासाठीं निघणार तों त्याचा दक्षिणनेत्र लवूं लागला व उजवा बाहूही स्फुरण पावूं लागला. हें पाहून त्यानें मनांत विचार केला कीं, मजला आज असे शुभ शकून कां होतात, मला असें वाटतें कीं, माझा विठू मला आज खचित भेटेल. त्यानें आपल्या स्त्रीस हांक मारून असें सांगितलें कीं, स्त्रिये आज आपल्याला विठू भेटणार असें मला शुभ शकुनावरून कळतें. हें ऐकून तिच्या नेत्रांतून अश्रु आले आणि बोलली कीं, आज आपणास विठू भेटेल काय? मग नारायणा तुझे उपकार सहस्रावधि जन्म घेतले तरी फिटावयाचे नाहींत. असा सुदिन मी केव्हां पाहीन कोणजाणे. विठूवांचून माझ्या शरीरांतून प्राण जाऊं पाहतात, बाळा मला एकदां भेट दे कोणाच्या मुखांतून अशीं अक्षरें ऐकेन कीं, "निराबाई तुझा विठू आलागे आला," त्याचें नारायण कल्याण करील. ईश्वरा तुला कशी माझी दया येत नाहीं. तूं माझ्या

विषयीं इतका निष्ठूर कां झालास ? सर्व लोक कृपासागर दीनवत्सल असें ह्मणतात, आणि माझ्यावरच दया कां कमी केलीस. असो, तुझी मर्जी. असें बोलून रडावयास लागते. मग गोविंदपंतानें तिचें शांतवन करून डोक्यास पागोटें घालून व हातांत काठी घेऊन प्रहर दिवसाच्या सुमारास विठूचा शोध करण्यासाठीं गांवांबाहेर दोन कोस पर्यंत येऊन, आलेल्या गेलेल्या पांथिकास विचारावें कीं, माझा विठू इकडे येत आहे असें तुम्हीं पाहिलें काय ? परंतु कोणी पाहिला जर नाहीं तर कोण सांगेल ? ह्याप्रमाणें चार घटिकापर्यंत तेथें शोध करून विठू कोणीकडून येता दिसेना असें पाहून अश्रु गाळित घरीं आले आणि मनांत विचार करूं लागलें कीं, मला आज शुभ शकून होतात, परतु विठू भेटत नाहीं काय करावें. विठू, वृद्ध झालेल्या बापाची तुला दया कशी येत नाहीं, इतका निष्ठूर कसा झालास हरहर ह्या जन्मांत मला विठू भेटत नाहींना ? नारायणा ज्या वेळेस मी गायत्रीपुरश्चरणें केलीं त्या वेळेस ब्राह्मणाच्या वेषानें स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, तुला एक पुत्र होईल आणि त्यापासून तीन पुत्र व एक कन्या होतील. तें स्वप्नांतील सर्व भाषण मिथ्या झालें कीं काय ? असें बोलून गोविंदपंत मूर्च्छना येऊन पडतात तों इतक्यांत विठलपंत रखुमाबाई सिदोपंतासहवर्तमान घरीं येऊन पोंहचले व त्या त्रिवर्गास पाहून गोविंदपंत मूर्च्छना सावरून म्हणाले कीं, अहो ? तुम्हीं माझा विठू पाहिला काय ? पाहिला असल्यास सांगा. विठूसाठीं माझे प्राण व्याकूळ होतात. असें भाषण ऐकून विठलपंताचा कंठ सद्गदित होऊन एकाएकीं गळ्यांत मिठी मारून ह्मणाले कीं बाबा मी आलों. माझ्याकरितां तुह्मास फार दुःख झालें व आई कोठें आहे असें वचन गोविंदपंताच्या कर्णांत पडतांच मग मोठ्या आनंदानें विचारलें कीं, कोण? विठूबाळा; आह्मास टाकून तूं कोणीकडे गेला होतास ? अरे तुला आमची दया कशी आली नाहीं. शाबासरे शाबास ! ! तूं मोठा निष्ठुर आहेस. तुझ्यावांचून आमची अवस्था कशी झाली हें एक परमेश्वरास ठाऊक आहे. ह्याप्रमाणें भाषण करून मोठ्यानें घरांत हांक मारून बोलिलें कीं, अग, विठू आलागे आला. हे शब्द स्त्रीयेनें ऐकिल्याबरोबर बाहेर धावतच आली. व विठलपंतानें आईस नमस्कार

करून मोठ्याप्रेमानें विचारलें कीं आई, तुझी प्रकृति चांगली आहेना? असें ऐकून ती नेत्रांतून अश्रु गाळितच ह्मणाली बाळा तूं फार दयाळू, आईच्या प्रकृतीची तुला फार काळजी, असी दुष्ट आई मेली असती तर फार बरें झाले असतें. विठू! मला ह्मातारीला घरांत टाकून तूं यात्रेस गेलास हें तुला चांगले वाटलें काय? असें दोन घटिकापर्यंत मुलाचें व आईचें प्रेमभरित भाषण होत असतां सिदोपंतानें रखुमाबाईस सासुला व सासऱ्याला नमस्कार करावयास सांगितलें. ती उभयतां मामंजी व सासूबाई नमस्कार करतें असें बोलून पलीकडेस उभीराहिली हें पाहून गोविंदपंतानें विचारलें कीं विठू? आह्मास नमस्कार करते ही बाई कोणरे? सिदोपंतानें सांगितलें कीं हें विठलपंताचें कुटुंब तुह्मा उभयतांची स्नुषा व मी व्याही आहें. नंतर त्यानें झालेलं वर्तमान सर्व निवेदन केलें. तें ऐकून जसें स्वयंवरांत अर्जुन द्रुपद राजानें केलेल्या पणास जिंकून द्रौपदीस बरोबर घेऊन आला तं पाहून कुंतीस जसा आनंद झाला त्याचप्रमाणें निराबाईस व गोविंदपंतास अत्यानंद झाला. त्यासर्वांनीं भोजनादि प्रकार करून मोठ्या आनंदानें तीन दिवस घालविले. सिदोपंतानें आणेलली वस्त्रेंभूषणें व्याह्यास व विहिणीस आर्पण करून आळंदीस घरी जाण्याची आज्ञा मागितली. आपल्या कन्येस भर्तृगृहीं कसें वागवावें हें सर्व सयुक्तिक सांगून त्यासर्वांची आज्ञा घेऊन निघाले तों मार्गक्रमण करीत आळंदीत आपल्या घरी येऊन पोहोंचले. इकडे आपेगांवीं विठलपंतानें सहकुटुंब मोठ्या आनंदानें मातापित्यांची आनन्यभावानें सेवा करून एक वर्षभर पर्यंत काळ घालविला. घरांत विपत्ति जरी होती तरी त्यानें फारसें दुःख केलें नाहीं. दुःखनकरणें हें ज्ञानी लोकाचें काम होय. त्यास असें वाटतें कीं आज उद्या कालांतरानें द्रव्य मिळेल व तें मिळणें प्रारब्धाधीन आहे. असा विचार करून तो विठलपंत द्रव्याविषयीं काळजी करीत नसे. त्यास विपत्तीचें स्मरण झालें ह्मणजे तो आचार्योक्ति मनांत आणी. श्लोकः—छिन्नोपिरोहति तरुश्चंद्रक्षीणोपि वर्धते लोके ॥ इति विमृश्यंतः संतः संतप्यंतेन लोकेस्मिन् ॥ १ ॥ असा विचार करून तो आपल्या अंतःकरणांत मोठें समाधान मानी. नंतर दुर्दैवानें त्या गांवांत तापाचा आजार सुरू झाला त्यायोगानें बहुत मनुष्यास

मृत्युसदन प्राप्त झालें. एके दिवशीं विठलपंताच्या मातोश्रीस ह्मणजे निराबाईस तापयेऊन संध्याकाळच्या सुमारास देवाज्ञा झाली. तें पाहून विठलपंतास फार दुःख झालें, त्यास असें वाटलें कीं माझ्या पासून ह्या जन्मीं मातोश्रीची सेवा व तिला सुख मिळालें नाहीं. असो; जगदीश्वराची इच्छा असा अनेक प्रकारचा विचार करून बंधुवर्गासी सहवर्तमानें आईचें शव घेऊन गांवांबाहेर जें स्मशान होतें त्याठिकाणीं आईची दहनादिक क्रिया करून घरी आले तों गोविंदपंताच्या शरीरास तोच आजार होऊन दुसरे दिवशीं प्रातःकाळीं ते परण पावले. मग तर विठलपंतास फारच दुःख झालें. त्यावेळस ते आपल्या मांडीवर तीर्थरूपाचें मस्तक घेऊन मोठा दुःखाचा सुस्कारा टाकून नेत्रांतून अश्रुगाळित ह्मणाले कीं बाबा, मला संसाररूप अरण्यांत एकटे सोडून आपण निघून गेला हें चांगलें केलें काय? मला तुम्हावाचून कोण आहे? कायहो चमत्कार? काल आईनें सोडिलें व आज बापानें सोडिलें. आतां बाबा ह्मणून मी कोणास हांक मारूं ईश्वरा!! माझ्यावर इतका कसा क्षोभ केलास. या ब्रम्हांडांत आईवाचून व बापावाचून सर्व पदार्थ सुलभ आहेत. माता व पिता मात्र पुन्हा मिळावयाचे नाहींत. कायहो मी चांडाळ? मातापित्याचा त्याग करून तीर्थयात्रेस गेलों व यत्किंचित् आईची व बाबांची दया आली नाहीं त्या वेळस बाबानां व आईला जें दुःख झालें त्या दुःखास कारण मीच होय. सर्वकाळ विठू विठू विठू असें मुखानें म्हणून सर्वांस विचारावें कीं अहो माझा विठू तुम्ही पाहिला काय? विठूवाचून सर्व मला शून्य दिसतें व अन्न पाणी कांहीं गोड लागत नाहीं. तुला खाण्यास कोण देईल, तुझी भुकेची वेळ झाली असेल असें रात्रंदिवस विठू या नामाची हातीं स्मरणमालाच घेतली होती आणि माझें विस्मरण आतां कसें झालें. बाबा; तुम्हाला मी कोठे पाहूं! आतां माझी दया कोण करील? याप्रमाणें रखुमाईस व विठलपंतास जें दुःख झालें त्याची गणनाच नाहीं. मग सर्व बंधुवर्ग येऊन विठलपंताचें समाधान करून गोविंदपंताचें शव घेऊन विठलपंतासहवर्तमान स्मशानांत येऊन पोहोंचले; नंतर ग्रामजोशी यास बोलावून विठलपंतानें आपल्या बापाचें दहन केलें. घरीं येऊन दहा दिवसपर्यंत अशौच धरून

त्यानें **और्ध्वदेहिक** क्रिया करण्यास आरंभ केला. चार दिवस मरणोत्तर क्रिया झाल्यानंतर **विठ्ठल**पंताचें मन प्रपंचाविषयीं फार उदासीन झालें. त्यास असें वाटलें कीं, आतां प्रपंच करून व द्रव्य संपादून काय करावयाचें आहे. परंतु काय करावें पायांत स्त्रीरुप शृंखला पडली आहे तर तिला सोडून कोठें जावें. कारण वेदविधीनें अग्नि ब्राम्हण साक्ष तिचें पाणिग्रहण केलें तस्मात् तिला सोडणें हें कर्म चांगलें नव्हें. असे अनेक उद्गार त्याच्या अंतःकरणांत स्फुरण पावू लागले. हें उदासीनत्व **रखुमाबाई**नें पाहून तिच्या मनांत असें येई कीं, हे कोणच्या वेळेस मला सोडून जातील याचा नेम नाहीं. कारण, जे मातापित्याचा त्याग करण्यास भ्याले नाहींत ते माझा त्याग सहजच करतील यांत संशय नाहीं. मग तिनें शेजारी राहणाऱ्या एका सद्गृहस्थाकडून असें पत्र आपले बापास लिहिलें कीं, इकडे मामुंजी व सासूबाई या दोघांस देवाज्ञा झाली त्या योगानें त्यांचें मन फार उदासीन झालें आहे तर पत्र दर्शनीं आपण माझ्या कल्याणाची इच्छा करीत असल्यास लवकरच निघून येणें अनमान करूं नये. अशा मजकुराचें पत्र तिनें एका गड्याच्या हातीं **आळंदीस** बापाकडे पाठविलें. तें पत्र घेऊन तो गडी निघाला तों पाच दिवसांनीं **आळंदीस** येऊन त्यानें **सिदो**पंतास तें पत्र दाखल केलें. तें पाहून त्यास फार वाईट वाटलें. त्यानें असा विचार केला कीं, मलाही मुलगा नाहीं व एक मुलगी आहे तर तिच्या प्रपंचाचीही व्यवस्था, काय करावें आतां आपण तेथें जाऊन **विठ्ठल**पंताचें समाधान करून त्यास येथें आणून गृहजामात करावे त्याशिवाय उपाय नाहीं. ते **सिदो**पंत आपल्या स्त्रीस सर्व वर्तमान सांगून व तिला विचारून निघाले ते **आपे**गांवीं कन्येच्या गृहीं येऊन पोहचले. **विठ्ठल**पंतानें आपल्या श्वशूरास पाहून मोठ्या दुःखानें झालेलें मातापित्याचें वर्तमान सर्व निवेदन केलें. तें ऐकून **सिदो**पंतानें त्याचें असें शांतवन केलें कीं, आतां तुह्मीं किती जरी शोक केला तरी **गोविंद**पंत व **निरा**बाई हे जिवंत होऊन पुन्हा दृष्टीस पडतील काय ? तर व्यर्थ शोक करणें तुह्मासारख्या ज्ञात्या पुरुषास योग्य नव्हे. अहो ! "जातस्यहि ध्रुवो मृत्यु र्ध्रुवं जन्म मृतस्यच तस्मादपरिहार्येर्थे नत्वंशोचितुमर्हसि" ॥ १ ॥ झालेल्या आकार

विशिष्टास निश्चयानें मृत्यु होणार व मृतास निश्चयानें जन्महीं होणार आहे तर अपरिहार्य गोष्टीविषयीं शोक करणें चांगलें नव्हे. व्यर्थ शोक करून शरीरास दुःखमात्र होतें असा अनेक रितीनें बोध करून त्यानें त्यास शेवटीं असें सांगितलें कीं मला ही तुमच्यावाचून कोणी नाहीं व माझ्याजवळ जें द्रव्य आहें तें सर्व तुमचेंच आहे, तर आपण **आळंदींत** स्वस्थ चित्तानें राहून माझ्या चोवीस गांवच्या कुळकर्णपणाची व्यवस्था पाहत जावी, हें माझें तुम्हांस विनयपूर्वक सांगणें आहें. ही गोष्ट **विठ्ठल**पंतास मान्य होऊन चार दिवस झाल्यानंतर आपलें जें राहते घर होतें तें एका चुलतभावास देऊन आपण सासूरवाडीस जाण्याची तयारी केली. **विठ्ठल**पंतानें आपल्या सर्व बंधुवर्गास विच्यारून सहकुटुंब **आळंदींत** अक्षय्यवास करण्याच्या हेतूनें **सिदो**पंतासहवर्तमान **आपे**गांवातून निघून मार्ग क्रमण करीत लवकरच **आळंदींत** येऊन पोहचले. कन्या जामात पाहून **उमा**बाईस फार सुख वाटलें. कारण कन्येच्या कल्याणाची इच्छा सर्वांसच असतें. त्यांतून बापापेक्षां आईस तर फार असते. ते **विठ्ठल**पंत त्या श्वशुरगृहीं दुःखांत सुख मानून वास करीत असतां कांहीं दिवसांनीं **रखुमा**बाईस ऋतु प्राप्त झाल्यावर **सिदो**पंतानें मोठ्या उत्साहें करून तिचें सुमुहूर्त पाहून ओटीभरण केलें. नंतर **विठ्ठल**पंतानें सात वर्षेपर्यंत तेथें स्त्रीसहवर्तमान अंतःकरणांत सुख मानून दिवस घालविले. परंतु त्यास संतती कांहीं होईना हें पाहून **विठ्ठल**पंताच्या मनोवृत्तीस पुन्हा पश्चात्ताप उत्पन्न झाला. त्यास असें वाटलें कीं विषयलंपट होऊन प्रपंच करणें हें केवळ नरकाचें साधन होय. हर हर !! मी प्रपंचाच्या उपाधींत पडून व्यर्थ स्वहितास अंतरलों. **विठ्ठल**पंता ! तुझें ज्ञान काय व तूं पूर्वी नारायणाचें एकाग्र वृत्तीनें कसें चिंतन करीत होतास, व आतां काय करितोस असा कांहीं विचार कर, अगदीं विषयसुखांत गर्क होऊन कुतर्क वाढवून नरकाची सामुग्री मात्र संपादन केलीस, वेदाध्ययन व शास्त्राचा अभ्यास विषयलंपट होण्यासाठींच केला काय ? हें तुला कसें कळत नाहीं, असा तो आपण आपल्या मनालाच बोध करी. पुन्हा असें वाटें कीं स्वप्नांत स्वामींनीं येऊन सांगितलें तें मिथ्या कीं काय ? किंवा माझें ब्रह्मचर्य भ्रष्ट होण्यासाठींच ईश्वरानें असें

मिथ्या स्वप्न दाखविलें काय? कायहो! **ग्रहाणां चरितं स्वप्नो निमित्तान्युपयाचितं ॥ फलंतिकाकतालीयंतेभ्यःप्राज्ञोनबिभ्याति ॥** ॥ १ ॥ अर्थ—**शनी, मंगल, राहू, केतू** इत्यादि ग्रहांचें चरित्र ह्मणजे शुभ किंवा अशुभ स्थानीं येऊन फल देणें, व शुभ स्वप्न किंवा अशुभ स्वप्न व अनिमित्त ह्मणजे सुशकून व अपशकून व उपयाचित म्हणजे नवस हें सर्व काकत्तालीय न्यायानें फल देतात. ह्यापासून प्रज्ञावंत भय पावत नाहींत असें ब्रहस्पतीनें न्याय शास्त्रोक्त भाषण मला माहीत असतां त्या वेळेस मला भ्रम होऊन कसा मी त्या स्वप्नावर विश्वास ठेऊन व्यर्थ उपाधींत पडलों. असे अनेक उद्गार त्याच्या अंतःकरणांत येऊन त्यानें असा निश्चय केला कीं, आतां गृहीं वास करून सोय नाहीं. एक कुटुंबाच्या उदर भरणाविषयीं चिंता करावी तर यावत् तिचा देह आहे तावत् **सिदो**पंताकडून तिला अन्नवस्त्रास कांहीं कमी पडणार नाहीं, तिची काळजी करावयास नको. आपणास काय करावयाचें त्याचा मात्र विचार केला पाहिजे. शेवटीं त्यानें कोठेंतरी ग्रामांतरीं जाऊन सन्यासदीक्षा धारण करावी असा विचार केला परंतु सन्यास घेण्यास स्वस्त्रीची आज्ञा लागते, तिच्या आज्ञेवांचून संन्यास घेणें युक्त नव्हें. ह्या गोष्टीला कांहीं दिवस झाल्यानंतर त्या गांवांत एक **सन्यासी** तीर्थ भ्रमण करीत प्राप्त झाला. त्याची व **विठल**पंताची गाठ **इंद्रायणी**च्या तीरावर पडली. **विठल**पंतानें हा कोणी महा सिद्ध आहे यास आपलें मनोगत कळवावें, असें जाणून त्यास नमस्कार करून मोठ्या नम्रतेनें भाषण केलें कीं, **महाराज** मी फार पातकी आहे व माझा उद्धार कसा होईल, कोणास शरण गेले असतां ते मला जन्ममरणा पासून मुक्त करतील तें सांगा. हें त्या संन्याशानें मुमुक्षु दशेतील भाषण श्रवण करून सांगितलें कीं, **काशिक्षेत्रीं राम.नंद** या नांवाचे स्वामी आहेत ते वेदशास्त्रादि शद्बब्रह्मांत निपूण असून आपल्या क्रियोत्कर्षानें अनुभव ब्रह्मांतही निष्णात आहेत. अशा महासिद्धास शरण गेले असतां ते मात्र संसृति बंधांतून मुक्त करितील यांत संदेह नाहीं. असें बोलून तो संन्यासी त्या गांवांतून निघून जाता झाला. मग त्याच रात्रीं **विठलपंतानें** आपल्या **स्त्री**स विचारलें कीं, स्त्रिये तुला ऋतु प्राप्त होऊन सहा **वर्षे** झालीं. अद्यापि संतति होत नाहीं तर

मला वाटतें कीं काशीस जाऊन सन्यास घ्यावा, आणि त्या योगानें देहाचें सार्थक करावें. परंतु या गोष्टीविषयीं तुझी आज्ञा मात्र पाहिजे. हें ऐकून ती त्यास कांहींच बोलली नाहीं. दुसरें दिवशीं तिनें तें वर्तमान आपल्या बापास कळविलें. सिद्धोपंतानें कन्येस [रखुमाबाईस] असें सांगितलें कीं, तुला आज रात्रीं विठ्ठलपंतानें कालच्याप्रमाणें विचारलें तर तूं त्यानां असें सांग कीं मला पुत्र झाल्यावाचून आज्ञा देणें योग्य नाहीं व माझ्या आज्ञेवाचून तुह्मास सन्यास घेणें श्लाघ्य नव्हें. कारण ज्या वेळेस माझें पाणिग्रहण तुम्हीं केलें त्यावेळेस अग्नि, ब्राह्मणसाक्ष असा संकल्प सोडला कीं प्रजोत्पादनार्थ इचें पाणिग्रहण करितों. आतां इच्या आज्ञेचें उल्लंघन करून कांहीं एक वर्तन करणार नाहीं. त्या वेदविधीस बाध लावून सन्यास घेणें हें तुह्मास योग्य दिसते काय? त्यानें विचारल्यानंतर तूं त्यास असें उत्तर दे. ह्याप्रमाणें बापाचें शिक्षण रखुमाबाईनें ध्यानांत ठेवून मग त्याच रात्रीं एकांती विठ्ठलपंतानें तिला पुनरपि सन्यास धारण करण्याची गोष्ट विचारल्यानंतर तिनें बापानें सांगितल्याप्रमाणेंच उत्तर दिलें, कीं, मला पुत्र झाल्यावाचून मी तुह्मास आज्ञा देणार नाहीं व माझ्या आज्ञेवाचून तुह्मास सन्यास घेणें युक्त नव्हें तर अधीं माझें पुत्ररूप ऋण फेडावें आणि मग सन्यास घ्यावा. हें ऐकून विठ्ठलपंताच्या मनांत कोणच्याही निमित्तानें इच्या मुखांतून तुह्मी जा असीं अक्षरें निघाली पाहिजेत असा विचार करून पुनः असें भाषण केलें कीं स्त्रिये बरें तर सन्यास घेण्याविषयीं आज्ञा देत नाहींस तर तीर्थयात्रेविषयीं तरी दे; मग कांहीं अडचण नाहींना? हें ऐकून मात्र ती स्तब्ध राहिली. असें विठ्ठलपंतानें नित्यशः आपल्या स्त्रीस विचारावें. एके दिवशीं रखुमाबाई श्रांत होऊन निद्रिस्त झाली असतां त्यानें तिला जागृत करून तोच प्रश्न केला, कीं, स्त्रिये मला तीर्थयात्रा करण्यास तरी आज्ञा दे. हें ऐकून तिला असें वाटलें कीं ही याची नेहमी कुरकुर आहे. मग तिनें त्रासयुक्त होऊन असें भाषण केलें कीं तुह्मी सन्यास घ्या किंवा यात्रेस जा. मला कांहीं विचारूं नका, हें भाषण श्रवण करून, मग काय? त्यास "पडल्या फळाची आज्ञा" ह्या ह्मणीप्रमाणें झालें. त्यानें त्याच रात्रीं रखुमाबाईस

झोंप लागल्यानंतर आपण आंगावर एक उपवस्त्र घेऊन घरांतून बाहेर निघाले ते सन्यासदीक्षा धारण करण्याच्या हेतूनें मार्गक्रमण करीत अनेक देशांचें अवलोकम करून काशीक्षेत्रांत येऊन रामानंदस्वामाच्या आश्रमांत प्राप्त झाले. त्यानें स्वामीस साष्टांग प्रणिपात करून आपलें वर्तमान असें सांगितलें कीं मी अपेगांवीं रहाणारा यजुर्वेदी ब्राह्मण आहे. माझें नांव विठ्ठल व तेथें माझी वृत्ति कुळकर्णपणाची आहे. घरांत मातापिता कुटुंब वगैरे मंडळी बहुत होती, परंतु एक वर्ष झालें मरण पावली. त्या योगानें किंवा घरांत फार विपत्ति असल्यामुळें माझें मन त्या दिवसापासून प्रपंचाविषयीं उदासीन होऊन अंतःकरणांत पश्चाताप उत्पन्न झाला. मला असें वाटलें कीं मी कोणास शरण जाऊं व मला जन्म मरणांतून कोण मुक्त करील. असें नित्य चिंता करीत असतां एकदां साधुमुखांतून आपली कीर्ति श्रवण केली कीं, काशीक्षेत्रीं महासिद्ध रामानंदस्वामी आहेत त्यास शरण गेलें असतां ते मात्रभवपाशांतून सोडवितील असें ऐकिल्या पासून माझ्या मनांत आपलें दर्शन व उपदेश केव्हां होईल असें झालें. तो चिंतित फलप्राप्तीचा सुदिन ईश्वर कृपेनें आज अवलोकन केला. तर आतां कृपा करून माझ्या मस्तकावर हस्त ठेऊन कृतार्थ करावें. हस्त ठेऊन मस्त झालेल्या अहंकार रूप गजास त्रस्त करून फस्त करावें ही माझी आपणास कृपादान करण्याची प्रार्थना आहे. असें चतुरपणाचें भाषण श्रवण करून स्वामीस परम संतोष होऊन असें वाटलें कीं, हा कोणी सत्यत्वें करून मुमुक्षु दर्शेताल आहे. स्वामीनीं त्याची विशेष चौकशी न करितां त्यास विचारिलें कीं तुला केवळ उपदेशच घ्यावयाचा आहे किंवा सन्यास दीक्षा धारण करावयाची आहे तें सर्व सांग. असें ऐकून त्यानें स्वामीस उत्तर दिलें कीं मला सन्यासदीक्षा घेऊन उपदेशही घ्यावयाचा आहे. हें वचन स्वामीनीं मान्य करून मग वेदज्ञ ब्राह्मण व कांहीं स्वसंप्रदायी सन्यासी झालेले या सर्वांस बोलावून स्वामीनीं विठलपंतास बसवून विरजाहोमादि संस्कार करून दंड कमंडलू देऊन उपदेश केला. शिखा सूत्रचा त्याग करून सन्यासदीक्षा धारण केल्यावर रामानंद स्वामीनें विठलपंताचें नांव चैतन्यस्वामी असें ठेविलें. सर्व शिष्यांत स्वामीची प्रीति चैतन्यावर फारच असे. ह्याप्रमाणें विठलपंतानें आपल्या

शरीराची अशी व्यवस्था केली. इकडे ज्या रात्रीं **विठलपंत आळंदातून** निघाले ती रात्र गेल्यावर दुसरे दिवशीं पाहाटेस **रखुमाबाई** जागृत होऊन शेजारी पहाते तों नवरा नाहीं. ते पाहून ती आपल्या अंतःकरणांत विचार करूं लागली कीं, तें रात्रौ बोलल्याप्रमाणें यात्रेस तर गेले नाहींना ? ती खोलीतून बाहेर येऊन आपले आई बापास विचारूं लागली कीं ते कोणीकडे गेले हें तुह्मीं पाहिलें काय ? हें ऐकून **सिदे**पंताच्या मनाची खात्री झाली कीं, **विठल**पंत आपल्या कन्येस वियोगाग्नींत ढकलून ते यात्रेस गेले यांत संशय नाहीं. त्यानें **विठल**पंताचा शोध गांवाबाहेर असमंताद्भागीं पाच कोसावर जाऊन केला, परंतु कोठेंही शोध लागेना, तेव्हां ते आपल्या कन्येचें फार वाईट झालें असें मनांत आणून नेत्रांतून अश्रुगाळीतच घरीं आले, आणि **रखुमाबाई**स ह्मणाले कीं, मुली, आह्मी आपल्याकडून तुझ्या कल्याणाविषयीं कांहीं कमी प्रयत्न केला नाहीं; परंतु तुझ्या दैवांत पतीपासून सुख नाहीं त्यास आह्मी काय करावें ; कारण आम्ही जन्म देण्याचे धनी, कर्माचे कांहीं धनी नव्हेत. हे शब्द तिच्या अंतःकरणांत खड्गाप्रमाणें लागून मग तिनें आपल्या खोलींत बसून मोठा दुःखाचा सुस्कारा टाकून नेत्रांतून अश्रुगाळीतच म्हणाली कीं अहो मला आपण टाकून गेलांत हे तुम्हास योग्य दिसले काय ? व तुमची सेवा मला तिलमात्र ही घडली नाहीं असें बोलत असतां तिला रात्रौ एकांतीं भाषण केल्याचें स्मरण होऊन म्हणाली कीं हरहर ! काय हो मी दुष्ट, रात्रौ त्यानीं विचारलें असतां ह्या जिव्हेनें मी तुम्ही यात्रेस ना किंवा सन्यास घ्या असें बोललें. सटवे जिव्हे ! तुझे शतशः तुकडे कां झाले नाहींत, माझ्या व प्राणनाथाच्या वियोगास तूंच कारण आहेस. तुझ्यानें अशीं अक्षरें तरी कशीं काढवलीं ? तुला त्यांची प्रकृति माहीत होती किंवा नाहीं, असो तिला तरी काय ह्मणावें हा सर्व दोष माझाच आहे. मी जर त्रासानें असें भाषण केलें नसतें तर काय झालें असतें. लग्नाच्यावेळेस सर्व लोक मला असें म्हणत होते कीं **रखुमाबाई**, तुला नवरा वेदज्ञ व शास्त्रज्ञ फार चांगला मिळाला आहे, परंतु मीच दुर्दैवाची मला तरी अशा नवऱ्यापासून कसें सुख मिळेल ? ब्रह्मदेवा ! माझ्या ललाटीं प्राणनाथाच्या वियोगाचीं अक्षरें लिहितांना तुझी लेख-

णी हातांतून खालीं कशी पडली नाहीं? आमच्या सारख्या गरीब निराधारी स्त्रियांची दया तुला कशी आली नाहीं? तस्मात् तूं फार कृतघ्न आहेस. तुझ्यावर तरी दोषारोप करणें योग्य नव्हे. कारण माझेंच प्रारब्ध खोटें. मी पूर्व जन्मी महासाध्वी स्त्रीचा व पतीचा वियोग केला असावा, त्याचें हें फळ प्रस्तुत ह्या जन्मी भोगीत आहें. अहो प्राणपती! काल माझ्या बोण्याचा तुह्माला फार राग आला असेल तर क्षमा करावी. मी तुमची अनाथ दासी आहे, दासीवर इतका कोप करणे हें युक्त नव्हें आपण सोडून जाणार असें मला त्यावेळेस कळते तर मी पदराला धरून तुमच्या बरोबर आलें असतें असें बोलतांनां ती मूर्छना येऊन पडली. दोन घटिका झाल्यानंतर **रखुमाबाई** कांहीं सावध होऊन ह्मणते कीं अहो तुह्मी मला सोडून कोठें चालला. मी तुमच्या बरोबर येते. माझ्या आज्ञेवाचून तुह्मास संन्यास घेणें योग्य नव्हें. असें बोलून डोळे उघडून पहाते तों समोर **विठ्ठलपंत** दिसेना? मग तर फारच घाबरली आणि उच्चस्वरानें ह्मणाली कीं **नारायणा**? तूं तरी कृपादृष्टीनें मजकडे अवलोकन कर. काय करावें हें सुचत नाहीं. मला असें वाटतें कीं, **इंद्रायणीं**त प्राण त्याग करावा, परंतु आत्महत्येचें पातक लागेल. बरें तें तरी मलाच भोगावें लागणार. तसे न केल्यास नवऱ्यावाचून स्त्रियाचें वांचणें व्यर्थ होय. कायरे मना तुला तरी धीर किती देऊं कारण लग्नापासून कधींही सुहास्य वदन करून त्यानें मजककडे पाहिलें नाहीं, व मोठ्या आनंदानें बसून विनोदानें भाषण कधीं केलें नाहीं. सदा उदास वृत्तीनेंच रहावें आतां प्रपंचांत कोणाचें सुख मानून वास करावा. अरे पण मना? धीर सोडूं नको. माझ्यापेक्षां **श्रीरामाचा** वियोग झाल्यावर **सीतेस** किती दुःख झालें असेल बरें? तिनें तर सहा महिनें राक्षसाच्या मंडळींत राहून दुःखें भोगिलीं व तिच्यापेक्षांही **दमयंतीस** व **हरिश्चंद्राच्या तारेस** तर फारच निर्जल अरण्यांत राहून दुःख भोगावें लागलें असा कांहीं विचार कर. असा ती आपल्या मनास बहूत बोध करी, परंतु नवऱ्याच्या वियोगाचें दुःख असह्य होऊन तिनें उच्चस्वरानें हांक मारून ह्मणावें कीं अहो मला टाकून तुह्मी कोठें गेला? ह्या अनाथ दासीची करुणा तुह्मास कशी आली नाहीं. असें बोलून पुन्हा रडावयास लागे, तो

उच्च रूदनस्वर **सिदो**पंतानें व **उमा**बाईनें ऐकून त्या खोलींत **रखुमा**-बाईचें जवळ जाऊन उभयतांनीं तिचे बहुत प्रकारें शांतवन केलें, तरी तिला पतीचें स्मरण झालें ह्मणजे वारंवार पोटांतून उमाळे येत असत. **सिदो**पंतानें तिचें नित्य वरचेवर समाधान करून **विठल**पंताचा शोध लागण्यासाठीं आपले दूत लांबलांबचे देशावर पाठविले. ह्या गोष्टीला कांहीं दिवस झाल्यानंतर त्यापैकीं एका दूतानें **काशीस** जाऊन **रामानंद** स्वामीचे आश्रमांत **विठलपंत** सन्यासी झालेलें अवलोकन केलें, त्यानें त्यास पूर्णपणें ओळखून निघून परत तो **आळंदींत** येऊन पोहोंचला. त्यानें तें **विठल**पंताचें वर्तमान **सिदो**पंतास श्रुत केलें. तें ऐकून **रखुमा**बाईस अत्यंत दुःख झालें. तिला असें वाटलें कीं आतां तर त्यांच्या भेटीची आशाच राहिली नाहीं. असो, ईश्वरा तुझी मर्जी आतां सर्व विचारच खुंटले. तिनें आपल्या मनाचें समाधान करून देहाचें सार्थक व्हावें ह्मणून **श्रीसिद्धेश्वरा**च्या देवालयाच्या उत्तरेस सरोवराच्या काठीं एक अश्वत्थ होता त्यास सर्व लोक सुवर्णअश्वत्थ म्हणजे सोन्याचा पिपळ असें म्हणतात, त्याला **रखुमा**बाईनें नित्य सहस्रप्रदक्षिणा करण्यास आरंभ केला, व आलेल्या साधुवृंदांची स्वदेह कष्टानें सेवा करून कालक्रमण करूं लागली. काय हो चमत्कार ? इकडे ही महासाध्वी पतीच्या विरहदुःखानें कृश होऊन अश्वत्थप्रदक्षिणा व सत्पुरुषांची सेवा करते, आणि तिकडे ते **विठल**पंत सन्यासदीक्षा धारण करून नित्य पुढीच्या भोजनांत निमग्न होऊन अध्यात्मशास्त्रानें लग्नाच्या स्त्रीचें त्यास विस्मरण झालें. या गोष्टीला पांच वर्षें गेल्यानंतर **काशीक्षेत्रीं रामानंद**स्वामीच्या मनांत पृथ्वीवर जे अनेक तीर्थीं सत्पुरुष वास करितात त्यांचें दर्शन घेऊन व सत्कर्म करून देहाचें सार्थक करावें, अशी उत्कंठा उत्पन्न झाली. कारण **ब्रम्हैवाहं जगद्ब्रम्हचेत्थं ज्ञानपरोभवत् ॥ तथापितेननत्याज्याःसत्संगोपासनादायः ॥ १ ॥** ह्या आचार्योक्तिप्रमाणें **अहंब्रम्ह** व **जगद्ब्रम्ह** असें ज्ञान जरी झालें तरी सत्समागम व परमात्म्याची उपासनादि कधींही टाकूं नये. असा विचार **रामानंद**स्वामीनें करून दोन शिष्ये बरोबर घेऊन मार्गांत लागलेल्या तीर्थांचें स्नान व दैवतांचीं दर्शनें, सत्पुरुषांचें अध्यात्मभाषण श्रवण करीत अनेक देशांचें अवलो-

कन करून **आळंदीस** येऊन पोहचले. वेदशास्त्रनिपुण व अध्यात्म ज्ञानविशारद परमहंस असे जे **रामानंद**स्वामी ते **आळंदींत** आल्यानंतर प्रथम **इंद्रायणीचें स्नान** करून त्या दोन शिष्यासहवर्तमान जगदीश्वर **नारायण** या नामाचा उच्चार करीत **श्रीसिद्धेश्वरास** नमस्कार करून सव्य प्रदक्षिणा घालून सरोवराच्या कांठीं ज्या ठिकाणीं सुवर्णअश्वत्थ होता तेथें ते प्राप्त झाले. त्या वेळेस त्या अश्वत्थास **रखुमा**बाई नित्य नियमाप्रमाणें सहस्र प्रदक्षिणा घालीत होती. तिनें महा तेजःपुंज स्वामीस अवलोकन करून हा कोणी तपस्वी सिद्धपुरुष आहे, असें अंतःकरणांत जाणून स्वामीस साष्टांग नमस्कार केला. स्वामीनें तिच्या हातांत कंकणें व कपाळीं कुंकुम पाहून ही कोणी ब्राह्मणाची सभर्तृका स्त्री आहे, ह्मणून "सौभाग्यवती पुत्रवती भव" असा आशीर्वाद दिला. तें आशिर्वचन **रखुमा**बाईनें ऐकून तिच्या नेत्रांतून अस्खलित अश्रुधारा वाहूं लागल्या. तिनें आपल्या मनांत असा विचार केला कीं, आतां हा "पुत्रवती भव" असा स्वामीचा आशीर्वाद काय फल देणार ? कारण पतीनें तर मला संसारअरण्यांत सोडून सन्यास धारण केला आहे, असें मनांत येऊन अश्रुबिंदु गाळीतच ती स्तब्ध उभी राहिली. तें पाहून स्वामीच्या अंतःकरणांत दयासमुद्राचे तरंग उच्छृंखल होऊन स्वामीनें तिला असें विचारलें कीं माझ्या आशीर्वचनापासून तुझ्या मनास इतकें दुःख कां झालें. तुला संपत्ति व संतति इत्यादिपैकीं काय कमी आहे तें सर्व सांग. कारण माझ्या आंगीं **इंद्रादि** देवांचें राज्य व **ब्रम्हा विष्णु महेशा**प्रमाणें पुत्र देण्याचें सामर्थ्य ईश्वरानें दिलें आहे, तर तूं दुःख करूं नकोस, निःशंक मनानें सर्व वर्तमान निवेदन कर. हें ऐकून मोठ्या विनयानें तिनें स्वामीस असें भाषण केलें कीं माझ्या पतीनें मला न विचारितां व संततीजन्य सुख न देतां सन्यास धारण केला, व आपण तर "पुत्रवती भव" असा आशीर्वाद दिला आहे, तर मला पुत्र पतीवाचून कसे होतील ? हें ऐकून स्वामीनीं विचारिलें कीं तुझी आज्ञा न घेतां व संतती उत्पन्न न करितां जर तुझ्या पतीनें सन्यास धारण केला असेल तर मी तुझ्या पतीच्या गुरूस शिक्षा देऊन तुझा पती तुझ्या स्वाधीन करीन, ह्मणून तुझ्या पतीचें व त्या गुरूचें नांव सांग.

तिनें सांगितलें कीं महाराज **काशीक्षेत्रीं** कोणी **रामानंद** या नावाचा स्वामी आहे, त्यानें माझ्या पतीस सन्यासदीक्षा दिली आहे. हें तिचें भाषण स्वामीनीं श्रवण करून मनांत विचार केला कीं ही बाई तर माझेंच नांव घेती आाणि इला मीच "पुत्रवती भव" असा आशीर्वाद दिला आहे, तर सर्वस्वी यांत अपराधी मीच ठरतों, आतां कोणी कोणास शिक्षा करावी. बरें, शोध तर करूं. स्पष्टपणें स्वामीनें विचारलें कीं तुझ्या घरीं तुझें मातापिता आहेत काय? असल्यास मी येथेंच उभा आहें, त्यांनां इकडे घेऊन ये, मग तिनें मोठ्या आनंदानें आपल्या बापास ह्मणजे **सिदोपंतास** सर्व वर्तमान सांगून स्वामीसन्निध घेऊन आली. **सिदोपंतानें** स्वामीस नमस्कार करून मोठ्या नम्रतेनें भाषण केलें कीं, महाराज, आपण कोण व कोणच्या स्थलीं वास करून भूमीस पवित्र करीत अहात, व मजवर माझे कन्येकडून बोलविण्याचा अनुग्रह कां केला, हें सर्व प्रसाद करून मला निवेदन करावें. स्वामीनें त्यास उत्तर दिलें कीं ह्या देहाला **रामानंद**स्वामी असें ह्मणतात, व माझें वास्तव्य **काशीक्षेत्रीं** आहे, मी इला दिलेलें आशीर्वचन सत्य करण्यासाठीं इच्या पतीच्या खुणा पुसाव्या ह्मणून तुह्मास बोलाविलें आहें, तर तुह्मी इच्या पतीचें स्वरूप कसें आहें व त्याची नासिकादि इंद्रियें कोणाच्याप्रमाणें आहेत व त्याचें नांव काय हें सर्व सांगा! **सिदोपंतानें** आपल्या घरीं स्वामीनीं भोजन करावें ह्मणून मोठ्या आग्रहानें शिष्यासहवर्तमान स्वामीस आपल्या गृहीं आणून, स्वामीचे भोजनादि प्रकार झाल्यावर त्यानें स्वामीस सर्व **विठ्ठल**पंताच्या स्वरूपाच्या खुणा, आईबापाचें वर्तमान व नांव हें सर्व निवेदन केलें. स्वामीनें त्यास असें सांगितलें, कीं तुह्मास आपल्या जामाताचें आगत्य व कन्येचें कल्याण व्हावें असें इच्छित असल्यास तुह्मी कन्येसह माझ्याबरोबर **काशीस** चलावें. तेथें आल्यास तुमचा जामात तुमच्या कन्येच्या स्वाधीन करीन. मग अतिआनंदानें स्वामीच्या वचनावर विश्वास ठेऊन त्यानें आपल्या स्त्रीस विचारून कन्येसह **काशीस** जाण्याची तयारी केली. दुसरे दिवशीं कन्येसह **सिदोपंत** व शिष्यासह **रामानंद** स्वामी हे सर्व **आळंदीतून** निघून मार्गक्रमण करीत कांहीं दिवसांनीं **काशीस** येऊन पोहोंचले. **रामानंद**स्वामीनीं त्या मंडळीसह आपल्या

मठांत येऊन **चैतन्य**स्वामीचा शोध करून **सिदो**पंतास कन्येसह एका खोलींत बसवन दोन शिष्याहातीं **चैतन्यास** पाचारण केलें. ते शिष्य **चैतन्य**स्वामीच्या मठांत जाऊन तुह्मास गुरूनें पाचारिलें आहे, असें सांगून आपल्याबरोबर घेऊन आले. **चैतन्यानें** आपल्या मनांत विचार केला कीं, **सद्गुरु** यात्रा करून लवकर कसे परत आले व मला बोलिवण्याचें कारण काय असावें, माझ्या कुटुंबाची आणि **सिदो**पंताची मध्येंच गाठतर पडली नसेलना? असो; तेथें गेल्यावर सर्व कळेल. नंतर **सद्गुरुच्या** मठांत येऊन **सद्गुरुस** साष्टांग प्रणिपातकरुन ते **चैतन्य**स्वामी मोठ्या मर्यादानें पलीकडे उभे राहिले. हें पाहून **रामनंद** स्वामीनें आरक्त नेत्र करून मोठ्या क्रोधानें त्यास विचारलें कीं रे कुटिल शिरोमणे परदुःखानाभिज्ञ **चैतन्या** माझी वंचना करून व माझ्या जवळ असत्य बोलून सन्यास दीक्षा धारण केलीस हें तुला योग्य वाटलें काय? आतां तुझ्या घरीं कोण कोण आहेत व सन्यास धारण करण्याविषयीं प्रजोत्पादन करून स्वस्त्रीची आज्ञा घेतलीस किंवा नाहीं तें सर्व सांग, न सांगशील तर माझ्या शापानें तूं दग्ध होशील. तेव्हां मोठ्या नम्रतेनें **चैतन्य**स्वामीनें सांगितलें कीं, **महाराज, सद्गुरु,** माझ्यावर इतका कोप करूं नका, क्षमाकरा, मी तुह्मास सर्व वर्तमान सांगतों. माझ्या घरीं कुटुंब आहे व मी श्वशुरगृहीं राहत असून मला संतती होईना ह्मणून मी कुटुंबास विचारून आपल्याकडे येऊन सन्यासदीक्षा धारण केली. हें ऐकून गुरूनें पुनः विचारिलें कीं कुटुंबाची आज्ञा घेतलीस याला प्रमाण काय? तिला येथें तुझ्यासमक्ष आणल्यास तिच्या मुखांतून मी आज्ञा दिली असें वदविशील? **चैतन्यानें** सांगितलें कीं होय. मग स्वामीनें हांक मारून **सिदो**पंतास बाहेर बोलविलें. **सिदो**पंत कन्येस घेऊन बाहेर आल्यावर स्वामीनीं **रखुमा**बाईस विचारलें कीं हाच कां तुझा नवरा? व तूं याला सन्यास घेण्याविषयीं आज्ञा दिलीस? **विठ्ठल**पंताची व **रखुमा**बाईची नजरानजर एक झाल्यावर ती प्रेमभरित सद्गदित कंठ होऊन बोलली कीं महाराज मी आपल्या पायापाशीं सत्य सांगतें. यानीं मला प्रथम सन्यास घेण्याविषयीं विचारल्यावर मी यांना असें उत्तर दिलें कीं मला संतती झाल्यावाचून तुम्हास सन्यास घेणें

योग्य नव्हें. पुढें यानीं सन्यास हीं अक्षरें सोडून तीर्थयात्रेविषयीं विचारलें. त्यावर मी कांहींच उत्तर दिलें नाहीं, त्याला तीन दिवस झाल्यानंतर मी गृहकर्मानें श्रांत होऊन निद्रिस्त झालें असतां यानीं मला जागृत करून तीर्थयात्रेविषयीं विचारिलें. त्या वेळेस श्रांतत्वामुळें कांहीं निद्रा व कांहीं जागृती अशा अवस्थेंत काय भाषण केलें त्याची मला स्मृति नाहीं. परंतु मला असें स्मरतें कीं तुह्मी यात्रेस जा किंवा सन्यास घ्या मला कांहीं विचारूं नका. असें निश्चयानें त्यावेळेस भाषण केलें असावें. त्यांत मला कांहीं विचारूं नका. ह्या शद्बाचा मी आपल्या मनोत्साहानें आज्ञा दिली असावी असा अर्थ होतो काय ? हें आपणच सांगा, मग स्वामींनीं **चैतन्यास** विचारिलें कीं, **चैतन्या** ! ही **रखुमाबाई** जें भाषण करितें तें सत्य आहे काय ? खरें असल्यास तुझें हें सन्यास दीक्षा गृहण करण्याचें कर्म अनुचित होय. ते **चैतन्य**स्वामी, इनें जें भाषण केलें तें सर्व सत्य आहें असें बोलून गुरूच्या शाप भीतीनें स्तब्ध उभे राहिले. गुरूनें **चैतन्यास** असें सांगितलें कीं माझी आज्ञा तुला वेदाज्ञापेक्षांही अधिक आहे, तर तूं सन्यास गृहण जरी केलेस तरी पुनरपि इच्या बरोबर तुला गृहस्थाश्रम केला पाहिजे. ही माझी आज्ञा जरी वेदशास्त्रबाह्य व लोकांत असें विपरीत कधींही घडलेली नाहीं अशी आहे तरी ही तुझ्या व लोकांच्या कल्याणार्थ होय. कारण इच्यापासून जे तुला पुत्र होतील ते महापुरुष होऊन लोकांस उपदेश करून कल्याण करतील, हे तुला माझें वरप्रदान होय. आतां विलंब न करितां इचा स्वीकार करून सुखानें गृहस्थाश्रम कर. **विठ्ठल**पंतानें सद्गुरुच्या वचनावर विश्वास ठेऊन गुरूसमक्ष शिखा सूत्राचें धारण करून आपल्या स्त्रीचें [ **रखुमाबाईचें** ] पाणिगृहण केलें. तें पाहून **सिदो**पंतास व **रखुमा**बाईस फार आनंद झाला. तीन दिवस पर्यंत तेथें राहून ते **विठ्ठल**पंत सहकुटुंब **सिदो**पंतास बरोबर घेऊन सद्गुरू **रामानंदस्वामीस** नमस्कार करून तेथून निघाले. ते मार्ग क्रमण करीत कांहीं दिवसांनीं **आळंदी** येथें येऊन पोहचले. या ठिकाणीं मोठ्या आनंदानें कालक्रमण करीत असतां ग्रामस्थ **ब्राह्मणांनीं** **विठ्ठल**पंतावर ग्रामण्य केलें. त्या ग्रामण्यांत सर्व आलेल्या **ब्राह्मणांनीं**

असें ठरविलें कीं सन्याशानें गृहस्थाश्रमीं राहणें हें निंद्य कर्म होय. **विठल**पंतानें संन्यास घेऊन गृहस्थाश्रम केला, हें चांगलें केलें नाहीं, तर या गांवांत व परगांवांत पुढीची आमंत्रणें बंद केलीं पाहिजेत असा त्या विप्रमंडळींनीं ठराव करून गांवोगांवीं पत्रें पाठऊन त्यास बहिष्कृत ठेविलें. **विठ्ठल**पंतानें **सिदो**पंतास असें सांगितलें कीं चालू ग्रामण्याच्या संबंधानें तुह्मी आह्मांबरोबर कां ताप सोसतां ? मग आपण गांवाबाहेर एक पर्णकुटिका करून तेथें वास केला. कांहीं दिवसांनीं त्याची स्त्री गर्भधारण करती झाली. तिला नवमास पूर्ण झाल्यानंतर एक *पुत्र झाला. पूर्वीं झालेल्या स्वप्नाविषयीं व गुरुवचनाविषयीं मनांत वागविलेला जो संशय त्याची निवृत्ति झाली ह्मणून त्यानें आपल्या पोटीं झालेल्या पुत्राचें नांव **निवृत्ति** असें ठेविलें. पुढें **दोन** वर्षांनीं दुसरा *मुलगा झाला त्यावेळेस त्यास असें वाटलें कीं आपल्या पोटीं मूर्तिमंत प्रत्यक्ष ज्ञानच आलें कीं काय ? असें समजून त्या मुलाचे नांव **ज्ञानेश्वर** असें ठेविलें. दोन वर्षांनीं जो *मुलगा झाला तो ज्ञान प्राप्तीचा सोपान ( ह्मणजे जिना ) होय म्हणून त्याचें नांव **सोपान** असें ठेविलें. नंतर दोन वर्षांनीं त्याला एक *मुलगी झाली. मनाची निवृत्ति होऊन ज्ञान **सोपान**मार्गानें गेलेल्या पुरुषास शेवटीं मुक्ति प्राप्त होते, अशा हेतूनें त्या शेवटल्या मूलीचें नांव **मुक्ता** असें ठेविलें. असा जो **विठ्ठल**पंत तो आपले तीन पुत्र व एक कन्या ह्यासहवर्तमान मोठ्या आनंदानें तेथें वास करूं लागला.

---

*** श्रीनिवृत्तिनाथाचा जन्म शालिवाहन शके ११९५ श्रीमुखनाम संवत्सरे माहे माघ वद्य १ सोमवारी प्रातःकाली झाला. श्रीज्ञानेश्वराचा जन्म शालीवाहन शके ११९७ युवनाम संवत्सरे माहे श्रावण वद्य ८ बुधवारी दोनप्रहररात्री झाला. सोपान देवाचा जन्म शके ११९९ ईश्वर नाम संवत्सरे माहे कार्तिक शुद्ध १५ रविवारी प्रहररात्रीस झाला. मुक्ताबाईचाजन्म शके १२०१ प्रमाथीनाम संवत्सरे माहे आश्विन शुद्ध १ शुक्रवारी मध्यान्हीस झाला.**

## ॥ द्वितीयोल्लासः ॥

### श्री वि ठ्ठ ल

# ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोकं ॥

॥ नौमिमच्छेंद्रगोरक्षौगैनिनिवृत्तिमीश्वरं ॥
॥ ज्ञानदेवंचसोपानंमुक्तांमुक्तजनस्तुतां ॥ १ ॥

राजहंस जरी काक समुदायांत क्रिडा करितात तरी ते आपले गुण व धर्म कधींही सांडित नाहींत. *पाहा ती विठलपंताचीं तीन मुलें निवृत्ति, ज्ञानदेव, आणि सोपान हीं जरी त्या ग्रामस्थ मुलांबरोबर खेळत असत तरी त्यांनीं आपआपल्यामध्यें ब्रह्म ह्मणजे काय व मायेचें स्वरूप कोणतें, प्रकृति पुरुषांचा विवेक कसा करावा अशीं भाषणें करावीं. असो, त्यांतील वडील पुत्र जो निवृत्ति तो अष्टवर्षांचा झालेला पाहून विठ्ठलपंताच्या मनांत असें वाटलें कीं हा पुत्र व्रतबंध करण्यास योग्य झाला आहे. आणि गांवांत तर सर्व ब्राह्मणांनीं माझ्यावर ग्रामण्य करून मला बहिष्कृत ठेविले आहे. तर कसें करावें. मग विठलपंतानें सर्व ग्रामस्थ ब्राह्मण बोलावून एक सभा केली, व त्यामध्यें आपण तीन पुत्रांसहवर्तमान जाऊन त्याब्राह्मणांस साष्टांग प्रणिपात करून म्हणाला कीं महाराज द्विजवर्य आपण चारी वर्णांत श्रेष्ठ आहांत आपला लत्ताप्रहर प्रत्यक्ष नारायण त्दृदयावर भूषण करून वागवितात. शापादपि शरादपि असं आपलें सामार्थ्य आहे. आपण ज्ञानविद्येचें माहेर आहांत, आपण कोपानें त्रैलोक्य भस्म कराल व संतोषानें पुनः त्याची उत्पत्ति कराल, अशी आपली योग्यता आहे. आतां मी सर्व द्विजवर्यांस विनयपूर्वक प्रार्थना करितों कीं मी फार अन्यायी आहें, व वेदशास्त्र बाह्य निंद्यकर्म करण्यास प्रवृत्त झालों, माझ्यासारखा पातकी या ब्रह्मांडांत कोणी नसेल, तर सर्वांनीं माझें

---

*ही कथा मत्स्येंद्र संहितेंत, व भक्तितत्वांमृतांतच आहे.

अपराध क्षमा करून मला पंक्तिपावन करून माझ्या मुलांचें मौंजिबंधन करावें. माझ्यासारख्या पतितावर दयाकरणे हें तुमचें कर्तव्य होय. असें **विठ्ठल**पंताचें मधुर भाषण श्रवण करून, सर्व ब्राह्मण शास्त्रपुस्तकें काढून विचार करूं लागले कीं, शास्त्रानें सन्याशी होऊन गृहस्थाश्रम करणाऱ्या पुरुषास कोठें हीं प्रायश्चितादिक सांगितलें नाहीं. **विठ्ठल**पंतास सर्व शास्त्रांचें अर्थज्ञान आहे. ज्ञानी असून. असें वेदबाह्य निंद्यकर्म करणाऱ्यास शुद्धता मुळींच नाहीं तर **विठ्ठल**पंतास पंक्तिपावन कसें करावें. मग सर्व द्विजसमुदायांनीं कांहीं वेळ विचार करून, त्यास असें सांगितलें कीं, तूं **प्रतिष्ठान**क्षेत्रीं जावें, आणि तेथील वास करणारे जे विद्वान शास्त्रज्ञ ब्राम्हण आहेत, त्यांस शरण जाऊन त्यांचें शुद्धपत्र आणल्यावर आह्मीं सर्व तुझ्या मुलांचें मौंजीबंधन करूं. कारण तेथील जे ब्राम्हण ते वेदज्ञ व शास्त्रज्ञ असल्यामुळें त्यांचें शुद्धपत्र आम्हांस मान्य आहे. तर तूं असें केल्यास बरें होईल असें बोलून सर्व सभा विसर्जन झाली. **विठ्ठल**पंतानें तेथून निघून स्वगृहीं येऊन सभेंत झालेलें वर्तमान आपली स्त्री जी **रखुमा**बाई तीस निवेदन केलें, तें ऐकून ते उभयतां स्त्रीपुरूष बहुत चिंतातूर झाले. काय करावें कसें करावें, यादशाक्षरी मंत्राचा निदिध्यासानें गुरूनीं सांगितलेलें जें वरप्रदानाचें वाक्य त्याचें विस्मरण झालें. त्या योगानें **विठ्ठल**पंताचा देह अस्थि मात्र राहिला. एके दिवशीं चिंतातूर होऊन ते नेत्रांतून अश्रु गाळीत बसले असतां त्याचा वडील पुत्र जो **निवृत्ति** तो जवळ येऊन म्हणाला कीं, बाबा ब्राम्हणांनीं जातिबहिष्कृत ठेविलें ह्या विषयीं इतकी चिंता कां करितां ? **जगदीशानें** ज्यावेळेस **ब्रह्मांड** उत्पन्न केलें त्यावेळेस मनुष्य, पशू, पक्षी व जड इत्यादिकांचा जातिभेद केला आहे. मनुष्यांत, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य शूद्र आणि अंत्यज हे जातीभेद **ऋषिकृत** आहेत **ईशकृत** नव्हत ह्या विषयीं प्रमाण **श्लोकः- जातिरेकापुराचासीदादिकल्पेतुवैनृणां नृपक्षिपशवोभिन्नाजातयःपरिकीर्तिताः ॥१॥** असें मनूचें वाक्य आहे,ईशकृत जातिभेद असतां तर मनुष्य, पशू,पक्षी यामध्यें जसें भिन्न लक्षण ठेविलें आहें, तसें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, यामध्येंही ठेविलें असते, कारण ईश्वर सर्व शक्तिमान् आहे, त्यास कोणचें कर्म असाध्य आहें असें नाहीं. किंवा आ-

त्मदृष्टीनें पाहिलें असतां इंद्रियें प्रातिकूल्यानें वर्तन करणारे जे आत्मस्व-रूप त्यावर देहोपाधीचा जर संबंध नाहीं, तर, जातिभेदाचा संबंध कोठून असणार. असतां तर **श्रीमच्छंकराचार्यांनीं हस्तामलका**च्या मस्तकावर हस्त ठेऊन अज्ञान न्यस्त झाल्यावर कस्त्वं [ कोण तूं ] असें विचारलें तेव्हां **हस्तामलका**नें स्वरूप स्थिति प्राप्त होऊन उत्तर दिलें कीं:—

**नाहं मनुष्यो नच देव यक्षौ न ब्राम्हणक्षत्रियवैश्य शुद्राः ॥ नब्रम्हचारी न गृही वनस्थो भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः** ॥ १ मी **मनुष्य,** देव, यक्ष, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र, ब्रह्मचारी, गृहस्थाश्र-मी वनस्थ सन्यासी नव्हें तर मी **सच्चिदानंद**रूप आहें. व **शं-कराचार्यास विश्वेश्वरानें** चांडाळरूपानें असें सांगितलें कीं—**किं गंगांबुनि बिंबते वरमणौ चांडाळवाटी पयः पूरे वांतरमस्ति कांचन घटी मृत्कुंभयोर्वांबरे ॥ प्रत्यग्वस्तुनिनिस्तरंग सहजानंदावबोधांबुधौ विप्रोयं श्वपचोय मित्यापिमहान् कोयं विभेद भ्रमः** ॥१॥ ॥ अर्थ ॥ गंगेच्या उदकामध्यें व चांडाल वाटीच्या उदकामध्यें सूर्या चें प्रतिबिंब पडलें असतां अंतर काय येईल ? आणि कांचनघटांत व मृद्घटांत आकाश प्रतिबिंबित झालें असतां अंतर काय येईल ? प्रश्न— अहो गंगेच्या उदकांतील जें प्रतिबिंब तें शुद्ध असतें व चांडालवाटी-च्या उदकांतील जें प्रतिबिंब तें मलीन असतें व मृद्घटांतील आकाशास मृद्घटाकाश असें ह्मणतात. सूवर्णघटांतील आकाशास कांचनघटाका-श असें ह्मणतात. असें अंतर असतां, तुह्मी नाहीं असें कसें बोलतां. उत्तर—यामध्यें गंगोदकाची व चांडालवाटीपयाची व मृद्घट व कांचनघट यांची प्रतिबिंबास उपाधी मात्र असतें ; त्या योगानें अधि ष्ठानास शुद्धत्व व मलिनत्व येत नाहीं. तसें तरंग रहित जो आनं-दांबुधी प्रत्यगात्मा त्याचें ठायीं हा विप्र, हा श्वपच [ खाटिक ] असें मानणें हा भ्रम होय. असें श्रीमच्छंकराचार्य **हस्तामलक**प्रभृति जे सिद्धज्ञानी आहेत ते न बोलते व आह्मालाही अनुभव ज्ञानानें प्रत्यक्ष कळेत कीं ज्यावेळेस चिदाभासाचा लय होऊन प्राज्ञावर सुषुप्ति अवस्था अरूढ होते त्यावेळेस मी ब्राह्मण, मी शुद्र, मी राजा, व मी रंक मा-झें नांव अमूक असें मनुष्यमात्रास स्मरण नसतें. ह्यावरून स्वरूपास जातीभेद मुळींच नाहीं असें सिद्ध होतें. तर बावा तुमच्यासारख्या

ज्ञात्यानीं त्याविषयीं इतकें दुःख करणें योग्य नव्हे असें सज्ञान भाषण मुलाचें श्रवण करून **विठ्ठल**पंतानें आपल्या मनांत विचार केला कीं **निवृत्ति** बोलतो तें सर्व सत्य आहे परंतु कृष्णासारिखा ज्ञानी पुरूषानीं **चातुर्वर्ण्यं मयासृष्टं गुणकर्म विभागशः तस्यकर्त्तारमपिमां विध्य कर्त्तारमव्ययं ॥ १ ॥ उत्सिदेयुरिमेलोकान् कुर्यां कर्मचेदहं ॥ संकर-स्यचकर्ता स्यामुपहन्यामिमाप्रजाः** २ ॥ असें गीतेमध्यें गुणकर्माच्या विभागानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र, हे चातुर्वर्ण्य मी उत्पन्न केलें. ह्यावेळेस कृष्णानें आपल्याकडे ईशत्व मानून ह्या चातुर्वर्ण्याचा मी कर्ता असून मला अकर्ता, अव्यय, असें जाण, मी वर्णाश्रम धर्माचें पालन न करीन तर वर्णसंकराचा कर्ता होऊन प्रजेच्या नाशास कारण होईन. ह्याप्रमाणें अर्जूनास सांगितलें तर ते मूर्ख होते कीं काय ? व स्वरूप सिद्धीचें ज्ञान झाल्यावांचून श्रीमच्छंकराचार्य प्रभृतीच्या वचना-चें अनुसरण केलें तर **नाचरेत् यस्तु वेदोक्तं स्वयमज्ञो जितेंद्रियः ॥ विकर्मणाह्यधर्मेण मृत्योर्मृत्यु मुपैति सः** ॥ अर्थ० ॥ आपण स्वरूपाज्ञानी असून इंद्रिय निग्रह नकरितां जर वेदोक्त वर्णाश्रम कर्मा-चें आचरण करणार नाहीं तर त्यास अधर्माच्या योगानें जन्म मृत्यूचा संसार प्राप्त होतो. असा त्या **विठ्ठल**पंताच्या वृत्तीनें निश्चय करून भाषण केलें कीं मुला शंकराचार्याप्रमाणें माझ्या आंगीं स्वरूपस्थीति प्राप्त झाली नाहीं, तर मला जातिभ्रष्ट होऊन वर्णसंकर करणें योग्य नव्हे, वर्णसंकर केल्यानें अधःपात प्राप्त होतो, असें शास्त्राचें मत आहे. हें ऐकून **निवृत्ती**स असें वाटलें कीं आपल्या बावांचें ज्ञान आद्यापि पूर्ण दशेस आलें नाहीं, तें कच्चें आहे, तर यांच्या मनाप्रमाणें भाषण केलें पाहिजे. नाहींतर यांच्या मनोवृत्तीचा ग्रह न जातां यांना दुःख मात्र होईल. असें मनांत आणून स्पष्टपणें बोलला कीं, बावा आप-ल्याला शरण न जातां सर्व ब्राह्मणांनीं पंक्तिपावन करावें असें तुमच्या मनांत असेल तर तुह्मी व आह्मी मिळून कोणत्या तरी दैवताचें घोर अनुष्ठान केलें पाहिजे. त्याशिवाय उपाय नाहीं. हें भाषण **विठ्ठल**पंतास व **रखुमाबाई**स व **ज्ञानदेव**प्रभृतीस मान्य होऊन ते सर्व कोणच्या देवाचें अनुष्ठान करावें व तें कसें करावें असा विचार करूं लागले. नंतर **विठ्ठल**पंतानें त्या सर्वांस असें सांगितलें कीं, **त्र्यंबकेश्वरीं**

जाऊन नित्य **ब्रम्हगिरीस** सव्य प्रदक्षिणा घालावी. असें तप करणें **त्र्यंबकमहात्म्यांत** वर्णन केलें आहे. हें वचन **रखुमाबाईस** व **निवृत्ति** आदिकरून मुलांस मान्य होऊन त्या सर्वांनीं **त्र्यंबकेश्वरीं** जाण्याची तयारी केली. **रखुमाबाईनें** आपले बापास व आईस विचार ल्यानंतर त्या दोघां **वृद्धास** फार दुःख झालें, परंतु जातीपुढें उपाय नाहीं. असो, तो **विठ्ठलपंत** सहकुटुंब आपल्या तीन मुलास व एक मुलीस बरोबर घेऊन निघाले ते मार्गक्रमण करीत **त्र्यंबकेश्वरीं** येऊन **तेथें** एका ब्राम्हणाच्या घरांत वास्तव्य करून नित्य मध्य रात्रीच्या सुमारास उठावें नंतर **कुशावर्तांचें** स्नान करून त्या तीन मुलांसहवर्तमान **ब्रम्हगिरीस** सव्य प्रदक्षिणा करण्यास आरंभ करावा. आणि मधुकरीवृत्ति धारण करून आपल्या कुटुंबाचें उदरपोषण करावें. त्यानें ब्राम्हणांनीं मला पंक्तिपावन करून माझ्या मुलाचें मौंजीबंधन करावें म्हणून **त्र्यंबकेश्वराची** रोज प्रार्थना करावी. असा नित्य नेमानें एक वर्षपर्यंत ब्रह्मगिरीस सव्य प्रदक्षिणा करीत असतां एके दिवशीं मध्यरात्रींच उठून त्या तीन मुलांस बरोबर घेऊन ते **विठ्ठलंत** प्रदक्षिणा करण्यास निघाले तों प्रदक्षिणा मार्गक्रमण करीत असतां अग्रभागीं एक पर्वताच्या दरींतून व्याघ्रानें उड्डाण करून तो इकडे येत आहे असें त्यानें अवलोकन केलें. मग भयभीत होऊन **सोपानास** आपल्याकडेवर घेऊन व **ज्ञानेश्वराचा** हात धरून त्यांनें पलायन केलें. **निवृत्ति** हा वयानें मोठा असल्यामुळें तो ही बापामागें पळूं लागला. **विठ्ठलंत** मागें वरचेवर **निवृत्तिकडे** पाहीं, परंतु तो पळण्याची सवय नसल्याकारणानें मागें फार रहात असे, असें कांहीं वेळ पळत असतां **विठ्ठलंताची** व **निवृत्तिची** चुकामूक पडून ते एका मार्गानें गेले व हा अन्यमार्गानें गेला. नंतर **विठ्ठलपंत** मागें जों पहातात तों **निवृत्ति** नाहीं हें पाहून **निवृत्ति, निवृत्ति,** अशी दहापंधरावेळां हांकमारिली, परंतु तो तर अन्यमार्गानें गेला तर प्रत्युतर कसा देईल? त्यावेळेस **विठ्ठलपंताचें** मनाद्विधा झालें, मागें जावें तर न जाणें व्याघ्रानें येऊन आपणास भक्षण केलें तर काय करावें ? बरें न जावें तर जेष्ट पुत्र जो **निवृत्ति** त्याची अवस्था मागें काय झाली हें कळत नाहीं. प्रातःकालही लवकर होत नाहीं. त्यानें असा निश्चय केला कीं एकासाठीं आपण तिघानें

मागें जाऊन व्याघ्रमुखांत पडावें त्यापेक्षां एकाचीच आशा सोडून आपण ह्या दोन मुलांसहवर्तमान पळावें हें बरें दिसतें असें मनांत आणून त्वरितच पलायन केले. इतक्यांत निबिड अंधःकाराचा नाशकरणारा व सर्व पदार्थदर्शक असा जो सहस्त्रकीर्ण सूर्य त्याचा उदय होऊन सर्व दिशा प्रकाशित झाल्यावर ते **विठ्ठल**पंत त्या दोन मुलांसह आपल्या बिऱ्हाडीं येऊन पोंहचले. नंतर मोठ्या दुःखानें आपल्या **स्त्रीस** मार्गांत झालेलें वर्तमान निवेदन केलें. मागें **निवृत्तिची** अवस्था काय झाली असेल हें कांहीं कळत नाहीं असें बोलून आपल्या मुलाचा शोध करण्यासाठीं तेथून लवकर निघाले, ब्रह्मगिरीच्या प्रदक्षिणेच्या मार्गावर संध्याकाळपर्यंत भ्रमण करून **निवृत्ति** कोठें नाहीं असें पाहून अश्रुगाळीतच बिऱ्हाडीं आले. त्यांना असें वाटलें कीं **निवृत्तिला** व्याघ्रानें खचित भक्षण केलें असावें यांत संदेह नाहीं. असा विचार करून मोठा हंबरडा फोडून ह्मणाले कीं, **स्त्रीये निवृत्तिनें** आज आपल्याला दगा दिला गे दिला, काय हो मी **दुष्ट**, मला त्या मुलाची दया कशी आली नाहीं. मी त्याला स्कंदावर घेऊन आलों असतों तर असें कां झालें असतें, **नारायणा**? आतां तर प्रालब्धाची कमालच झाली. पूर्वीं आईबापानीं सोडिलें पुढें सन्यास घेऊन निरुपाधिकपणानें **काशीस** राहिलों असतां तेथें हीं गुरूनें पुनः गृहस्थाश्रम करावयास सांगितलें. बरें गुरूच्या आज्ञेपुढें उपाय नाहीं. गृहस्थाश्रमीं तरी सुख असावें कीं नाहीं परंतु तेथेंही ब्राह्मणांनीं ग्रामण्य करून मला जातीभ्रष्ट केलें. त्यांतून मला तरी जातीची काय गरज होती पण ह्या **निवृत्तिच्या** मौंजिबंधनाकरितां सर्व **ब्राम्हणाचे** अर्जव करून अशा घोर तपाचरणास आरंभ केला. आतां तर मुलानें ही दगा दिला, काय करावें, कांहीं सुचत नाहीं. बाळा कायरे तुझें ज्ञान, आणि काय ती तुझी बुद्धि? ज्यावेळेस आह्मीं चिंतातूर होऊन बसलों त्या वेळेस तूंच आम्हास असें घोर तप करावयास सांगितलेंस आणि आतां तूंच आह्माला सोडून गेलास हें चांगले केलें काय? असो, असा **रखुमाबाईनें** व **विठ्ठल**पंतानें दोन घटिकापर्यंत बहूत शोक केला. **ज्ञानेश्वरानें** मातापित्याजवळ येऊन त्या देवांस असें सांगितलें कीं, बाबा, माझा जेष्ठ बंधु जो **निवृत्ति** तो व्याघ्रानें भक्षण केला नसावा तर तो कोठेंही जाऊन

अनुष्ठान करीत असेल असें मला पूर्णपणें वाटतें. कारण तो व्याघ्रमुखांत सापडणारा पुरुष नव्हे. हीं बोबडीं भाषणें श्रवण करून विठ्ठलपंतानें त्यास उत्तर दिलें कीं, बाळा, त्याचें तप करण्याचें वय नाहीं व तो माझ्यावाचून क्षणभरही कोठें राहवयाचा नाहीं. असें सांगून ते नित्य ब्रम्हागिरीच्या प्रदक्षिणेच्या मार्गावर आपल्या जेष्ट मुलाचा शोध करीत. ज्ञानदेवानें सोपानास हांक मारून विचारावें कीं सोपाना, निवृत्तिदादा अद्यापि कां येत नाहींत. मला असें वाटतें कीं मध्यें त्यांना कोणी सिद्ध सत्पुरुष भेटला असावा, त्या योगानें इतका विलंब लागला असवा. ह्याप्रमाणें इकडे विठ्ठलपंत व रखुमाबाई हे निवृत्तिकारितां नित्य शोक करीत असत, तिकडे तो निवृत्ति चुकून व्याघ्र भीतीनें अन्यमार्गानें पलायन करीत त्यानें अंजनीपर्वताच्या एका गुहेंत सुदैव योगानें प्रवेश केला. त्यागुहेंत कांहीं वेळ गमन करीत असतां तेथें त्यानें एक रम्य सिद्धाश्रम अवलोकन केला. त्यांत गाय आणि व्याघ्र, सिंह आणि हत्ती, नकूल व सर्प असेंअनेक प्राणी निर्वैरभावानें क्रीडा कारितात व लतेच्या पुष्प संपर्कानें वायु मंदमंद सुवासीक वाहत आहे, व जागो जागीं निर्झर प्रवाह सारखे चालले आहेत. लतेच्यापुष्पावर संकुल मकरंद सेवन करुन भ्रमर एक सारिखे गुंजारव करीत आहेत, व कांहीं ऋषीसमुदाय मस्तकावर जटाजूट, कंठीं रुद्राक्षमाला, व आंगीं भस्म धारण करून ध्यानांत निमग्न होऊन ब्रम्हपादि संलग्न झाले आहेत. त्याच्यापलीकडे शिष्यमंडळी वेदाध्ययन उच्चस्वरानें करीत आहेत, कांहीं शिष्य न्याय, व्याकरण मीमांसा यांचे पूर्वपक्ष उतरपक्ष करीत आहेत, मृगांचे शावक निर्भयपणानें दर्भभक्षण करीत इकडे तिकडे फिरत आहेत. अशा रम्य स्थलांत जो आश्रम होता तेथें एक महंत मस्तकावर जटा व कानांत कुंडलें कंठामध्यें शैली हातांत शिंगी व पुंगी धारण करून मुखानें श्रीगुरुदत्त श्रीगुरुदत्त असें नामस्मरण करीत आहेत, असा मनोरम आश्रम पाहून निवृत्तिच्या अंतःकरणास फार आल्हाद उत्पन्न झाला. मग त्यानें त्या आश्रमांत प्रवेश करून वेदाध्ययन करणाऱ्याशिष्यांस विचारिलें कीं बाबानो ? हा आश्रम कोणाचा आहे व येथील मुख्य कोण आहे तें सर्व कृपा करून निवेदन करा. तें ऐकून शिष्यानें उत्तर दिलें

कीं हा आश्रम **आदिनाथ**संप्रदायानुवर्ती सर्व ऋषीमंडळींत मंत्रशास्त्र पुरःसर जे **गैनिनाथ** त्यांचा आहे. ते येथें **सद्गुरुगोरक्षा**च्या आज्ञेनें तप करीत आहेत. नंतर **निवृ**त्तिनें पुनः प्रश्न केला कीं, ते कोणचे? शिष्यानें उत्तर दिलें कीं, त्या पर्णकुटींत शैली, शिंगी, पुंगी धारण करून **श्रीगुरुदत्त** या नामाचा उच्चार करीत आहेत ते या सर्व ऋषीमध्यें महंत होत. हें ऐकून **निवृत्ति** तेथून निघून ज्या पर्णकुटींत **गैनिनाथ** नामस्मरण करीत बसले होते, तेथें येऊन **निवृत्तिनें गैनिनाथास** साष्टांग दंडवत् नमस्कार केला. **गैनिनाथानें** नेत्र उघडून पाहिलें तों दहा वर्षांचा मुलगा महा तेजःपुंज **शंकरा**चा अवतारच कीं काय? असा त्यानें अवलोकन केला, नंतर **गैनिनाथास** पूर्वीं सद्गुरु **गोरक्षानें** असें सांगितलें होतें कीं **रामानंद**स्वामीच्या आशीर्वचनें करून **विठ्ठल**पंत या नांवाच्या ब्राम्हणास तीन पुत्र आणि एक कन्या होतील त्यापैकीं जेष्ठ पुत्र तुझ्या आश्रमांत येईल तर त्यास उपदेश करून असें सांगावें कीं तुझा तिघांपैकीं जो तुमचा मध्यम बंधु असेल त्याला हें ज्ञान सांगावें ह्मणजे तो हें संपादन करून जगाचाउद्धार करील असें **गैनिनाथास** सद्गुरू वचनाचें स्मरण झालें. नंतर त्यानें त्या मुलास विचारलें कीं, तूं कोण, तुझ्या बापाचें नांव काय? व तूं येथें कसा आलास हें सर्व सांग. हें ऐकून **निवृत्तिनें** उत्तर दिलें कीं मी यजुर्वेदीब्राह्मण आहें. माझ्या बापाचें नांव **विठ्ठल**पंत त्यानीं संन्यास धारण करून **रामानंद** स्वामीच्या आज्ञेनें गृहस्थाश्रम केला ह्मणून सर्व ब्राह्मणांनीं त्यास बहिष्कृत ठेविलें आहे, ते येथें **ब्रम्हगिरीस** प्रदक्षिणा करून तप करीत आहेत, एके दिवशीं प्रदक्षिणा करीत असतां मार्गांत व्याघ्रानें गांठलें, त्या व्याघ्रास पाहून आह्मी पलायन केलें, मध्यें बापाची व माझी चुकामुक पडून ते दुसऱ्या मार्गानें घरीं गेलें व मी पूर्व पुण्याच्या योगानें आपल्या चरणारविंदीं प्राप्त झालों, आतां माझ्या मस्तकावर हस्त ठेऊन व ज्ञानोपदेश करून मला कृतार्थ करावें ही माझी प्रार्थना आहे. नंतर **गैनिनाथानें** हा सत्शिष्य मुमुक्षु दशेंतील अधिकार संपन्न आहे असें जाणून सद्गुरू **गोरक्षाच्या** आज्ञेप्रमाणें उपदेश करण्यास आरंभ केला. **निवृत्तिनें** स्नान करून शुचिर्भूत झाल्यावर **गैनिनाथांनीं** त्यास पद्मासन घालून बसविलें. प्रथम

प्रकृति पुरुषाचा विवेक सांगून प्रकृतिजन्य जें जगत्रय तें सर्व मिथ्या आहे ह्मणून जीवानें अव्यय, सर्वज्ञ, सर्व शक्तिमान् जो परमात्मा त्याची योग्य मार्गानें उपासना करावी असें निरूपण केलें. पंचकोशाचा अन्वय व्यतिरेकानीं निरास करून उपनिषदुक्त योगी ध्यानगम्य असें आत्मस्वरूप जाणावें. व कर्म ह्मणजे काय? त्याचे प्रकार किती आहेत व कोणच्या देवाची उपासना करावी, ती कशी करावी, ज्ञान कशास ह्मणावें, या सर्वांचें वर्णन करून **नारायणा**च्या नवविध भक्तीचें लक्षण कथन केलें. तत्पद, त्वंपद आणि असिपद इत्यादि महा वाक्याचें विवरण करून जीव ब्रम्हाची ऐक्यता सांगून सच्चिदानंदपदाचें वर्णन केलें. आज्ञानरूप संसार आहे तर तन्नाश प्रित्यर्थ जगदिश्वराचीं नामस्मरणादि साधनें व शाबरी मंत्राच्या योगानें बावन्न **बिराची** प्राप्ती व **गोरक्ष** किमया असें सांगून सत्पुरूष लक्षणाचें निरूपण केलें. आपला गुरु संप्रदाय व गुरू परमगुरूचीं नांवें हीं सांगितली, असा अहोरात्र **गैनी**नाथानीं सात दिवसपर्यंत **निवृत्तीस** उपदेश करून शेवटीं गुर्वाज्ञेनुरूप असें सांगितलें कीं माझ्यापासून प्राप्त झालेलें जें ज्ञान तें तूं तुझा जो मध्यम बंधु त्यास निवेदन कर. गर्वानें व बंधुत्वाचें वैर धरून न सांगशील तर जसें **परशुरामा**च्या शापानें **कर्णा**स प्राप्त झालेली जी मंत्रविद्या ती मृत्युसमयीं भ्रष्ट झाली तसें तुझें हें ज्ञान व्यर्थ होईल. हें ऐकून **निवृत्तिनें** भाषण केलें कीं महाराज तो माझा जिवलग बंधुच आहे त्यास मी ज्ञान नाहीं सांगणार असें कसें होईल! असो, ह्याप्रमाणें **निवृत्तिनें** नाथ सांप्रदायीदिक्षा धारण करून तेथून निघणार तों अकस्मात् तेथें तीन फकीर गुरूजी आदेश असें मुखानें उच्चार करीत व ज्याच्या जटा पाया पर्यंत विस्तृत झाल्या आहेत, ज्यांनीं आपल्या आंगाला भस्म चर्चन केलें आहे, ज्याच्या दाढीचें कुटिल केश नाभिकमलापर्यंत लोंबत आहेत, ज्यांनीं तेली लोकांच्या वस्त्रास लाजिवणारीं जीं वस्त्रें तीं आंगावर परिधान केलीं आहेत, ज्यांच्या बरोबर कांहीं कुत्रीं आहेत, त्यांचा कलकलाट एकसारिखा चालला आहे असें ते **गैनी**नाथाच्या आश्रमीं येऊन पोहचले. **गैनी**नाथानीं त्या तिघांस पाहून सा-

ष्टांग प्रणिपात केला. त्यांना आश्रमांत आणून आसन पाद्यादि पूजा करून कुशल विचारिलें. नंतर **गैनी**नाथानीं **निवृत्ती**स त्या तिघांस नमस्कार करावयास सांगितला. **निवृत्तीनें** नमस्कार करून **गैनी**-नाथास विचारिलें कीं, महाराज, हे तिघे **ब्रम्हा विष्णु महेशा**प्रमाणें पुरूष कोण आहेत व त्यांचीं नांवें काय तीं सर्व आपण मजवर कृपा करून सांगावींत. हें ऐकून **गैनी**नाथानीं उत्तर दिलें कीं संप्रदाय मालिकेंत निरूपित केलेले जे गुरु परमगुरु ते हे आले आहेत. आज तुझ्या पूर्वजन्म पुण्याच्या योगानें तुला यांच्या दर्शनाचा अलभ्य लाभ झाला आहे. नंतर **गैनी**नाथानीं अंगुलीनिर्देश करून सांगितलें कीं **निवृत्ति**, हे सर्व सिद्धाचे अग्रणी व नाथसंप्रदायांत मुख्य, त्याचें नामस्मरण केलें असतां सर्व लोकांस मुक्ति प्राप्त होते आणि म्हणूनच यांना सर्व **श्रीदत्त** असें ह्मणतात. दुसरे हे ज्यानीं **आदिनाथ** जे **शंकर** ते **पार्वतीस सिंधूच्या** मध्यभागीं बेटांत उपदेश करीत असतां आपण मत्स्याच्या उदरांत प्रवेश करुन ते सर्व तत्वज्ञान ग्रहण केलें. नंतर **आदिनाथा**च्या शापानें त्या ज्ञानाचें विस्मरण होऊन मनुष्यदेहीं आल्यावर **श्रीदत्ता**चा उपदेश घेऊन मायामोहानें मलीन झालेलें जें ज्ञान त्यास पुनरपि प्रज्वलित केलें असें आहे. यांना **मच्छेंद्रनाथ** असें ह्मणतात. तिसरे ज्यानीं योग मार्गानें वनस्पतीचा शोध करून किमया निर्माण केली, व **श्रीदत्ता**सी युद्ध करून त्यांच्यापासून शैली, शिंगी, पुंगी, असा प्रसाद मिळविला, हे माझे सद्गुरु होय, याना **गोरक्ष**नाथ असें ह्मणतात. ह्याप्रमाणें तिघांचें वर्णन केलें. नंतर त्या तिघांनीं आपल्या झोळींतून मधुकरी वृत्तीनें संपादन केलेले जे भाकरीचे तुकडे होते ते काढून एक्या कटोऱ्यांत घातले, त्यांवर तीन चार कुत्रीचें दुग्ध घालून तें सर्व एके ठिकाणी कालविलें, मग **श्रीदत्त मच्छेंद्र, गोरक्ष, गैनी** व **निवृत्ति**, या सर्वांनीं तें दुग्ध मिश्रित तुकडे भक्षण केलें, भोजनोत्तर त्यांची जाण्याची तयारी पाहून **निवृत्तिनें** हात जोडून प्रार्थना केली कीं महाराज, पुनरपि आपल्या भेटिचा लाभ केव्हां होईल? तिघांनीं उत्तर दिलें कीं, तुझा मध्यम बंधु ज्यावेळस यात्रा करून श्रीक्षेत्र **काशीस** येईल त्यावेळेस माणिकार्णिकेच्या घाटावर तुमची भेट होईल. नंतर **निवृत्तिनें**

त्यांस सांष्टांग नमस्कार केल्यावर त्या तिघांनीं आशीर्वाद दिला कीं तुह्मी आपल्या ज्ञानानें उपदेश करून जगताचें कल्याण कराल व आणिमादि सिद्धि त्या तुमच्या जवळ दासीप्रमाणें दास्यत्व करितील, व तुमचें नामस्मरण जे लोक करितील, तें ब्रह्महत्यादि दोषापासून मुक्त होऊन सच्चिदानंद पदवीस प्राप्त होतील, आमच्या आशीर्वादें करून तुम्हांस कधींही कोठें विघ्न व्हावयाचें नाहीं, असें बोलून ते तिघे जाते झाले. निवृत्तिही गुरूस नमस्कार करून व त्यांची आज्ञा घेऊन निघाले ते मार्ग क्रमण करीत त्र्यंबकेश्वरीं आपल्या बिऱ्हाडीं येऊन पोहोंचले. बिऱ्हाडीं विठ्ठलपंत रखुमाबाई व ज्ञानदेवप्रभृति निवृत्तिस व्याघ्रानें भक्षण केलें असावें असा निश्चय करून निराश होऊन बसले आहेत तो अकस्मात् निवृत्ति गैनानाथाचा उपदेश घेऊन प्राप्त झाला. त्यास पाहून विठ्ठलपंतास व रखुमाबाईस फार आनंद झाला. नंतर मोठ्या प्रेमानें विठ्ठलपंतानें निवृत्तिच्या मुखावरून हस्त फिरऊन त्यास असें विचारिलें कीं बाळा, तूं आह्माला टांकून आठ दिवस कोठें गेला होतास, तुझ्यावांचून अह्मांला क्षणभर ही चैन पडलें नाहीं; व तुझ्यावांचून अन्नपाणी विषाप्रमाणें लागत होतें. तुझ्या मौंजीबंधनाकरितां आमचे हे इतके प्रयत्न चालले आहेत; आणि तूं अमची उपेक्षा करून गेलास हेरे काय ? हें ऐकून निवृत्तिनें भाषण केलें कीं बाबा, भीतीनें पलायन करीत असतां मार्गी तुमची व माझी चुकामूक पडून मी अन्यमार्गानें अंजनीपर्वताच्या एका गुहेंत गेलों. तेथें महासिद्ध गैनीनाथाचा आश्रम होता, तो पाहून माझ्या वृत्तीस जो आनंद झाला तो बाबा सांगतां येत नाहीं. मग मी त्या आश्रमांत जाऊन त्या महासिद्धास नमस्कार करून उपदेश करण्याची प्रार्थना केली. नंतर त्यांच्यापासून सात दिवसपर्यंत उपदेश ग्रहण करून निघणार तों तेथें तीन फकीर मस्तकावर जटा जूट धारण करून आंगाला भस्म चर्चन करून कांहीं कुत्रीं बरोबर घेऊन आले. बाबा कायहो त्यांचें तेज, मला असें वाटलें कीं, सहस्त्रसूर्याचें तेज त्यांपुढें तुच्छ आहे. अशा त्या तीन फकीरास पाहून मी गैनिनाथास विचारिलें कीं, हें तिघे कोण आहेत, व यांचीं नांवें काय. गैनिनाथानें उत्तर दिलें कीं श्रीदत्त मच्छेंद्र व गोरक्ष हे

आले आहेत, आज तुझ्या परम भाग्योदयानें यांचें येथें अगमन झालें आहे, बाबा.नंतर त्या तिघांनीं **गैनि**नाथांनीं व मी एकत्र बसून भोजन केलें, भोजनोत्तर त्यांनीं मला असें आशीर्वचन दिलें कीं, आमच्या आशीर्वादेंकरून तुह्मास कोठेंही विघ्न व्हावयाचें नाहीं, असें बोलून ते निघून जाते झाले व मी ही **गैनि**नाथाची आज्ञाघेऊन निघालों तों येथें येऊन पोहचलों. बाबा, सर्व तपाचें फळ जर तेथेंच प्राप्त झालें होतें तर असा लाभ टाकून घरीं येऊन तरी मला काय करावयाचें होतें. असो, ह्याप्रमाणें त्या बापलेकांचें भाषण दोन घटिकापर्यंत होऊन **निवृत्तिनें** तें सर्व वर्तमान आईस व **ज्ञानदे**वादि बांधवास निवेदन केलें. हें ऐकून त्या सर्वांस अति संतोष झाला. ह्या गोष्टीला तीन दिवस झाल्यानंतर निवृत्तिनें आपण गुरुपासून संपादन केलेलें जें ज्ञान तें सर्व गुरुचे आज्ञेप्रमाणें **ज्ञानदेवास** सांगावें असा विचार करून चौथे दिवशीं प्रातःकालीं उठून **ज्ञान**देवास आपल्या बरोबर घेऊन ज्ञानोपदेश करण्याकरिता निघाले. मार्गी चालतांना **निवृत्तिनें** **ज्ञानदे**वाप्रत असें भाषण केलें कीं सद्गुरु **गैनी**नाथाची मला अशी आज्ञा आहे कीं माझ्यापासून जें ज्ञान तूं संपादन केलेंस, तें सर्व तुझा मध्यम बंधु त्यास कथन कर म्हणजे तो त्या ज्ञानाच्या योगानें सर्व जगताचा उद्धार करील असें सद्गुरूनें उपदेशाच्या अंतीं मला सांगितलं आहे. हें ऐकून **ज्ञानदे**वास असें वाटलें कीं आज माझ्यासारिखा कृतार्थ या ब्रम्हांडांत कोणी नसेल, माझ्या पूर्व पुण्यरूप सूर्याचा आज उदयच झाला कीं काय? आसा त्यास आल्हाद उत्पन्न झाला. ते उभयतां मार्ग क्रमण करीत असतां जेथें **गौतम**ऋषीकारतां **गोदा**वरीचें उदक औदुंबर वृक्षांतून बाहेर पडत आहे तेथें येऊन पोहचल्यानंतर **निवृत्तिनें** **ज्ञान**देवास स्नान करण्यास सांगितलें. **ज्ञान**देवानें गंगाद्वारचें स्नान करून आपला जेष्ट बंधु जो **निवृत्ति** त्यास साष्टांग प्रणिपात केला. ते उभयतां त्या औदुंबर वृक्षच्या छायेखालीं बसून **निवृत्तिनें** **ज्ञान**देवास गुरूपादिष्ट ज्ञान सांगण्यास आरंभ केला. **निवृत्ति** म्हणतात, **ज्ञानदेवा**, आता मी तुला गुरूसांप्रदाय मालिका सागतों. पूर्वी. सर्व सिद्धाग्रणी तपोनिष्ठ आत्मानात्माविवेक दक्ष **आदिनाथशंकर** त्यानीं क्षीर सागराच्या मध्यभागीं एक बेट होतें तेथें आदिशक्ति जी **पार्वती** तिला तत्वज्ञान

सांगण्यास आरंभ केला. हें वर्तमान जगत्पालक जो **विष्णु** त्यानीं **श्रवण** करून व त्या बेटामध्यें येऊन **मत्स्यो**दरांत प्रवेश करून तें तत्वज्ञान श्रवण करूं लागले. **पार्वती** तत्वविवेक श्रवण करीत असतां **शंकरा**च्या वाक्शक्तिपातानें किंवा स्वतः क्रिया संपन्नत्वामुळें ती समाधिस्थ होऊन तिचा प्रत्युत्तररूप जो हुंकार तो स्तब्ध राहिला, मत्स्योदरस्थ विष्णुनीं मनांत असा विचार केला कीं ह्या वेळेस **पार्वती** समाधिभाक् होऊन तिच्या मुखांतून हुंकार येत नाहीं हें जर **शंकरास** कळेल तर ते आतांच तत्व ज्ञानोपदेशाची समाप्ति करतील ह्मणोन आपण हुंकार द्यावा असें मनांत आणून समुद्रांतून बाहेर येऊन त्यानीं हुंकार देण्यास प्रारंभ केला. **शंकरा**च्या मनांत हा हुंकार **पार्वती**-चाच आहे असें जाणून तत्वोपदेशकरण्याची खंडणा केली नाहीं. कांहीं वेळानें **शंकर पार्वती**च्या मुखाकडे पाहातात तों ती समाधिस्थ असून दुसरा कोणी हुंकार देत आहे असें त्यास पूर्णपणें समजलें. **नंतर** असमंतातृभागीं अवलोकन करितात तों अग्रभागीं एक पर्वताकार **मोठा** मत्स्य आहे आणि त्याच्या मुखांतून हुंकार निघत आहे. हें पाहून **शंकरा**स बहुत क्रोध उत्पन्न झाला. **शंकरानें** सक्रोध होऊन मत्स्याच्या ऊरस्थलावर त्रिशूल प्रहार केला. त्या योगानें मत्स्यो-दरस्थ जे विष्णु त्यांचा कर्ण फाटला. त्रिशूलप्रहार करून ही मत्स्यो-दरांतून कोणी बाहेर येत नाहीं असें जाणून **शंकरा**नीं हातांत शापोदक घेऊन भाषण केलें कीं मत्स्योदरांत वास करून चौर्यवृत्तीनें माझें ज्ञान कोण ग्रहण करीत आहे, त्यानें बाहेर यावें, जर न येईल तर माझ्या शापोदकानें जेथें तो असेल तेथें त्याचें भस्म होईल. हें ऐकून **विष्णुस** भीति उत्पन्न होऊन ते त्या मत्स्योदरांतून बाहेर निघून त्यानीं **शंकरास** दंडवत नमस्कार केला. **शंकरानें विष्णूस** पाहून भाषण केलें कीं **विष्णु** अशा चौर्यवृत्तीनें मत्स्योदरांत शिरून तुह्मी माझ्यापासून तत्व ज्ञान ग्रहण केलें हें तुह्मास युक्त नव्हें, कारण जर तुम्ही प्रत्यक्ष आला असतां तर मी तुम्हास तत्वज्ञान न सांगतों कीं काय? आतां माझें शापोदक व्यर्थ जाणार नाहीं तर तुह्मी शाप ग्रहण करण्यास योग्य आहांत. नंतर ते **शंकर** मोठ्या क्रोधानें असें बोलिले कीं माझ्यापासून संपादन केलेलें जें ज्ञान तें मनुष्यदेह प्राप्त होऊन

माया मोहानें भ्रष्ट होईल. असा शंकरानीं शाप दिल्या नंतर विष्णुनीं त्यांची प्रार्थना करून त्यापासून उःशाप वचन मागितलें. ती प्रार्थना श्रवण करून शंकरानीं दयाभूत होऊन पुनः असें सांगितलें कीं माझ्या शापानें तुमचें तत्वज्ञान जरी भ्रष्ट होईल तरी तें श्रीदत्ताच्या उपदेशें करून पुनरपि प्रज्वलित होईल. हें ऐकून विष्णूस फार संतोष झाला. विष्णुनीं भृगुवंशोत्पन्न एक ब्राह्मण होता त्याच्या स्त्रीच्या उदरीं अवतीर्ण होऊन अष्टवर्षांनीं त्याचें मौंजीबंधन झाल्यावर त्यानीं तपश्चर्या करून श्रीदत्ताच्या अनुग्रहानें आदिनाथ शंकरोपदिष्टज्ञान प्रज्वलित केलें. ह्याप्रमाणें ज्ञान प्रज्वलित झाल्यावर श्रीदत्तानीं पूर्वक्रियानुरूप त्यांचें मच्छेंद्रनाथ असें नांव ठेविलें. त्रिशूलप्रहारानें मत्स्योदरीं असतां कर्ण फाटला ह्मणून कांहीं लोक त्यांना "कानफाटे" असें ह्मणतात. जे लोक त्याच्या संप्रदायाचें अनुवर्तन करितात, त्यांनीं कान फाडून त्यांत कुंडलें घातलीं पाहिजेत, असा त्यांचा अद्यापि संप्रदाय आहे. असें आदिनाथ शंकरापासून मत्स्येंद्रनाथास ज्ञान प्राप्त झालें. मत्स्येंद्रनाथ तपश्चर्या करून तीर्थ भ्रमण करीत असतां एके दिवशीं एक्या गांवांत ते भिक्षार्थ एका ब्राह्मणाच्या घरीं प्राप्त झाले. त्याची स्त्री भिक्षा हातांत घेऊन आल्यावर तिनें हा कोणी सिद्ध आहे असें जाणून माझी मनोव्यथा हा दूर करील ह्मणून मत्स्येंद्रनाथाच्या आग्रभागीं ती रूदन करीत उभी राहिली. मत्स्येंद्रनाथानीं तिला रुदन कां करतेस, काय तुला कमी आहे तें सर्व सांग कारण ह्या गांवांत प्रथमच मी रडकी भिक्षा घेत नाहीं असें विचारलें. तिनें उत्तर दिलें कीं, महाराज भ्रतार संपत्यादिक मला सर्व आहे, परंतु एक पोटीं संतती नसल्याकारणानें अंतःकरणांत फार दुःख वाटतें. मत्स्येंद्रनाथानीं सदय होऊन आपल्या झोळींतून रक्षा काढून तिच्या स्वाधीन केली, आणि तिला असें सांगितलें कीं ही रक्षा तूं पाण्यांत घालून भक्षण कर, त्या योगानें तुला एक दिग्विजयी सुंदर पुत्र होईल ; व मी पुनरपि बारावर्षांनीं भिक्षार्थ आलों ह्मणजे तुला सानंद पाहून त्या मुलाकडून भिक्षा घेईन असें बोलून ते मत्स्येंद्रनाथ निघून गेले. दुर्दैवाच्या योगानें व परस्त्रीच्या नादी लागून ती रक्षा तिनें भक्षण न करितां आपल्या स्वयंपाक करण्याच्या

चुलीत टाकिली. ती रक्षा चुलीच्या रक्षेबरोबर गांवाबाहेर एक उकरडा होता तेथें गेली, कांहीं दिवसांनीं मत्स्येंद्रनाथाच्या तपोबलानें त्या उकरड्यांत त्या रक्षेपासून पुत्र उत्पन्न झाला. तेथें महाविस्तृत एक चिंचेचा वृक्ष होता त्या वृक्षाच्या छायेंखालीं ग्राम्यगाईंनीं बसून ज्या ठिकाणीं पुत्र होता तेथें दुग्ध श्राव करावा. ही एक ईश्वराज्ञाच झटली पाहिजे, त्या दुग्धाच्या योगानें तो पुत्र उकरड्यांत वाढूं लागला. असो, तो तेथें बारावर्षाचा झाल्यानंतर मत्स्येंद्रनाथ सर्व तीर्थ अवलोकन करून पुनरपि त्याच गांवांत भिक्षार्थ त्याच ब्राह्मणस्त्रीच्याघरीं आले.त्या ब्राह्मण स्त्रीनें नाथास अवलोकन करून पूर्वीं ह्याच सिद्धानीं पुत्र होण्यासाठीं मला रक्षा दिली असून ती रक्षा भक्षण न करितां चुलींत टाकली असें तिला स्मरण झालें. नाथानीं तिला विचारलें कीं तुझा बारा वर्षाचा पुत्र कोठें आहे. कारण पूर्वीं बोलल्याप्रमाणें त्या मुलाकडून मला भिक्षा घ्यावयाची आहे, हें ऐकून ती कांहीं उत्तर न देतां नेत्रांतून आश्रु गाळींत स्तब्ध उभी राहिली. हें पाहून नाथानीं विचारिलें कीं आतां रोदन करण्याचें कारण काय? माझ्या रक्षेपासून तुला पुत्र झाला नाहीं कीं काय? किंवा होऊन मरण पावला कीं काय? मरण पावला असल्यास तो पुनरपि जिवंत करून तुझ्या स्वाधीन करीन, असें ईश्वरानें माझ्या आंगीं सामर्थ्य दिलें आहे. हें ऐकून ती झणाली कीं महाराज, तुमची प्रसाद रक्षा मी जर भक्षण केली नाहीं तर मला पुत्र कसा होईल? पुनरपि नाथानीं विचारलें कीं त्या रक्षेची व्यवस्था कशी झाली. तिनें उत्तर दिलें कीं ती मी भक्षण न करितां त्याच दिवशीं चुलीमध्यें टाकिली; व त्या चुलींतून ती रक्षा उकरड्यावर गेली असावी असें मला वाटतें. नंतर नाथानीं तिच्या भ्रतारास बोलावून कांहीं खनन करणारे मजूरदार लोक बरोबर घेऊन ते सर्व ज्या उकरड्यावर रक्षा टाकली होती तेथें आले, त्या मजूरदार लोकांकडून नाथानीं खनन करून त्या महाविस्तृत चिंचवृक्षाच्या अधोभागीं त्यांतून ब्राम्हण स्त्रीच्या व तिच्या भ्रतारासमक्ष बारा वर्षाचा मदन मूर्ती महा तेजस्वी असा पुत्र काढला. मत्स्येंद्रनाथ त्या पुत्रास बरोबर घेऊन निघाले तों त्या ब्राह्मण स्त्रीचा कंठ सद्गदित होऊन तिनें नाथांची अशी प्रार्थना केली

कीं महाराज मी फार अन्यायी आहे, अन्यायाची क्षमा **करणें** हें तुमचें कर्म होय तर तुह्मी माझ्या पदरांत संततीरूप भिक्षा घालावी असें ऐकून नाथाचें अंतःकरण कृपायुक्त होऊन त्यानीं पुनरपि तिला पुत्र होण्यासाठीं रक्षा दिली. आपण उकरड्यांतून उत्पन्न झालेल्या पुत्रास बरोबर घेऊन निघून जाते झाले. गाईनें रक्षण केला म्हणून त्याचें नांव **गोरक्ष** असें ठेविलें. ज्या चिंचेच्या वृक्षाखालीं **गोरक्ष** उत्पन्न झाले त्या वृक्षाला अद्यापि "गोरक्ष चिंच" असें ह्मणतात. असो. **मछेंद्र**नाथ व **गोरक्ष** मार्ग क्रमण करीत असतां एक्या गांवाबाहेर बाग होता तेथें बारा वाजण्याच्या सुमारास ते येऊन उतरले. **मछेंद्र**नाथानीं क्षुधा फार लागली म्हणून **गोरक्षा**स भिक्षा मागून आण अशी आज्ञा केली. **गोरक्ष** झोळी घेऊन त्या गांवांत भिक्षेकरितां एका ब्राम्हणाच्या घरीं आला. त्या दिवशीं त्या ब्राम्हणाच्या घरीं श्राद्ध होतें. श्राद्धीय ब्राम्हण भोजन करून उठले आहेत तों इतक्यांत **गोरक्षा**नें "आल्लख, माई भिच्छा लाव" असा मुखानें उच्चार केला. श्राद्धकर्त्या ब्राम्हणानें **गोरक्षा**स पाहून हा अतिथी महा तेजस्वी कोणी सिद्ध आहे असें मनांत आणून हांक मारून स्त्रियेस सांगितलें कीं, स्त्रिये, ह्या अतिथीस श्राद्धाकरितां जें मिष्टान्न केलें आहे, तें सर्व दे, मग तिनें घरांत जाऊन वडा, पोळी, क्षिप्रा इत्यादि श्राद्धीय अन्नाची भिक्षा **गोरक्षा**स घातली; **गोरक्ष** ती भिक्षा घेऊन परत **मत्स्येंद्र**नाथ जेथें होते तेथें आला. **मत्स्येंद्र**नाथानीं तें श्राद्धीय मिष्टान्न भक्षण करून त्या दिवशीं तेथेंच वास्तव्य केलें. दुसरे दिवशीं प्रातःकालीं उठल्यानंतर **मत्स्येंद्र**नाथानीं पुनरपि कालचीच वडा पोळीची भिक्षा आण असें अग्रहानें **गोरक्षा**स सांगितलें. **गोरक्ष** गुर्वाज्ञा प्रमाण ह्मणून झोळी घेऊन गांवांत ज्या ब्राह्मणाच्या घरीं वडापोळीची भिक्षा मिळाली होती, त्याच ब्राह्मणाच्या घरीं आला. त्या दिवशीं तो ब्राह्मण घरीं नसून त्याची स्त्री साम्मार्जनादिक गृहकर्म करीत होती, इतक्यांत **गोरक्षा**नें "आल्लखमाई भिच्छा लाव" असें पुकारलें. ती बाई नित्याप्रमाणें धान्य घेऊन **गोर**क्षास भिक्षा घालावयास आली. गोरक्षानें ती धान्य भिक्षा पाहून बाईस भाषण केलें कीं "माई यह भिच्छो मेरेकू नही चैये, तो कलकी वडा और पोली लाव." बाईनें क्रोधयुक्त

होऊन सांगितलें कीं मेल्या काल माझ्या सासऱ्याचें श्राद्ध होतें ह्मणून तुला वडापोळीची भिक्षा घातली होती, परंतु आजरे काय आहे. गोरक्षानें उत्तर दिलें कीं " आज बी बाई सराध करो " हें ऐकून बाईस तर फारच क्रोध आला. तिनें गोरक्षास बरेच वेळ गालीप्रदान केलें. शेवटीं गोरक्षानें बाईस असें सांगितलें कीं ह्यापेक्षां तूं जरी सक्रोध होऊन मला बोललीस तरी मी वडापोळीची भिक्षा घेतल्या वांचून कधींही जाणार नाहीं. असा गोरक्षाचा आग्रह पाहून बाईनें सहज क्रोधावेशानें भाषण केलें कीं जर तूं वडापोळी घेतल्यावांचून जाणार नाहींस तर मी तुझा डोळा घेतल्यावांचून तुला पोळीची भिक्षा घालणार नाहीं. वडा पोळी फुकट लागली काय ? नंतर गोरक्षानें बाईचें वचन ऐकून आपला डावा डोळा हातानें काढून तिच्या स्वाधीन केला. हें वर्तमान जर सरकारांत कळेल तर आपल्याला राजा शासन करील असें जाणून तिनें मोठ्या भीतीनें गोरक्षास घरांत बसवून वडा, पोळी, क्षिप्रा, इत्यादि नवे अन्न तयार करून त्या अन्नाची विपूल भिक्षा गोरक्षास घातली आणि असें सांगितलें कीं ही डोळ्याची गोष्ट तूं कोणाजवळ बोलू नकोस. गोरक्ष, मी कोणाजवळ बोलणार नाहीं असें तिला म्हणून एक हातानें डावा डोळा अच्छादन करून ती वडा पोळीची भिक्षा घेऊन मत्स्येंद्रनाथाजवळ आला आणि ती भिक्षा त्यांच्या समोर ठेविली. कालचीच भिक्षा पाहून नाथास फार आनंद झाला. नाथानें गोरक्षाच्या मुखाकडे अवलोकन केलें तों गोरक्षानें डावा डोळा हातानें अच्छादन केला आहे. हें पाहून त्यास विचारलें कीं डावा डोळा अच्छादन करण्याचें कारण काय ? नंतर गोरक्षानें झालेलें वर्तमान सर्व सद्गुरु मत्स्येंद्रनाथास निवेदन केलें. तें ऐकून मत्स्येंद्रनाथ म्हणाले कीं गोरक्षा जसा त्या बाईला एक डोळा दिलास तसा मला ही एक डोळा दे. गोरक्ष म्हणाला कीं महाराज, तुम्हाला वडापोळीची भिक्षा लागत होती, ह्मणून त्या बाईला जर एक डोळा दिला तर तुह्माला देणार नाहीं असें कसें होईल ? असें बोलून त्यानें उजवा डोळा हातानें काढून सद्गुरु मत्स्येंद्रनाथापुढें ठेविला. ती गोरक्षाची अनन्य भक्ति पाहून याची निष्ठा माझे ठायीं फार आहे असे जाणून त्याच वेळेस आपल्या तपोबळानें त्याच्या नेत्रावरून हात फिरवुन

पूर्वींपेक्षांही त्यास सर्वोत्कृष्ट नेत्र दिलें. आणखी त्याच वेळेस तेथें आदिनाथ **शंकरा**पासून प्राप्त झालेलें जें ज्ञान त्या सर्व ज्ञानाचा उपदेश करून त्याच्या मस्तकावर हस्त ठेऊन त्यास कृतार्थ केलें, व **गोरक्षा**स शैली, शिंगी, पुंगी देऊन त्यास तप करावयास सांगून आपण निघून गेलें. ह्याप्रमाणें **मत्स्येंद्र**नाथापासून **गोरक्षा**स **शंकरो**पदिष्ट ज्ञान प्राप्त झालें. **निवृत्ति** सांगतात **ज्ञानदेवा ! गोरक्ष**नाथानीं गुर्वाज्ञेप्रमाणें बारा वर्ष पतश्चर्या करून ते तीर्थ यात्रा करावयास निघाले. आतां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें **मत्स्येंद्र**नाथानीं दिलेली रक्षा त्या ब्राह्मणस्त्रीनें ग्रहण करून तिला एक पुत्ररत्न झालें. त्याचें नांव **गैनी** असें ठेविलें मुलाचें अष्ठ वर्षांनीं मौंजीबंधन झाल्यावर त्याचें आईबाप मरण पावलें. कांहीं दिवसांनीं उदरनिर्वाहा करितां त्या **गैनीनें** त्या गांवांत पेढेबर्फी विकण्याचें दुकान मांडलें. ईश्वरसत्तेनें त्यानें त्या व्यापारांत द्रव्य संपादन करून तीर्थरूपाच्या मागें विवाह करून गृहस्थाश्रम केला. त्यास तीन पुत्र झाले. त्याच्या अंतःकरणांत वारंवार अनुताप उत्पन्न होऊं लागला. त्यास असें वाटे कीं मला नरदेह प्राप्त होऊन मी जन्माचें सार्थक कांहींच केलें नाहीं. केवल द्रव्य संपादून स्त्रीपुत्रादिकांचा उदरनिर्वाहा मात्र केला, असे उद्गार त्याचे अंतःकरणांत स्फुरण पाऊं लागले. असो, ह्या गोष्ठीला कांहीं दिवस झाल्यावर **गोरक्ष**नाथ तीर्थ भ्रमण करीत ज्याठिकाणीं आपला बंधु **गैनी** होता तेथें प्राप्त झाले. दोन प्रहरच्या सुमारास **गोरक्ष**नाथ भिक्षार्थ त्या गांवांतून जात असतां मुखानें मला कोणी खाण्यास अन्न देईल त्यास मी ब्रह्मदर्शन करवीन, असा उच्चार करीत चालले. हे **गोरक्ष**नाथाचे शब्द त्या **गैनी**च्या कर्णीं पडतांच त्यानें असें मनांत आणिलें कीं केवल अन्नदानानें ब्रह्मदर्शन होत आहे तर आपल्या घरीं अन्नास कांहीं कमी नाहीं, व आपणही ब्रह्मदर्शनेच्छूच आहों असा विचार करून **गैनीनें** अन्न घेऊन तो **गोरक्षा**च्या मागें धावला. गांवाबाहेर आल्यानर **गैनीनें गोरक्षा**चे चरणास दंडवतप्रणिपात करून भाषण केलें कीं महाराज, आपण बोलल्याप्रमाणें मी अन्न घेऊन आलों आहे तर मला ब्रह्मदर्शन करवावें, ही माझी विनयपूर्वक प्रार्थना आहे. हें भाषण श्रवण करून **गोरक्ष**नाथानीं

आपल्या मनांत असा विचार केला कीं अधिकारावाचून उपदेश करणें योग्य नव्हे. अनाधिकारी पुरूषास उपदेश केला असतां तो अपकारास्पद होय **॥श्लो०॥ उपदेशोहिमूर्खाणांप्रकोपायनशांतये ॥ पयःपानंभुजंगानांकेवलंविषवर्धनं** ॥ १ ॥ मूर्खाला उपदेश शांतीप्रत न होता कोप वृद्धीस कारण होतो. जसें भुजंगास पयपान करविलें असतां ते विषवृद्धीस कारण होते. ह्मणून शिष्य प्राज्ञ व साधन चतुष्टयाद्यधिकार संपन्न असावा. असें मनांत आणून **गोरक्षानें गैनीस** असें भाषण केलें कीं तूं कोण आहेस, व तुझ्या आईबापाचें नांव काय तें सर्व सांग तें ऐकून **गैनीनें गोरक्ष**नाथास आपलें सर्व वर्त्तमान निवेदन केलें. त्यांत असें सांगितलें कीं **मत्स्येंद्र**नाथाच्या रक्षारूप प्रसादानें माझ्या आईस आह्मीं दोन मुलें झालों. त्यापैकीं माझा जो जेष्ट बंधु तो त्या सद्गुरु **मत्स्येंद्र**नाथाच्या बरोबर कोठें गेला त्याचा शोध नाहीं. मातापिता निवर्त्तल्यावर ह्या गांवांत पेढेबर्फीचें दुकान मांडून उदरनिर्वाह करीत असतों. हें भाषण श्रवण करून **गोरक्षास** पूर्णपणें कळलें कीं हा माझाच बंधु आहे. परंतु साधनाधिकार संपन्न नाहीं, त्यास काय करावें. **गोरक्ष**नाथानीं ओळख न देतां **गैनीस** असें सांगितलें कीं तूं जर ब्रह्मदर्शनेच्छा करीत आहेस तर मी सांगेन त्याप्रमाणें तूं वर्तन केलें पाहिजे. तो **गैनी** साधनचतुष्टयसंपन्न जरी नव्हता तरी मनांत ब्रह्मजिज्ञासा आसल्या कारणानें त्यानें तें सर्व **गोर**क्षाचें भाषण कबूल केलें. **गोर**क्षानें त्यास असें सांगितलें कीं मी एक महिन्यानीं परत येईन तोंकालपर्यंत ( तूं मनांत येईल ते करूं नकोस ) माझें सांगणें आहे. असें बोलून **गोर**क्षनाथ तेथून निघून गेले. इकडे **गैनी गोर**क्षाच्या आज्ञेप्रमाणें तेथेंच उभा राहिला, दोन घटका झाल्यानंतर त्याच्या मनांत असें आले कीं आपण घरीं जावें. स्त्रीपुत्रादिक आपली मार्गप्रतीक्षा करीत असतील आणखी आपल्या पोटांत ही क्षुधा फार लागली आहे. असें ज्यावेळेस त्याच्या मनांत आले त्याचवेळेस त्याला मनांत येईल ते करूं नकोस अशा **गोर**क्षाच्या आज्ञेचें स्मरण झालें. **गोर**क्षाच्या वचनावर पूर्ण विश्वास असल्यामुळें व अंतःकरणांत ब्रह्मजिज्ञासा असल्याकारणानें तो मनांत आलेल्या व्यापाराचा निषेध करून गुर्वाज्ञेरूप वर्तन करूं लागला. असो. ज्या ज्या वेळेस त्याच्या

जें जें मनांत येईल त्या त्या वेळेस गोरक्षाची आज्ञा त्याला निरोध करिती झाली, सप्तदिन झाल्यानंतर हस्तपादादिकांचें चलन वलन स्तब्ध राहून केवळ त्याची मनोवृत्ति गोरक्षनाथ केव्हां येतील व ते माझ्या मस्तकावर हस्त ठेऊन केव्हां ब्रह्मदर्शन करवतील इतकेंच मात्र चिंतन करूं लागली. एक महिना पूर्ण झाल्यानंतर पुनरपि गोरक्षनाथ तेथें आले आणि गैनीकडे अवलोकन करितात तों त्याच्या मनाचें सर्व संकल्प विकल्प मावळून अंतःकरणांत केवल ब्रह्मजिज्ञासाच राहिली आहे. त्या योगानें त्यास सहजच उपदेशाधिकार येऊन पोहाचला. असें पाहून गोरक्षास परम संतोष जाहला. अधीं सहोदर बंधु त्यावर अधिकार संपन्नत्व, मग काय विचारावें? नंतर गोरक्षनाथानीं श्रीशंकरोपदिष्ट मत्स्येंद्रानें सांगितलेलें जें ज्ञान त्याचा उपदेश ते गैनीस करते झाले. ज्ञानोपदेश करून गोरक्षनाथ सद्गुरु मत्स्येंद्र नाथाचा शोध करावयास निघाले. त्या वेळेसच गोरक्षानें गैनीस असें सांगितलें कीं तूं त्र्यंबकेश्वरीं जाऊन तप कर कांहीं दिवसांनीं विठ्ठलपंताचा जेष्ट पुत्र जो निवृत्ति तो तेथें येईल. त्यास मदुपदिष्ट तत्वज्ञान निवेदन करून असें सांग कीं तुझा जो मध्यम बंधु त्याला हें ज्ञान कथन कर. असें सांगून गोरक्षनाथ तेथून निघून गेले, व गैनीनाथ त्र्यंबकेश्वरीं येऊन अंजनीपर्वताच्या गुहेंत आश्रम बांधून कांहीं ऋषींसह वर्त्तमान तेथें ते घोर तपाचरण करीत बसले ह्याप्रमाणें गोरक्षनाथापासून गैनीनाथास तत्वज्ञान प्राप्त झालें. आतां सद्गुरु गैनीनाथापासून मी शंकरोपादिष्ट तत्वज्ञान कसें संपादन केलें हें सर्व तुला विदितच आहे, तें कांहीं तुला सांगावयास नको. असा हा मी तुला कानफाटी नाथसंप्रदाय कथन केला. आदिनाथापासून मत्स्येंद्रनाथाप्रत व मत्स्येंद्रनाथापासून गोरक्षनाथाप्रत व गोरक्षनाथापासून गैनीनाथाप्रत व गैनीनाथापासून मजप्रत जें तत्वज्ञान प्राप्त झालें तें मी तुला यथोपदिष्ट कथन करितों. असे बोलून निवृत्तिनाथानीं ज्ञानदेवास पुर्वोक्त प्रकृतिपुरुषाचा विवेक पंचकोशाचा निरास, कर्म, उपासना, ज्ञान, अष्टांगयोग, गोरक्षकिमया आणि शाबरीमंत्रोपासना इत्यादि उपदेश सात दिवस पर्यंत केला. ज्ञानेश्वरास असें वाटलें कीं या उपदेशाच्या योगानें मी धन्य झालों. असो, ते उभयतां आठवे दिवशीं त्र्यंबकेश्वरीं आपलें बिऱ्हाडीं आले,

## ॥ तृतीयोल्लासः ॥

### श्री वि ठ्ठ ल

# ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

॥ ललायस्यवक्त्राच्छ्रुतीःपाठयंतं । प्रतिष्टानपुर्यांसुधीसंगसेव्यं ॥
॥ चतुर्वेदतंत्रेतिहासादिपूर्णं । समाधिस्थमूर्तिंभजेज्ञानदेवं ॥ १॥

पहा, सूर्योदय झाला म्हणजे जसा अंधःकाराचा नाश होतो तसा **निवृत्तिच्या** उपदेशानें **ज्ञानेश्वराच्या** अंतःकरणांत तत्वज्ञानोदय होऊन मायामय अज्ञानाचा नाश झाला. असो;* **निवृत्ति** व **ज्ञानदेव** हे उभयतां बिन्हाडीं आल्यानंतर पूर्ववत् वर्तन करूं लागले. **ज्ञानदेव** व **निवृत्ति** दिवसा उपदेशात्मक भाषण करून नित्य रात्रौ बिन्हाडीं येत असल्याकारणानें **विठ्ठलपंतास** पुत्रवियोगजन्य दुःख झालें नाहीं. **निवृत्तीनें** उपदेशामध्यें कथन केलेलीं अष्टांगयोग **गोरक्ष**किमया शाबरीमंत्र आणि तंत्रोपासना इत्यादिकांच्या दैवतांची सिद्धि व्हावी म्हणून **ज्ञानेश्वर** नित्य रात्रीं पूर्वोक्त औदुंबर वृक्षाच्या छायेखालीं वसून योगादिकांचें अनुष्टान करूं लागले. षण्मासपर्यंत अनुष्ठान केलें, त्या योगानें एके दिवशीं रात्रौ बारा वाजण्याच्या सुमारास पूर्वोक्त नरसी, कालिका, महिषासुर, **महंमद**, झोटिंग, इत्यादि बावन् बीर **ज्ञानेश्वराच्या** सन्निध प्रसन्न होऊन मूर्तिमंत उभे राहिले. सर्वांनीं "वरंब्रूहि वरंब्रूहि" असा मुखानें उच्चार केला तें ऐकून ज्ञानेश्वरानीं त्या सर्वांस साष्टांग नमस्कार करून भाषण केलें कीं, महाराज, आपण सर्व

---

* ही कथा नामदेवकृत आदिमध्यें, भक्तिविजयामध्यें, भक्तितत्वांममध्यें, नाथलीलामृतामध्यें, व मत्स्येंद्र संहितेमध्यें वर्णन केली आहे, आणि या विषयीं देहूकर तुकारामाचे, एकनाथाचे, व निळोबाचे इत्यादि बहुत संतांचे अभंग प्रमाणभूत आहेत. नाभाजीनेंही ही कथा संतमालिकेमध्यें वर्णिली आहे.

मला प्रसन्न जर आहांत तर कृपा करून ज्या ज्या वेळेस माझ्यावर संकट प्रसंग येतील त्या त्या वेळेस सर्वांनीं उपयुक्त होऊन माझें संकट प्रसंग निवारण करावेत ही माझी प्रार्थना आहे. असें **ज्ञानेश्वराचें** सविनय वचन श्रवण करून बावन्वीरांनीं तथास्तु तथास्तु असा उच्चार केला आणि ते सर्व निघून जाते झाले. नंतर **ज्ञानदेवानें** अष्टांग योग साधन करण्यास प्रारंभ केला. षण्मासपर्यंत तेंही साधन अनुष्ठित करून त्या योगानें अणिमादिक सिद्धिही प्राप्त झाल्या. आकाशांतून कसें गमन करावें, भूमीला स्पर्श न करितां कसें चालावें, गुप्त कसें व्हावें, दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश कसा करावा, इत्यादिकामध्यें ते मोठे कुशल झाले, किंबहुना **श्रीमच्छंकराचार्यापेक्षांही** योगामध्यें **ज्ञानेश्वर** अति कुशल असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण स्वकीय देहाचा त्याग करून आचार्यांनीं परकाय प्रवेश केला असा **शांकर**दिग्विजयामध्यें इतिहास आहे. आणि **ज्ञानेश्वरानीं** स्वकीय देहाचा त्याग न करितां परकाय प्रवेश करावा. उदाहरण—वक्ष्यमाण कथेमध्यें **प्रतिष्ठान** क्षेत्रीं रेड्याच्या मुखांतून वेद बोलविले आहेत—त्या वेळेस त्याच्या शरीरांतर्गत आपणच प्रवेश करून श्रुति पठण केली, असें **मत्स्येंद्र** संहिता करणाराचें मत आहे. असो. **त्र्यंबकेश्वरीं** एक वर्षपर्यंत **ज्ञानेश्वरानीं** अष्टांगयोग, गोरक्ष किमया, व शाबरीमंत्राच्या देवता या सर्वांची अनुकूलता करून घेतली. क्रियेच्या उत्कर्षामुळें **ज्ञानेश्वराचें** शरीर सूर्यासारखें तेजस्वी भासूं लागलें. मनुष्यानीं **ज्ञानेश्वरास** अवलोकन केलें असतां त्यांस असा भास होई कीं, हा मुलगा कोणी महा सिद्ध आहे, किंवा प्रत्यक्ष जगत्पालक नारायण त्यांचा जगदुद्धारार्थ भूमितलावर अवतारच घेतला आहे कीं काय ? असो. एके दिवशीं **निवृत्तिनीं ज्ञानेश्वरास** बोलाऊन असें सांगितलें कीं, **ज्ञानेश्वरा,** तूं मदुपदिष्ट शांकरीब्रह्मविद्येप्रत **सोपानास** व **मुक्ता**बाईस कथन कर. **ज्ञानेश्वरानीं निवृत्तिनी** आज्ञा शिरसामान्य करून तदनुरूप सोपानास व मुक्ताबाईस शांकरीब्रह्मविद्येचा उपदेश केला. याप्रमाणें **निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान** आणि **मुक्ताबाई** ते चवघेही महा सिद्ध ज्ञानसंपन्न झाले, परंतु त्या चवघांमध्यें क्रियोत्कर्षत्वानें **श्रीज्ञानेश्वराचे** ठायीं तेजस्विता, **बुद्धिकुशलता,** ज्ञानसंपन्नता, आणि वाक्शक्ति

जशी होती तशी तिघांचे ठायीं नव्हती. त्या चवघांचें ज्ञानसंपन्नत्व पाहून विठ्ठलपंताचे अंतःकरणास अत्यानंद झाला. त्यास असें वाटलें कीं, मी या तीन मुलासहवर्तमान कोठेंही गेलों तर माझा जयच होईल. कारण **निवृत्ति ज्ञानदेव**, आणि **सोपान** हे तिघे ईश्वरांश आहेत असें वाटलें. **विठ्ठल**पंतानें आपल्या तीन मुलांस बोलाऊन असें भाषण केलें कीं, मुलानो, तुमचें वय मौंजीबंधनकालाचा अतिक्रम करीत आहे. तर आपण सर्व श्रीक्षेत्र **पैठणास** जाऊन तत्रस्थ ब्राह्मणाचें " शुद्धिपत्र " घेतलें म्हणजे ज्ञातीसंबंधीं मौंजीविवाहास अडचण पडणार नाहीं, व आपण **त्र्यंबकेश्वरीं** तप करण्याचें कारण तरी हेंच आहे असें **विठ्ठल**पंताचें भाषण **निवृत्ति** प्रभृतींनीं मान्य केल्यानंतर त्यानें आपल्या मुला व कुटुंबासहवर्तमान **प्रतिष्ठान** क्षेत्रीं जाण्याची तयारी केली. **विठ्ठल**पंत, **रखुमाबाई**, **निवृत्ति**, ज्ञानदेव, **सोपान**, आणि **मुक्ताबाई** या सर्वांनीं **त्र्यंबकेश्वरास** साष्टांग प्रणिपात करून तेथून निघाले. मोठ्या आनंदानें मार्ग क्रमण करीत असतां सातवे दिवशीं ते श्री क्षेत्र **पैठणास** येऊन पोंहचले. तेथें ***कृष्णाजी**पंत या नांवाचे **विठ्ठल**पंताचें मातुल रहात होते, त्यांना **गोविंद**पंत निवर्तल्यापासून **विठ्ठल**पंताचें वर्तमानच कळत नसे. असो; **विठ्ठल**पंत आपल्या मुलां सहवर्तमान मातुलाच्या घरीं आले. फारा दिवसांनीं यांची त्यांची भेट, मग काय विचारावे ! **कृष्णाजी**पंतास **विठ्ठल**पंत पाहून फारच आनंद झाला. उभयतांनीं भोजनोत्तर मोठें प्रेमभरित भाषण करून **विठ्ठल**पंतानें असें सांगितलें कीं, मामा ! मी तीर्थरूपाच्यामागें प्रपंच्याविषयीं उदासीन होऊन संन्यास दीक्षा धारण केली नंतर गुर्वाज्ञेनें पुनरपि स्वस्त्रीच्यासहवर्तनान गृहस्थाश्रम केला. कांहीं दिवसांनीं ह्या स्त्रीपासून मला तीन पुत्र व एक कन्या झाली. हें वर्तमान **आळंदीकर** ब्राम्हणांस विदितच होतें. त्यांनीं एके दिवशीं चार पांच गांवचे ब्राम्हण जमा करूनमला जातीबहिष्कृत ठेविलें. माझा जेष्ट पुत्र

---

* ही कृष्णाजीपंताची कथा एकनाथाच्या कथेसारखी कांहीं आहे, ह्मणून वाचकांस असें वाटेल कीं ही एकनाथाच्याच गोष्टीप्रमाणें गोष्ट रचली आहे. तर असें नाहीं यांविषयीं आदिमध्यें नामदेवानें व भक्तिलीलामृतामध्यें, व भक्तिविजयामध्यें, महीपतीनें वर्णन केलें आहे.

जो **निवृत्ति** त्याचें वय मौंजीबंधनास योग्य झाल्या कारणानें मी पुनरपि ब्राम्हण मंडळीची सभा केली. त्या सभेमध्यें ब्राह्मणांनीं मला असें सांगितलें कीं **आप**गांव तुझें वडिलोपार्जित वास्तव्य करण्याचें स्थान होय, व त्या गांवापासून **पैठण** क्षेत्र जवळच आहे. तेथें तूं जाऊन **पैठण** क्षेत्रस्थ ब्राह्मणाचें शुद्धिपत्र जर आणशील तर आम्ही तुझ्या मुलांचें मौंजीबंधन करूं. असें बोलून सभा विसर्जन झाली. तें ऐकून मीही तेथून निघून कांहीं दिवस **त्र्यंबकेश्वरीं** वास केला. नंतर त्या ग्रामाचा त्याग करून मार्ग क्रमण करीत मी येथें आलों आहे. मामा ? मला तरी बाबांच्या मागें वडील तुम्हीच आहात. मुलाविषयीं काळजी करणें हें वडिलाचें कर्तव्य होय. असें **विठ्ठलपंता**चें सविनय भाषण श्रवण करून **कृ**ष्णाजीपंतानें असा प्रश्न केला कीं **विठ्ठलपंता** ? तूं वेदशास्त्रार्थाचा अभिज्ञ असून असें कर्म कसें केलेस. **विठ्ठलपंता**नें उत्तर दिलें कीं मामा ? " नैवान्यथाभवतियल्लिखितंविधात्रा " अहो ब्रह्मलिखित जें असेल तें कधींही खोटें व्हावयाचें नाहीं. कारण गीतेंत ह्मटलें आहे कीं- **श्लोक स्वभावजेनकौंतेयानिबद्धस्वेनकर्मणा ॥ कर्तुंनेच्छसियन्मोहात्करिष्यस्यवशोपितत् ॥ १ ॥** अर्थ० ॥ जीव स्वाभाविक स्वकीय कर्माच्यायोगानें बद्ध झाला आहे. तो कर्माधीन आहे. उदाहरण कृष्ण म्हणतात अर्जुना ? तूं जे भीष्मद्रोणादि गुरूमंडळीस मरण्याविषयीं इच्छा करीत नाहींस, कारण, गुर्वादिकांचे हनन करणें हें निंद्य कर्म होय तोच तूं अवश होत्साता भीष्मादिकांचें हनन करशील. कारण सर्व कर्म " सूत्र ग्रथितोहि लोकः " जीव कर्म सूत्रानीं बद्ध आहे. तर मामा ? आपण त्या कर्माचें उल्लंघन करण्याविषयीं कसें समर्थ होऊ ? असो. गतगोष्टीचा विचार करून उपयोग नाहीं. पुढें काय करावयाचें असेल तेंच केलें पाहिजे. याप्रमाणें उभयतांचें भाषण एक प्रहर पर्यंत झालें. कृष्णाजीपंतांनीं दुसरे दिवशीं आपल्या घरीं सर्व ग्रामस्थ ब्राम्हणांची सभा केली. वैदिक, शास्त्री, पुराणीक इत्यादिक सर्व ब्राह्मण जमा झाल्यानंतर **विठ्ठलपंतां**नीं मुलासहवर्तमान सर्वास साष्टांगनमस्कार केला, आणि भाषण केलें कीं महाराज ? **श्लोक ॥ विप्रौघदर्शनात्क्षिप्रंक्षीयंतेपापराशयः ॥ वंदनान्मंगलावाप्तिरर्चनादच्युतंपदं ॥ १ ॥** अर्थ अहो तुमच्या दर्शनें करून सकल पातकें क्षया-

प्रत पावतात; तुम्हांस नमस्कार केला असतां सकल कल्याण प्राप्ती होते आणि तुमचें पूजन केलें असतां अच्युतपदाची प्राप्ती होते. असा तुह्मा विप्रसमूदायाचा अधिकार आहे. आपल्या आंगीं त्रैलोक्य पावन करण्याचें सामर्थ्य आहे. तर मी यःकश्चित पावन होईन यांत आश्चर्य नाहीं. आतां माझें सर्व वर्तमान तुह्मी श्रवण करावें. मी आपेगांवचा कुळकर्णी यजुर्वेदी ब्राह्मण आहे. माझ्या बापाचें नांव गोविंदपंत व माझें नांव विठ्ठल, माझें मौंजीबंधन व लग्न तीर्थरूपाच्या समक्षच झाले. माझे श्वशूरगृह पुण्यापासून पांच कोसांवर आळंदी ग्रामीं आहे. तीर्थरूप निवर्त्तल्यानंतर मी उदासीन होऊन कर्म संन्यास धारण केला. कांहीं दिवसांनीं श्रीगुरूच्या आज्ञेनें पुनरपि स्वस्त्रीचा अंगिकार करून तीजपासून मला तीन पुत्र व एक कन्या झाली. ती मुलें मौंजीबंधन करण्यास योग्य झालीं आहेत. तर समस्त ब्राह्मणांनीं क्षमा करून मला पंक्तिपावन करावें. आणि मुलांच्या व्रतबंधाविषयीं आज्ञा द्यावी. ही विनंती मी पूर्वीं आळंदी क्षेत्रस्थ ब्राम्हणास हो केली आहे परंतु ते आपले ( पैठणक्षेत्रस्थ ब्राह्मणाचें ) शुद्धिपत्र मागतात. म्हणून मी आपल्या चरणारविंदीं प्राप्त झालों आहे तर आपण कृपा करून मला पावन करावें. अशी विठ्ठलपंताची अद्भुत गोष्ट सर्व ब्राह्मणांनीं ऐकून ते हसूं लागले. ब्राम्हणांनीं विठ्ठलपंतास विचारलें कीं संन्यासग्रहण केल्यानंतर ग्रहस्थाश्रम करण्याविषयीं कोणच्या मूर्ख गुरूनीं आज्ञा दिली त्याचें नांव सांग. विठ्ठलपंतानें उत्तर दिलें कीं काशीक्षेत्रस्थ रामानंदस्वामीनीं असें करण्याविषयीं आज्ञा दिली आहे. हें ऐकून सर्व ब्राम्हण फारच हसूं लागले, आणि म्हणाले कीं योग्यच आहे, जसे गुरु तसेच शिष्य, गुरुनीं रामानुजी विशिष्टाद्वैत मताचा त्याग करून शांकरमताचा अंगिकार केला व काशीतील वासकरणारा कबीर या नांवाचा मुसलमान शिष्य करून त्यास तत्वज्ञान कथन केलें. त्याच्याच आज्ञेनें शिष्यानीं संन्यास घेऊन गृहस्थाश्रम केला, युक्तच झालें. हें ऐकून विठ्ठलपंतानें सद्गदित होऊन भाषण केलें कीं महाराज ! आमचे सहस्रावधि जरी अपराध असले तरी त्यांची क्षमा करणें हें तुमचें कर्म होय. जातीस गंगा अशी उपमा देतात; तर जसी गंगा असंगल गांवांतील

ओढा व मोरीचें उदक या सर्वांस पवित्र करिते, तसी जाती ही मत्स-दृश पातक्यास पावन करिते. असें सविनय भाषण सर्वांनीं श्रवण करून दोन घटिकापर्यंत शास्त्रपुस्तकाच्या अर्थाचा विचार करीत बसले; परंतु असें वेद बाह्य निंद्य कर्म करणाऱ्यास प्रायश्चित शास्त्रानें कोठेंही सांगितलें नाहीं. व संन्याशाच्या मुलाचा व्रतबंध कधींही कोठें झाला नाहीं. याप्रमाणें मुहूर्तमात्र सर्वांनीं विचार करून असें भाषण केलें कीं विठ्ठलपंता ! तूं हें वेदबाह्यकर्म केलें आहेस, तुला शुद्ध करण्याविषयीं प्रायश्चित शास्त्रानें सांगितलें नाहीं तर तूं जातीच्या नादी न लागतां मुलांसहवर्तमान अध्यात्मविद्या संपादन करून जगदीश्वराची उपासना करावी. त्या योगानें तुम्हीं सर्वांनीं आपल्या देहाचें सार्थक करावें. असें बोलून सर्व सभा विसर्जन झाली. सभावृत ऐकून विठ्ठलपंतास अत्यंत दुःख झालें. नेत्रांतून अस्खलित अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यानें असा विचार केला कीं माझ्या पुत्राचें मौंजीबंधन ह्या जन्मी होत नाहीं. जगदीश्वराची मर्जी. त्यास उपाय नाहीं. इतक्यांत विठ्ठलपंताचे नेत्रीं आश्रू पाहून निवृत्ति ज्ञानदेवानीं त्यांचें शांतवन केलें कीं बाबा ः व्यर्थ शोक कां करितां ? आम्हाला ब्राम्हणत्व व्रतबंध संस्कार केल्यानें येत नाहीं; व न केल्यानें भ्रष्ठ होत नाहीं. याचा सिद्धांत असा आहे कीं ज्या पुरुषास सर्वाधिष्टान् निराकार ब्रह्माचें ज्ञान झालें तो स्वतः सिद्ध ब्राम्हणच आहे. ब्राम्हण या शद्बाचा ब्रम्ह जानाति यः, असा विग्रह आहे. तर एतादृश ज्ञात्यापुरुषास पूर्वमीमांसा निरूपित विधिनिषेधाचा संबंध नाहीं. आतां शोक करून शरीरास दुःख मात्र होतें. असें उभयतांचें भाषण ऐकून कृष्णाजीपंतासही फार वाईट वाटलें. तो दिवस गेल्यानंतर दुसरे दिवशीं ग्रामस्थ ब्राम्हणांनीं कृष्णाजीपंतास व विठ्ठलपंतप्रभृतीस न कळिवतां एक सभा केली. त्या सभेंत कृष्णाजीपंत हे जाति भ्रष्ट झालेले जो विठ्ठलपंत व त्यांचीं मुलें त्यांच्याबरोबर अन्नव्यवहार करितात, तस्मात् कृष्णाजीपंतही जाति भ्रष्ट आहेत. त्याचें गृहीं कोणी भोजनास जाऊं नये. असा सर्व ब्राह्मणांनीं ठराव केला. या गोष्टीस दोन दिवस झाल्यानंतर कृष्णाजीपंताच्या बापाची मृत्युतिथी प्राप्त झाली. कृष्णाजीपंतानें चालीप्रमाणें पूर्व दिवशीं पांच

ब्राह्मणांस व इष्टमित्रास भोजनाचीं निमंत्रणें केलीं. पूर्वोक्त विप्रमंडळींचा ठराव कृष्णाजीपंतास माहीत नव्हाता पितृतिथीच्या दिवशीं स्वयंपाक-सिद्ध झाल्यावर त्यानें चिरंजीवास ब्राह्मण बोलाऊन आण अशी आज्ञा केली. चिरंजीव ब्राह्मांणस व इष्टमित्रास बोलावणें करीत असतां सर्वांनीं त्यास असें सांगितलें कीं तुह्मी कुटुंबीसंन्याशाच्या व त्याच्या मुलांच्या पंक्तीस बसून भोजन करिता म्हणोन तुमच्या घरीं भोजनास कोणीही येणार नाहींत. हें वर्तमान चिरंजीवानें कृष्णाजीपंतास कळिवलें. कृष्णा जीपंत स्वतः बोलावणें करण्यास गेले असतां सर्व ब्राह्मणांनीं चिरंजीवा प्रमाणेंच त्यास आह्मीं भोजनास येत नाहीं असें उत्तर दिलें. तें ऐकून कृष्णाजीपंत आपले घरीं येऊन अत्यंत शोक करूं लागले. नेत्रांतन आश्रू गाळीत ह्मणाले कीं आज माझे पितर उपोषित निराश होऊन जातील नां? काय मी त्यांच्या कुळांत होऊन उपयोग, यापेक्षां मृत्यु बरा. कायहो आश्चर्य, ढेकणाच्या संगतीनें जसें हिऱ्याचें मोल जातें तसें विठ्ठलपंताच्या व त्यांच्या मुलांच्या संगतीनें माझें यश गेलें. माझ्या कपाळीं अपकीर्तीचा डाग मात्र लागला. कायहो दुष्ट संगतीचें महात्म्य? असें भाषण ज्ञानेश्वरानीं श्रवण करितांच ते कृष्णाजीपंताच्या जवळ आले, आणि ह्मणाले कीं मामा? रुदन करण्याचें कारण काय? तुह्मास असा कोणचा संकटसमय प्राप्त झाला आहे तो निवेदन करा. कृष्णा-जीपंतानें उत्तर दिलें कीं ज्ञानदेवा! आज माझ्या घरीं पितृश्राद्धतिथी आहे ह्मणून मी ग्रामस्थ ब्राम्हणास निमंत्रणें केलीं परंतु ते कोणी माझ्या घरीं भोजनास येत नाहींत. ज्ञानदेवानीं विचारिलें कीं न येण्याचें कारण काय बरें असावें? कृष्णाजीपंत भाषण करितात कीं मी तुमच्या पंक्तीस नित्यभोजन करितों ह्मणून मला ग्रामस्थ ब्राह्मणांनीं बहिष्कृत केलें आहे, काय करावें. कांहीं सुचत नाहीं. ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं मामा! येवढ्याच करितां इतकें दुःख करावयास नको. तुह्मी स्नान करा, ब्राह्मण भोजनास नाहीं आले तर त्यांचे बाप येतील. कृष्णाजीपंतानें प्रश्न केला कीं मेलेले पुरुष जीवंत होऊन पुनरपि परत कसे येतील! ज्ञानेश्वरानीं सांगितलें कीं मामा? तसेच येतील. तुह्मी स्नान तर करा. कृष्णाजीपंतास सहवासामुळें ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान सामर्थ्य विदित झालें होतें. त्यानें ज्ञानेश्वराचें भाषणावर विश्वास

ठेऊन स्नान केलें. संध्या, देवपूजादि, ब्रह्मकर्म, झाल्यावर ज्ञानेश्वरानीं देवाचे व पितरांचे पूर्वाभिमुख व उत्तराभिमुख पाट मांडिलें. त्यांनीं कृष्णाजीपंतास आसनावर बसऊन प्राणायाम करावयास सांगितला. नंतर श्राद्धीय वेदोक्त संकल्प ही कथन केला. कांहीं दर्भाच्या काड्या कृष्णाजीपंताच्या हातीं देऊन देवस्थानीं ठेवण्यास सांगितलें. ज्ञानेश्वरानीं जगदीश्वराची प्रार्थना करून " देवाः आगंतव्यं पितरः आगंतव्यं, " असा मुखानें उच्चार केला. ज्ञानेश्वरांच्या योगबलानें किंवा क्रियोत्कर्षजनितासिद्धीच्या योगानें प्रत्यक्ष निमंत्रित ब्राह्मणांचे पितर म्हणजे कोणाचे बाप, कोणाचे चुलते व कोणाचे आजे, या प्रमाणें देवस्थानच्या व पितृस्थानच्या पाटावर येऊन बसले. आणि त्यांनीं मंत्र सांगण्यास आरंभ केला. हें पाहून विठ्ठलपंतास व कृष्णाजीपंतास मोठे आश्चर्य वाटले. उभयतांनीं मनांत असा विचार केला कीं ज्ञानेश्वर हा मुलगा कोणी अनन्य साधारण महासिद्ध आहे, किंवा ही एक नारायणाची विभूतीच आहे. असो, कृष्णाजीपंताच्या बापाचें श्राद्धकर्म वेदोक्तविधीनें उत्तम प्रकारें झालें. श्राद्धीय भोजन तांबूल दक्षणादि प्रकार झाल्यानंतर स्वर्गस्थपितरस्वरूपी ब्राह्मणांनीं उच्चस्वरानें स्वास्तिवाचक मंत्राक्षता देण्यास आरंभ केला. शेजारी भट राहत होते त्यासही कृष्णाजीपंताकडून श्राद्धीय क्षणाचें अमंत्रण होतें. त्यानें त्या पितरांच्या मंत्राक्षतेचा उच्चस्वर श्रवण करून मनांत असा विचार केला कीं परवा सभा होऊन कृष्णाजीपंताच्या घरीं कोणी भोजनास जाऊ नये असा ठराव केला असतां आज भोजनास जाऊन कोण ब्राह्मण उच्चस्वरानें मंत्राक्षता देऊन श्राद्ध दक्षिणा उपटणार आहेत. त्यांस अवलोकन केल्यावांचून मला कधींही चैन पडावयाचें नाहीं. असें बोलून गोपाळभट, कृष्णंभट, दादंभट, आणि पिलंभट, या सर्वांच्या घरीं जाऊन त्यांना सर्व वर्तमान कळविलें. नंतर ते सर्व ब्राह्मण मिळून कृष्णाजीपंताच्या घरीं आले. दार उघडून आंत येऊन पहातात तों देवस्थानीं गोपालभटजींचे बाप बसले आहेत. दुसरे रामभटजींचे आजे आहेत. पितृस्थानीं पिलंभटजीचे चुलते बसले आहेत. आणि कृष्णभटजीचे वडील बंधुही आहेत तें पाहून रामभटादि सर्व भट मंडळी चकित होऊन उभी राहिली. इतक्यांत " उत्तिष्ठंतुपितरः

विश्वेदेवैः सह सर्वेषांस्वस्थानेवासः " असें म्हणून **कृष्णा**जीपंतानें दर्भाच्या काड्या पुनरपि देवपितारांच्या स्थानीं निक्षेपित केल्या. नंतर सर्व पितर जसे आले होते तसेच आकाशमार्गानें निघून चालते झाले. असा अद्भुत चमत्कार पाहून **रामभटप्रभृतीस** महद्दुःख झाले. ते परस्पर अपसात बोलू लागले कीं अहो हा माझा बाप आला होता; त्यास घरीं नेले असते तर बरें झालें असते. अशी परस्पर वाच्यता करून सर्वांनीं **कृष्णा**जीपंतास असें विचारिलें कीं आमचे बाप; आजे, व चुलते, हे मृत्यु पावले असतां ते तुझ्या घरी भोजनास कसे आले असें सामर्थ्य तुझ्या अंगीं होतें तर ज्या वेळेस ते मेले त्या वेळीं तूं तेथें प्रत्यक्ष आला असून त्यांना जिवंत कां केले नाहींस? **कृष्णा**जीपंतानें उत्तर दिलें कीं महाराज हें सामर्थ्य माझें नव्हे ? तर **विठ्ठल**पंताचा जो मध्यम पुत्र **ज्ञाने**श्वर त्याचें तप सामर्थ्य होय. त्या योगानें माझ्या घरीं पितर भोजनास आले होते. असें ऐकून भटमंडळीस फारच विस्मय झाला. सर्वांनीं **ज्ञाने**श्वराच्या पदारविंदीं साष्टांग प्रणिपात करून ते आपल्या घरीं निघून जाते झाले. ते मार्गानें जातांना **ज्ञाने**श्वरचा महिमा सर्व इष्टमित्रास सांगू लागले परंतु तें वृत्त निमंत्रिक ब्राह्मणाशिवाय कोणास ही खरें वाटलें नाहीं. त्या दिवसापासून **ज्ञाने**श्वरांची सत्कीर्ति **प्रतिष्ठान**क्षेत्रीं फारच विस्तृत झाली. सात दिवस झाल्यानंतर आठवे दिवशीं अर्धोदयपर्व प्राप्त झालें. त्या पर्वकाल निमित्त **पैठण**क्षेत्रस्थ ब्राह्मण व दुसऱ्या गांवचे ब्राह्मण **गो**दावरीच्या तीरावर स्नान करण्याकरितां आले. तेथें **विठ्ठल**पंतही आपल्या चार मुलांसह वर्तमान स्नानाकरितां येऊन अवलोकन करितात तों गोदावरीच्या तीरावर सर्व ब्रह्मवृंद जमा झाले आहेत. त्यांत कोणी स्नान करितात, कोणी भस्म चर्चन करून गायत्री मंत्राचा जप करीत आहेत, कोणी गोपीचंदन लाऊन **शालीग्रामाचें** पूजन करीत आहेत, कोणी गुरुपदिष्ट मंत्राचें अनुष्टान करीत आहेत, ठिकाठिकाणीं ब्राह्मणांचे थवे बसून उच्चस्वरानें वेदाचें पठण करीत आहेत, असा अपूर्व ब्रम्हसमुदाय पाहून **विठ्ठल**पंतास अत्यंत आल्हाद उत्पन्न झाला. त्यानें असा विचार केला कीं आज सर्व ब्राह्मण एकत्र जमा झाले आहेत तस्मात् मुलांच्या मौंजीबंधनाच्या प्रार्थनेविषयीं असा पर्वकाल पुनरपि यावयाचा नाहीं, असें मनांत आणून

विठलपंत आपल्या चार मुलांस बरोबर घेऊन सर्व ब्रम्हवृंदाच्या अग्र-
भागीं येऊन उभे राहिले. सर्वांस साष्टांग नमस्कार करून म्हणाले
कीं महाराज ? **समस्तसंपत् समवाप्तिहेतवः समुत्थितापत्कुलधूम
केतवः ॥ अपारसंसारसमुद्रसेबतः पुनंतुमां ब्राम्हणपाद पांसवः**
॥ १ ॥ अर्थ ॥ सर्व संपात्ति प्राप्त होण्यास हेतु, उत्पन्न झालेल्या
अपत्कुलास धूमकेतु आणि अपार संसार समुद्रापासून उत्तीर्ण होण्यावि-
षयीं सेतूच असे जे तुमचे पदपांसु ( चरणरज ) ते मजप्रत पवित्र
करोत. निवृत्ति ज्ञानदेवानींही ब्राम्हाणांची बहुत स्तुति केली. विठ्ठल
पंतानें असें भाषण केलें कीं मला पावन करून सर्व ब्रम्हवृंदानीं माझ्या
मुलाच्या व्रतबंधाविषयीं आज्ञा द्यावी ही सर्वांस माझी विनंती आहे.
सर्व ब्राम्हण स्वकीय कर्मामध्यें रत असल्याकारणानें कोणी ही त्यास
प्रत्युत्तर दिलें नाहीं. कांहीं वेळानें त्या ब्रह्मवृंदांपैकीं एका ब्राह्मणानें
हेलनात्मक असें भाषण केलें कीं अहो तुम्हीं प्रार्थना करितां परंतु तुम्हीं
कोण ? तुमचें नांव काय ? तुमचें वास्तव्य स्थान कोठें आहे ? हीं
मुलें कोणाचीं आहेत व यांचीं नांवें काय आहेत, हें सर्व समजल्यावांचून
आह्मीं प्रत्युत्तर तरी कसें द्यावें. विठ्ठलपंत म्हणाले कीं महाराज ? मी
आपेगांवचा कुळकर्णी यजुर्वेदी आहे. माझें नांव विठ्ठल व माझ्या बापाचें
नांव गोविंदपंत. मी संन्यासी होऊन गुर्वाज्ञेनें पुनरपि गृहस्थाश्रम केला.
त्या गृहस्थाश्रमीं मला तीन पुत्र आणि एक कन्या झाली. येवढ्याच कारणा-
मुळें सर्व ब्राम्हणांनीं मला बहिष्कृत ठेविलें आहे. असें विठ्ठलपंताचें
वचन ऐकून सर्व ब्राम्हण परस्पर विनोदास्पद बोलूं लागले कीं वाहवा ?
असा कुटुंबवत्सल संन्यासी आम्ही कधींही पाहिला नाहीं. ब्राम्हणांनीं
पुनरपि विचारिलें कीं विठ्ठलपंत तुम्ही आपल्या मुलांची नांवें सांगितली
नाहींत. विठ्ठलपंतानें अंगुलीनिर्देश करून भाषण केलें कीं महाराज ?
हा माझा जेष्ठ पुत्र यास निवृत्ति असें ह्मणतात, त्याच्या पाठचा हा
मध्यम पुत्र ज्ञानदेव असें म्हणतात. अशीं नांवें ऐकून सर्व ब्राम्हण
फारच हसूं लागले आणि म्हणाले कीं, अहो ज्ञानी पुरुषांस मौंजी
बंधन कशास पाहिजे ? मौंजी करून तरी गुरूपासून ज्ञानच संपादन
करावयाचें आहे, तें ज्ञान जर मूर्तिमंत पोटीं उत्पन्न झालें तर त्यास
व्रतबंधाचा संस्कार मुळींच नको. इतक्यामध्यें अग्रभागीं एक

रेडा पाण्याची पखाल पाठीवर धारण केलेला येत आहे व त्याचा मालक ( भिस्ती ) ज्ञान्याचल, ज्ञान्याचल, असा मुखानें उच्चार करीत आहे. असें पाहून एक ब्राह्मण म्हणाला कीं अहो नांवावर काय प्रमाण आहे ? नांव सोनाई वेल्हाळा पायीं वाळा कथलाचा. हा पहा समोर पखाल घेऊन एक ज्ञानी येत आहे. जसे त्या पशूचें नांव ज्ञानी तसें याचें नांव ज्ञानी असें ऐकून ज्ञानेश्वरानें उत्तर दिलें कीं महाराज ? आपण वेदार्थज्ञ आहांत आपणापुढें मी बोलावें असें नाहीं विचार करा "सर्वं खल्विदं ब्रम्ह. नेह नानास्ति किंचन" इत्यादि ब्रम्हव्याप्तिविषयीं श्रृति वाक्यें बहुत प्रमाणें आहेत. ब्रह्मव्याप्ति सर्वत्र आहे. ती माझे ठायीं आहे आणि रेड्याचे ठायीं नाहीं असें नाहीं. तर मी आणि तो हा शब्द मात्र भेद आहे, वस्तुतः विचार केला असतां सर्वांतर्यामी आत्मा एकच आहे. असें भाषण ऐकून तो ब्राम्हण क्रोधयुक्त होऊन म्हणाला कीं असे शाब्दिक वेदांतामध्यें निष्णात झालेले लोक मला बहुत माहित आहेत. अरे ! तो आणि तूं उभयतां एकच जर आहांत तर त्याच्या पाठीवर मारिलें असतां तुला दुःख होईल काय ? ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं आपण क्रोध करूं नका जर त्याचा आणि माझा आत्मा एक आहे तर त्यास मारिलें असतां मला दुःख होणार नाहीं असें कसें होईल ? तर दुःख झालेंच पाहिजे. नंतर त्या ब्राम्हणानें भिस्त्याचे हातानें त्या रेड्याच्या पाठीवरची पखाल काढवून त्या रेड्यास ब्राह्मणसमुदायांत आणिलें; आणि मोठ्या कोपानें रेड्याच्या पाठीवर त्रिवार प्रतोद प्रहार केला. त्या प्रहाराच्या योगानें रेड्यास किंचित् ही दुःख न होतां त्याचे वळ ज्ञानेश्वराच्या पाठीवर उमटले, व ज्ञानेश्वराच्या पाठींतून रक्तही वाहूं लागलें. तें पाहून विठ्ठलपंतास व निवृत्ति, सोपान मुक्ताबाईस फारच दुःख झालें. त्यांनीं करुणायुक्त वाणीनें त्या प्रतोद मारणाऱ्या ब्राम्हणाची अशी प्रार्थना केली कीं महाराज ! आपण प्रतोद प्रहार करूं नका कारण यापासून ज्ञानेश्वराची काय अवस्था झाली ती आपणच अवलोकन करा. सर्व ब्राम्हाण ज्ञानेश्वराच्या पाठीकडे पहातात तो पाठींतून एकसारखा रक्तश्राव होत आहे. हें पाहून सर्वांसमहदाश्चर्य वाटलें. ग्रामस्थ ब्राम्हणास पूर्वोक्त पितरांच्या भोजनाचें वर्तमान रामभटादि मंडळींनीं सांगि-

तलेंच होतें तें वर्तमान सर्वांस या चमत्कारावरून सत्य वाटलें. इतक्यांत त्यापैकीं एका ब्राम्हणानें असें भाषण केलें कीं, सर्व ब्राम्हण मंडळीहो? माझें वचन श्रवण करा. ज्ञानेश्वरकृत चमत्काराविषयीं कोणीही विश्वास ठेवूं नये. कारण हा सर्व गारुडी कृत्याचा नजर बंदी आहे. दोघाच्या आत्म्याचें व ज्ञानी या नामाचें समत्व जर आहे तर ज्ञानी कोणास म्हणावें कीं ज्यास वेदशास्त्राचें अर्थ ज्ञान असेल त्यास सर्व लोक ज्ञानी असे म्हणतात; म्हणून हा रेडा सांगवेदाचें पठण जर करील तर सर्व आम्ही सत्य मानूं. नाहीं तर असें ढोंगी जादूच्या योगानें लोकांस भ्रम करणारे आम्हीं बहुत पाहिले आहेत. हें वचन सर्वत्रास मान्य झालें. नंतर ॥ ततोमहिषमाहूयतन्मूर्ध्निस्वकरांबुजं ॥ निधायज्ञानदेवोसौतमाहवेदविग्रहः ॥ १ ॥ चैतन्यत्वेकमेवप्रातिघटमथचोपाधिभेदाद्विभिन्नं ॥ सर्वज्ञत्वादिकंतुत्वयिमयिचसदास्त्येवहानादुपाधेः ॥ तस्मादागच्छभोभोमहिषपठपठाम्नायराशिंत्विहाद्य ॥ त्युक्तोज्ञानेशवाक्यात्श्रुतिगणमखिलंसांगमुच्चैःपपाठ ॥ १ ॥ अर्थ ॥ नंतर ज्ञानेश्वरानीं त्या रेड्यास अग्रभागीं उभे करून त्याच्या मस्तकावर हस्त ठेऊन भाषण केलं कीं ज्ञान्या ? मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत चराचराचेठायीं चैतन्य एक आहे. तें उपाधि भेदानें भिन्नभिन्न भासतें त्या उपाधीचा नाश झाला असतां चैतन्याचें सर्वज्ञत्वादि गुण तुझेठायीं व माझेठायीं सर्वकाल आहेतच असें जर सत्य आहे तर भो महिष या ब्रह्म समाजामध्यें सांगश्रुतीचें पठण कर. असें ज्ञानेश्वराचें वाक्य ऐकून तो रेडा उच्चस्वरानें अखिलश्रुति गणाचें पठण करितां झाला. प्रथम रेड्याच्या शरीरावर जी रोमरंध्रें होतीं त्या रोमरंध्रापासून हरिः ओं हरिः ओं असा ध्वनी निघाला. निवृत्तिनीं ज्ञानदेवास सांगितलें कीं ज्ञानेश्वरा, श्रुतिही सर्व जगताची माता होय. ती प्रत्येक रोमरंध्रांतून जर निघेल तर अविधी होईल, पहा गंगोदक मोरीच्या द्वारानें आले म्हणजे तें उपयुक्त नव्हें. तर ज्या द्वारानें यावयाचें त्याच द्वारानें आलें पाहिजे, तसें वेद पठण मुखानेंच झालें पाहिजे. हें निवृत्तिचें वाक्य ज्ञानेश्वरानीं मान्य करून रेड्यास भाषण केलें कीं तूं मुखानेंच वेद उच्चार करावा. असें वाक्य ऐकून रेड्यानें स्वमुखानें ऋग्वेदादि

सांगचतुर्वेद पठण करण्यास आरंभ *केला, तो रेडा पांच दिवसपर्यंत अहोरात्र सांगवेदाचें पठण करीत होता. तें अद्भुत कृत्य पाहून सर्व ब्राम्हणास निश्चयें करून असें वाटलें कीं ज्ञानेश्वर हा साधारण पुरुष नव्हे, तर हा कोणी तरी ईश्वरांश आहे. कारण अशी अघटित घटना ईश्वरावांचून कधींही व्हावयाची नाहीं. पहा. काय हें आश्चर्य ज्याच्या योगबलानें पशुनें कां वेद उच्चार करावा ? परंतु सत्पुरुषास कोणचें दुःसाध्य आहे ! ॥ **श्लो० ॥ भिंदंतिशैलान्उदधीन्पिबंति व्यत्य.सयंतिक्षितिमंतरिक्षं ॥ तृणीकृतब्रम्हपुरंदराणांकिंदुष्करंब्रम्हविच.रकानां ॥ १ ॥** अर्थ ॥ सत्पुरुष दंड मात्रानें पर्वतांचा भेद करितात, समुद्राप्रत प्राशन करितात, पृथ्वी आणि आकाशाप्रत एक करितात, व ज्यांनीं ब्रह्मेंद्रादिकांप्रत तृणप्राय केलें आहे, या वरून ब्रह्मविचारकांना काय दुष्कर आहे ? असा सर्व ब्राह्मणांनीं विचार करून ते पश्चात्तापयुक्त झाले. **विलोक्याघटितंकर्मज्ञानदेवस्यचाखिलं ॥ पतित्वादंडवत्भूमौविस्मितास्तेद्विजोत्तमाः ॥ १ ॥ वयंमूर्खाः दुरात्मानश्चाज्ञानमोहसंवृताः ॥ वेदशास्त्राभिमानेनदूषिताः भगवत्प्रियाः ॥ १ ॥** सर्व ब्राह्मण श्रीज्ञानेश्वरास साष्टांग नमस्कार करून भाषण करितात कीं ज्ञानदेवा आह्मी मूर्ख, दुरात्मे, मायाजनित आज्ञानानें मोहित झालों अहोंत; व्यर्थ वेदशास्त्रांचा आभिमान धारण करून त्वत्सदृश ईश्वरांश साधुचा छल केला. आह्मी महापातकी आहोंत. आम्हांस धिःकारधिःकार असो. आह्मी मनुष्यदेहीं येऊन व्यर्थ आयुष्य घालविलें. आतां आमचे सर्व अपराध क्षमा करा. अशी सर्व ब्रह्मणांनीं श्रीज्ञानेश्वराची विनयपूर्वक प्रार्थना केली. विठलपंतानें सर्व द्विजास प्रार्थना केली कीं महाराज आह्मांस शुद्धिपत्र देण्याची कृपा आपण केंव्हा करणार ? सर्वांनीं असें उत्तर दिलें कीं विठलपंत तुह्मी स्वयंभू शुद्धच आहांत. तुह्मांस

*शालिवाहन शके १२१२ यासाली पौष वद्य ३० पासून माघ शुद्ध ५ पर्यंत पैठणांत रेड्यानें चतुर्वेदाचें पठण केलें. त्यावेळेस तत्रस्थ ब्राह्मणांनीं आपलीं वेदपुस्तकें महिषमुखें शुद्ध करून घेतलीं असें त्या लेखावरून कळतें.

आमच्या सारख्या पामरांनीं काय पावन करावयाचें आहे. असें बोलून सर्व ब्राह्मण आपआपल्या घरीं निघून जाते झाले. **विठ्ठलपंत, निवृत्ति, ज्ञान**देवादिकही त्या रेड्यास बरोबर घेऊन **कृ**ष्णाजीपंताचे घरीं आले. **पै**ठणांत अबाल वृद्धास **श्रीज्ञानेश्व**राच्या अद्भुत कृत्याचें स्मरण झालें ह्मणजे सर्वांस मोठा विस्मय होई, सर्वांनीं असा निश्चय केला कीं **विठ्ठ**लपंताचीं मुलें **नि**वृत्ति, **ज्ञा**नदेव, आणि **सो**पान, हीं मनुष्यें नव्हेत तर **ब्रह्मा, वि**ष्णु, आणि **शं**कर, हे तीन देव पातकी लोकांच्या उद्धारार्थ भूमीतलावर अवतीर्ण झाले आहेत. असो, दुसरे दिवशीं गांवांतील श्रीमंत गृहस्थ लोकांनीं असा बेत केला कीं **विठ्ठल**पंताच्या मुलांचे व्रतबंध येथेंच करावे. त्याला जो कांहीं खर्च लागणार तो आपण सर्वत्रांनीं द्यावा. अशा सत्पुरुषांची सेवा आपल्या हातून कधीं होणार आहे ? व वैदिक, शास्त्री, पुराणीक, हरिदास, भिक्षूक या सर्व मंडळींनीं उत्तम प्रकारचें एक शुद्धिपत्र तयार केलें. नंतर त्याच दिवशीं सायंकाळीं ग्रामस्थ, गृहस्थ, व भिक्षूक लोकांनीं **कृ**ष्णाजीपंताच्या घरीं सभा केली. त्या सभेंत **निवृत्ति ज्ञा**नदेवाचा सर्वत्रांनीं मोठा सत्कार केला. प्रथम गृहस्थ मंडळीपैकीं एकानें असें भाषण केलें कीं **निवृत्ति ज्ञानेश्व**रादिक सत्पुरुष ईश्वरांश आहेत. हे आह्मास पवित्र करण्याकारितांच येथें आले आहेत. पहा ! या **श्रीज्ञानेश्व**रानीं **कृ**ष्णाजीपंताच्या पितृतिथीस स्वर्गीचे पितर भोजनास आणिलें. आणि पांच दिवस पर्यंत ज्यांच्या कृपा कटाक्षें करून रेड्यानें सांगवेदाचें पठण केलें. हें अघटित घटनेचें कृत्य अमानुष होय. असो, आमच्या मनांत असा हेतु आहे कीं, याचें मौंजीबंधन सर्व भिक्षूक मंडळींनीं मदत करून येथेंच करावें. कारण अशा सत्पुरुषांची सेवा आमच्या हातून कधीं घडणार आहे ? असें बोलून तो स्तब्ध राहिला. हें भाषण सर्व भिक्षुक मंडळींनीं मान्य केलें. **ज्ञानेश्व**रानीं त्या सर्वत्रास असें उत्तर दिलें कीं मौंजीबंधन करणें आम्हांस युक्त नव्हे. व मागें कधीं संन्याशाच्या मुलाचा व्रतबंध संस्कार झाला असें कोणीही ऐकिलें व पाहिलें नाहीं. कारण असें करणें वेद बाह्य होय. आतां आह्मी आपलें मौंजीबंधन केलें तर पुढें आमचे उदाहरण घेऊन दुसरे लोक ही असेंच करण्या-

स प्रवृत्त होतील. त्या योगानें निंद्यकर्माचरणाचा आह्मास दोष मात्र लागेल; म्हणून आह्मास व्रतबंध संस्कार मुळींच नको. ही गोष्ट सर्वांनीं पसंत केली. नंतर वैदिक, शास्त्री, पुराणीक यांनीं तयार केलेलें जें शुद्धिपत्र तें सर्वांनीं मोठ्या आदरानें श्रीज्ञानेश्वराच्या स्वाधीन केलें. तें " शुद्धिपत्र " येणेंप्रमाणें:—

## ॥ शुद्धिपत्र ॥

स्वस्तिश्रीमत्सकलभूमंडलमंडनीभूताःअखंडप्रचंडवैतंडिकवेतंडगंडस्थलखंडनैकहरयःगिरयोखिलतत्वप्रकाशकसूक्तिरत्नानांतरयोशेषशास्त्रजलधेःनानानीवृंदलंकरणमणयोनिखिलाविद्वांसःशृणुध्वमेतांप्रणतिपरंपरोपेतांप्रतिष्टानमधितिष्ठतांसर्वभूसुरपर्वणामस्माकमभ्यर्थनांयदद्भुततममुद्भुतामिह प्रत्यक्षमपक्षपातमनुभूततदेवदेववेदसाक्षिकंस्वाक्षिकलितंपुरतःशुभवतांभवतांप्रकाशयामः ॥

॥ शार्दूलविक्रीडितवृत्त ॥

आपेग्रामनिवासियाजुषवरोगोविंदपंताभिधो ।
विप्रःकश्चनसत्पुरःश्चरणतःश्रीवेदमातुःसुतं ॥
लेभेविठ्ठलपंतनामकमसौजातोपनीतिर्गुरोः ।
संप्राप्तोनिगमागमान्समगमत्सत्तीर्थसार्थेछया ॥१

॥ मंदाक्रांता ॥

आलंदीतिप्रथितनिगमेभव्यादिव्यप्रसंगात् ॥
सिद्धोपंताद्विजनितनुजांरुक्मिणींप्राप्यपत्नीं ॥
षड्भिर्वर्षैस्तनयमनयानैवलब्ध्वाप्रसुप्ता ।
मेनांहित्वानिशिनिशितयाप्रापकाशींविरक्त्या ॥२॥

॥ शालिनी ॥

रामानंदाल्लब्धसंन्यासदीक्षं ।
तत्रश्रुत्वाहंतकांतंनितांतं ॥
शांतस्वांतासेवमानाविमाना ।
स्वर्णाश्वत्थंसाथनाथस्यदैवात् ॥३॥
तत्रैवाप्यंदैशिकंसंप्रणम्यै ।
तस्मात्पुत्राशीर्वचःप्राप्यखिन्ना ॥
श्रुत्वावृत्तंदत्तचित्तेनतेन ।
नीताऽभीताप्रत्तधैर्यापकाशी ॥४॥

॥ वंशस्थ ॥

सविद्रुतंतत्रजगौसगौरवं ।
विहायतांनाप्तसुतांपतिव्रतां ॥
तयापिनोक्तोस्यृणवान्भवांच्छठा ।
च्छलाद्विरक्ताश्रममाश्रितःकुतः ॥५॥
मयाज्ञयातोघृतकुंभसंभव ।
स्वजातकर्मादिविधानसंस्कृतः ॥
इमांपुनःप्रोद्वहतत्रपुत्रकां ।
श्वत्रीन्हरेरंशभवान्भवानियात् ॥६॥

॥ गीति ॥

इत्थमसह्यमपिमुहुःप्रसह्यगुरुणारुगाक्षमुक्तःसः ॥
विधिनापुनरपिविधिनागृहीतयाभूत्गृहीतयानवया ॥ ७ ॥
प्रारब्धलेखनविधौविपर्ययादेववर्णधर्मस्य ॥
यतिरपिपुनःपतिरभूदित्युक्त्वासौवहिष्कृतोविप्रैः ॥८॥
वृत्तांतस्याबोधात्श्रुत्वाप्यश्रद्धयापुनरशोधात् ।
शिष्टाचारविरोधात्समुज्झितोमत्सरापरैःक्रोधात् ॥ ९ ॥
अभवन्निवृत्तिमुख्यंज्ञानेश्वरमध्यमंसुतात्रितयं ॥
सोपानान्तंतुर्यांतुर्यावस्थारतासुतामुक्ता ॥१०॥

जातोपनीतिसमयास्तनयाइतिविप्रमंडलींसमया ॥
प्रोचेवाचासमयाक्षम्योदोषोभ्रुवंकृतःसमया ११

॥ उपजाति ॥

सविठ्ठलोविप्रवरैरगादि ।
कापिप्रतिष्ठानपुरेऽत्रतस्मात् ॥
शुद्धिंप्रतिष्ठानपुरेलभस्व ।
निवेद्यसर्वंस्वकृतंविगर्वं ॥१२॥

पुत्रैःसमंसोथसमंस्वचित्तं ।
कृत्वाप्रतिष्ठानमिदंप्रयातः ॥
स्वमातुलस्यालयमध्यवात्सीत् ॥
सोप्युज्झितोस्माभिरमुष्यसंगात् ॥ १३॥

कृष्णाभिधोविठ्ठलमातुलोसौ ।
श्राद्धेनलेभेद्विजमुक्तदोषात् ॥
लोकांतरात्तस्यपितॄन्ससाक्षात् ।
आनीतवान्मध्यमवैठ्ठलिःसः ॥ १४ ॥

श्राद्धेयदाभून्नहिविप्रयोग ।
श्चरात्पितॄणामपिविप्रयोगः ॥
ज्ञानेश्वरेणेहनिवारितोऽत्र ।
दृष्टंचरित्रंतदिदंविचित्रं ॥ १५ ॥

ज्ञानेश्वरोविठ्ठलनंदनानां ।
समध्यमोप्युत्तमएवचाद्यः ॥
स्थितिप्रियोनित्यविशुद्धसत्वः ।
यथामराणांमुरजित्त्रयाणां ॥१६ ॥

कृत्वानमोविप्रकुलायगोदा ।
तीरेस्थितस्तातकुलायहेतोः ॥
तीराधिवासैःकृतभूरिहासैर ।
द्विजैरयासैःकथितोविलासैः ॥१७॥

ज्ञानेश्वरस्त्वंयदिवासवोसि ।
नवास्तवोऽयंतवनाममात्रात् ॥
प्रताडितेऽस्मिन्महिषेप्रलोदै ।
स्तवापिगात्रेभवितातदंकः ॥१८॥

अथेत्यवादीदथतैःप्रताडिते ।
तस्मिंल्लुलायेऽरुणमस्यपृष्ठकं ॥
व्यलोकिरेखात्रिनयंतिहाखिलैः ।
किलास्यकालत्रयबोधसूचकं ॥१९॥

लु ायेतंस ाकुलायसित्थये ।
विधेह्यशेषःश्रुतिछंदपाठकं ।
इतीरितस्तस्यनिधायमुर्धनि ।
करंसवेदाकरमेनमातनोत् ॥२०॥

॥ शिखरिणी ॥

समक्षंसर्वेषांध्रुवमभवदेषांद्विजनुषा ।
मशेषाणांगोदातटभुवितुमोदायविदुषां ॥
चारित्रंचित्रंतन्माहिषइहसंतार्जितबुधोऽ ।
खिलानुच्चैर्वेदानुचितपदभेदान्समपठत् ॥२१॥

॥ वसंततिलका ॥

एवंविधानिविविधानिविलोकितानि ।
ज्ञानेश्वरस्यचरितानिमहाद्भुतानि ।
विप्रास्ततोत्रमिलिताःसकलाविशुद्धेः ।
पत्रंपवित्रहृदयेनसमर्पयामः ॥ २२ ॥

॥ अनुष्टपं ॥

ज्ञानेशोभगवान्विष्णुःनिवृत्तिर्भगवान्हरः ॥
सोपानोभगवान्ब्रम्हामुक्ताख्याब्रम्हचित्कला ॥२३॥

॥ वसंततिलका ॥

ज्ञानेश्वरस्मरणतःस्मरणेनमुक्तान् ।
मुक्ताग्रजोयमखिलान्खलुकर्तुमिष्टे ॥
निंद्योनबोधरहितैःस्वहितैकसिध्यै ।
वंद्योध्रुवंसुकृतिभिःकृतिभिःसमस्तैः ॥ २४ ॥ *

प्रतिष्ठानक्षेत्रस्थ रामशास्त्री

आदिकरून मंडळी.

---

* हें शुद्धिपत्र पैठणांत श्री एकनाथाच्या वंशस्थाजवळ जें आहें, त्यावरून लिहिलें आहे. तें फार जुने आहें असें ऐकतों. ग्रंथविस्तार भीतीनें त्यांतील सर्व सह्यांचा उल्लेख येथें दिला नाहीं.

असें सर्व ब्राह्मणांनीं दिलेलें शुद्धिपत्र ज्ञानेश्वरानीं ग्रहण केल्यानंतर सर्व सभा विसर्जन झाली. तीन दिवस झाल्यावर विठ्ठलपंत, निवृत्ति, ज्ञानदेवादिकांनीं आळंदीस निघण्याची तयारी केली तें पाहून कृष्णाजीपंतास फार दुःख झालें. कारण एक आप्तसंबंध आणि दुसरा वियोग. ग्रामस्थ लोकांनीं वर्गणी करून श्रीज्ञानेश्वराचें सन्मानार्थ शेला पागोटें, शालजोडी इत्यादिक आणिलें, परंतु ज्ञानेश्वरानीं त्याचें ग्रहण मुळींच केलें नाहीं. युक्तच आहे कीं, वैराग्यसंपन्न पुरुषास नश्वर पदार्थ प्रिय नसतात. विठ्ठलपंत, रखुमाबाई, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, आणि मुक्ताबाई हे सर्व आळंदीस येण्याकरितां पैठणांतून निघाले, ग्रामस्थ लोकही या सर्वांची बोळवण करण्याकरितां आले. इकडे काशीग्रामस्थ रामानंदस्वामीची यात्रा विठ्ठलपंताच्या व रखुमाबाईच्या संबंधानें संपूर्ण झाली नव्हती, म्हणून ते पुनरपि यात्रा करण्याकरितां निघाले. रामानंदस्वामी तीर्थभ्रमण करीत असतां पंढरपुरांत येऊन पोहोंचले. तेथें आल्यानंतर स्वामीनीं श्रीविठ्ठलाच्या चरणारविंदी प्रणिपात केला. श्रीविठ्ठलाचे कंठीं एक तुलसी काष्ठमाला होती ती श्रीविठ्ठलानीं काढून रामानंदस्वामीच्या स्वाधीन केली आणि सांगितलें कीं रामानंद? तुझा शिष्य जो विठ्ठलपंत त्यास तुझ्या आशीर्वादे करून तीन पुत्र झाले आहेत. त्यांपैकीं मध्यम पुत्र जो ज्ञानेश्वर तो माझा अंश आहे, तर त्याच्या कंठीं मी दिलेली ही तुलसीकाष्टमाळा तू अर्पण कर आणि त्यास मद्भक्तीचा प्रसार करण्याविषयीं उपदेश कर. स्वामीनीं श्रीविठ्ठलास विचारलें कीं, महाराज! मलाही त्यांचे भेटी विषयीं फार उत्कंठा झाली आहे. परंतु ते कोठें आहेत व त्यांची गांठ कशी पडेल हें कांहीं कळत नाहीं. श्रीविठ्ठलानीं उत्तर दिलें कीं, आतां ते प्रतिष्ठानक्षेत्रीं आहेत. तूं तेथें गेला असतां तुझी व त्यांची गांठ पडेल. अशी श्रीविठ्ठलांची आज्ञा स्वामीनीं मान्य करून श्रीविठ्ठलांची प्रसादरूप तुलसीकाष्टमाला घेऊन दुसरे दिवशीं ते पंढरपुरांतून निघाले. मार्ग क्रमण करीत सातवे दिवशीं स्वामी पैठण क्षेत्रीं गंगातीरावर प्राप्त झाले, त्याच दिवशीं विठ्ठलपंत कुटुंबासह आळंदीस येण्याकरितां निघाले होते. विठ्ठलपंतानें बोळवण करण्याकरितां आलेल्या सर्व लोकांस परत लाऊन आपण निवृत्ति ज्ञानदे-

वादिकांस बरोबर घेऊन गंगेच्या पैलतीरीं आले. इतक्यांत रामानंद स्वामीची व विठ्ठलपंताची नजरानजर एक झाली. विठ्ठलपंत आपल्या मनांत असा विचार करितात कीं, अहो! हे स्वामी श्रीगुरु रामानंद स्वामीसारखेच दिसतात. जवळ आल्यानंतर विठ्ठलपंतानें पूर्णपणें रामानंदस्वामीस ओळखून मोठ्या त्वरेनें त्यानीं स्वामीस प्रणिपात केला. स्वामीनीं विठ्ठलपंतास पाहून त्यांना फार आनंद झाला. विठ्ठलपंतानें निवृत्ति ज्ञानदेवास असें सांगितलें कीं, ज्ञानेश्वरा! निवृत्ति! तुम्हीं यांना ओळखले काय? हे माझे सद्गुरु आहेत, याना रामानंदस्वामी असें म्हणतात. यांच्या आशीर्वादरूप वृक्षाचीं तुम्हीं फळें आहांत. असें विठ्ठलपंताचें भाषण ऐकल्यावर त्या सर्वांनीं रामानंदस्वामीस साष्टांग नमस्कार केला. त्या सर्वांस पाहून श्रीविठ्ठलानें दिलेली तुलसीकाष्ट माला कोणाच्या गळ्यांत घालावी असा त्यांना संशय उत्पन्न झाला, कारण ज्ञानेश्वराची व यांची पूर्वी भेट नसल्यानें ते ज्ञानेश्वरास ओळखीत नसत; स्वामींनीं विठ्ठलपंतास विचारलें कीं विठ्ठलपंता, हीं तुझींच कां मुलें आहेत? यांचीं नांवें काय आहेत ती मला सांग. विठ्ठलपंतानें अंगुलिनिर्देश करून सांगितलें कीं, हा माझा जेष्ठ पुत्र यास निवृत्ति ह्मणतात. हा मध्यम पुत्र यास ज्ञानेश्वर असें म्हणतात. ज्ञानेश्वराचें नांव ऐकल्याबरोबर स्वामीनीं त्यांच्या कंठीं श्रीविठ्ठलदत्त प्रसाद माला अर्पण केली, आणि त्यास असें सांगितलें कीं, तूं पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाच्या भक्तीचा प्रसार कर, अशी तुला पंढरीनाथाची आज्ञा आहे. नंतर स्वामीनीं ज्ञानेश्वरास मृत जीवास जिवंत करणारा असा जो संजिवनी मंत्र त्याचा उपदेश केला. स्वामीनीं विठ्ठलपंतास असें सांगितलें कीं विठ्ठलपंत तुला मी ज्या कार्यासाठीं गृहस्थाश्रम करण्यास आज्ञा केली होती तें कार्य ईश्वर सत्तेनें सिद्धीस गेलें आतां व्यर्थ प्रपंचांत पडून आयुष्य मात्र खर्च होणार आहे. तर बद्रिकाश्रमीं जाऊन तुम्हीं उभयतांनीं जगदीश्वराची उपासना करावी, ही माझी आज्ञा आहे. असें सद्गुरूचें वचन ऐकून विठ्ठलपंतानें भाषण केलें कीं, श्रीगुरु, आपली आज्ञा मला वेद आज्ञेपेक्षांही ज्यास्त मान्य आहे. स्वामींनीं सांगितलें कीं, तूं आतांच माझ्या समक्ष या पुत्रादिकांस सोडून गमन कर. विठ्ठलपंतानें ती गोष्ट मान्य करून

निवृत्ति ज्ञानदेवादिकांस बद्रिकाश्रमीं जाण्याचे विचारलें. विठ्ठलपंत हे मोठे विरक्त जरी होते तरी त्यांना पुत्रमोह झाल्यावांचून राहिला नाहीं. विठ्ठलपंतानें सांगितलें कीं निवृत्ति, ज्ञानदेवा? या सोपान व मुक्ताबाईस फार जपत जावें. रखुमाबाई हंबरडा फोडून ह्मणाली कीं, ज्ञानेश्वरा! आमच्या मागें या मुक्तीस सर्वस्वी तूंच आहेस इला तुझ्यावांचून कोणीही नाहीं. असें बोलून तिनें मुक्ताबाईचा हात ज्ञानेश्वरांच्या हातांत घालून फार फार निरविलें. असो, विठ्ठलपंत व रखुमाबाई निवृत्ति ज्ञानदेवादिकांचा त्याग करून.ते बद्रिकाश्रमीं निघून जाते झाले. रामानंदस्वामीही तीर्थाटनास गेले, व निवृत्ति ज्ञानेश्वरादिक मार्गक्रमण करूं लागले.

## ॥ चतुर्थोल्लासः ॥

श्री वि ठ्ठ ल

## ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

॥ निर्जीवकुड्यं भुवियःप्रचालयन् ॥ योगींद्रगर्वाहिनिवारयद्विभुः ॥
ब्रम्हादिदेव द्विजसिद्धसेवितः । श्रीज्ञानदेवं तमिमंनतोस्म्यहं ॥ १

जे भगवद्भक्त भक्तिज्ञान आणि वैराग्य यांचे मूर्तिमंत पुतळेच बनले असतात, ज्यास आणिमा, महिमा, गरिमा इत्यादिक योग सिद्धी सहाय झाल्या असतात, त्यांचीं कृत्यें इतर प्राकृत जनांच्या कृत्यांहून अगदीं निराळीं अलौकीक आणि असंभाव्य अशीं असतात. पहा ! श्रीज्ञानेश्वरानीं जीं जीं अघटित कृत्यें केलीं तीं तीं अवर्णनीय व मागें कधींहीं कोणी केली नाहींत. ज्ञानेश्वरानीं रेड्याच्या मुखानें वेद बोलविले, येवढेंच एक अघटित कृत्य केलें असें नाहीं; तर अशीं शतशः कृत्यें केलीं आहेत ती आम्ही या पुढील दोन उल्लासांत लिहिणार आहों. वाचक बहुत मतांचे व दुसऱ्या धर्माचे अनुयायी असतील तर त्यांना या पुढील गोष्टी अर्थात खोट्या वाटणार आहेत; परंतु मुसलमान, बौद्ध, व ख्रिस्ती इत्यादि सर्व धर्मामध्यें जे जे साधू झाले आहेत, त्या त्या साधूंनीं असेच अघटित चमत्कार लोकांस दाखवून जनाच्या मनावर आपल्या धर्माचे ग्रह उमटविलें आहेत. जर ज्ञानेश्वराच्या चमत्कारिक गोष्टी खोट्या म्हणाव्या तर येशूनें, बुधानें, आणि मुसलमानाच्या धर्मातील पैगंबरानें ज्या ज्या अद्भुत गोष्टी केल्या आहेत त्या त्या सर्व खोट्या कां म्हणूं नयेत ? दुसरें असें आहें कीं, ज्ञानेश्वराच्या गोष्टींतील प्रमेय पाहिलें असतां तें सर्व खरें आहेत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं, आणि सर्व कथा प्रमेय दृष्टीनेंच पाहिल्या पाहिजेत. प्रमेयत्वानें न पहातील तर सर्व कथा अनवस्था प्रसंगास कारण होतील म्हणून सर्वांनीं प्राचीन व अधुनीक इतिहास प्रमेयत्वानें अवलोकन करावें,

एवढें वाचकांस सांगितलें असतां पुरे.* असो, **पैठणांत** रेड्याच्या मुखानें वेद बोलविल्यानंतर **निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान,** आणि **मुक्ता**बाई या सर्वांनीं त्या रेड्यास बरोबर घेऊन निघाले ते मार्गक्रमण करीत कांहीं दिवसांनीं **नेवासे**गांवीं येऊन पोहचले. संध्याकाळ झाल्यामुळें या गांवांत एक रात्र राहून उद्ईक चालते व्हावे अशा हेतूनें ते आपणास उतरण्यास जागा पाहूं लागले. परंतु त्यांना कोणीही उतरण्यास जागा देईना. ग्रामस्थांची अशी रीतीच असते. तें कांहीं वेळ फिरल्यावर निरूपाय होऊन मनांत विचार करूं लागलें कीं आतां काय करावें, व कोठें रहावें. इतक्यांत **ज्ञानेश्वरा**नीं गांवाबाहेर आल्यानंतर एक मुसलमानाची मशीद अवलोकन केली आणि त्यास असें वाटलें कीं येथें कोणी नाहीं व आपणास ऊठ किंवा बैस असें म्हणण्यास ही कोणी येणार नाहीं तर येथेंच उतरणें हें फार बरें दिसतें. असा विचार करून **निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान** व **मुक्ताबाई** हे सर्व त्या मशीदींत उतरले. त्या वेळेस त्या मशीदींत वासकरणारा जो फकीर तो गांवांत तेल मागण्याकरितां गेला होता, तोही त्या स्थळीं कांहीं वेळानें तेल मागून आला. त्यानें या चौघांस अवलोकन केलें, आणि असा विचार केला कीं या चार मनुष्यास आपण गांवांत कधींही पाहिले नाहीं; व हे अगदींच अनोळखी दिसतात इतकेच नाहीं परंतु हे माझ्या जातीचे ही दिसत नाहींत. तर हे कोण आहेत व यांना कोठें जावयाचें आहे, हे माझ्या मशीदींत कोणतेही प्रकारची विचारपूस न करितां येऊन उतरले आहेत याचें कारण काय ? असें मनांत आणून त्यास प्रश्न केला कीं अहो ? तुम्हीं कोण आहांत, येथें कोणास विचारून उतरला आहांत? **ज्ञानेश्वर** उत्तर देतात कीं आम्ही ब्राम्हाण वाटसरू आहोंत. गांवांत जागा न मिळल्यामुळें येथें उत्तरलों आहों. उद्ईक प्रातःकाळीं निघून जाऊ. फकीर म्हणतो कीं ही मशीद माझी आहे तरी मी येथें कोणासही राहूं देणार नाहीं. **ज्ञानेश्वर** म्हणाले कीं फकीर

---

*कथा महीपतीकृत संतलीलामृतामध्यें, व नरहरी सोनार कृत भक्तिकथासारामध्यें आहे; आणि याविषयीं सच्चिदानंद बाबाचें कांहीं अभंग आहेत

बाबा ! ही मशीद तुमचीच आहे खरी नाहीं कोण म्हणतो ? पण येथें आम्हास फार दिवस रहावयाचे आहे किंवा ती आम्हास बळकावयाची आहे असें थोडेंच आहे. आम्ही उदईक खचितच निघून जातों. फकीर मोठ्या क्रोधानें म्हणतो कीं तुम्हीं उद्या जा किंवा परवा जा, परंतु ही मशीद माझी असतां तुम्हीं मला अधीं कां विचारिलें नाहीं ! फकीराच्या मुखांतून ही मशीद माझी आहे, ही मशीद माझी आहे असें एक दोन वेळा ऐकिल्यावरून ज्ञानेश्वरास फार विस्मय झाला. त्यानीं असा विचार केला कीं हा फकीर होऊन यास मी आणि माझें असा अभिमान कशास पाहिजे; तर याचा हा द्वैताभिमान ज्या योगानें निरास होईल असा कांहीं तरी चत्मकार दाखविला पाहिजे. असें मनांत आणून त्यास प्रश्न करितात कीं फकीरबाबा ! ही मशीद माझी आहे असें तुम्हीं वारंवार शद्ब काढितां तरी ही तुमचीच आहे असें सिद्ध करण्यास तुमचे जवळ पुरावा काय आहे ? फकीर म्हणतो कीं ही मशीद वडीलाच्या व त्यांच्या पश्चात् माझ्या मालकीची आहे याविषयीं माझ्या जवळ कागदपत्रें आहेत. व त्यावर या गांवच्या पाटील कुळकरण्याच्या सह्या ही आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात कीं तीं कागदपत्रें व त्यावर सह्या बनावट नसतील कशावरून ? फकीर म्हणतो कीं बरें, हातर पुरावा आपण मानीत नाहीं, परंतु ही मशीद नाहीं असें ठरविण्यास आपणाजवळ तरी काय पुरावा आहे ? बरतर मग आपण ठरविणार तरी कोणाची ? असा उभयतांचा वाद पहाण्यास ग्रामस्थ लोक बहुत जमा झाले. ज्ञानेश्वर म्हणतात कीं आम्हाजवळ पुरावा इतकाच कीं तुम्ही मशीदीस तूं कोणाची असा प्रश्न करावा. तिनें मी तुमची असें उत्तर दिल्यास तुमची आहेच. नाहीं तर अर्थांत ज्यास उत्तर मिळेल त्याची. हें ज्ञानेश्वराचें वाक्य ऐकतांच फकीरास फार आश्चर्य वाटलें, आणि म्हणाला कीं आपण जें बोलतां ते खरें असो किंवा नसो परंतु मला तर त्यात कांहींच अर्थ दिसत नाहीं. कारण माझ्या बापाच्यानें ही मशीद बोलावयाची नाहीं व माझ्या अंगीं तसें करण्यास सामर्थ्यही नाहीं, आपणांतच काय पराक्रम असेल तो दाखवावा. हें फकीराचें भाषण ऐकिल्यावर फार चांगलें आहे असें म्हणून ज्ञानेश्वरानीं श्रीविठ्ठलाचे चिंतन करून योग

सिद्धींचें स्मरण केलें, आणि सर्व लोकांस विनंती केली कीं हा ज्ञानेश्वर या मशीदीस प्रश्न करीत आहे, ही जें उत्तर देईल त्यावरून या फकीराची आहे किंवा नाहीं, नसल्यास कोणाची आहे हें स्पष्ट कळेल. तरी सर्वांनीं दोन घटिकापर्यंत स्तब्ध बसून या प्रश्नोतराकडे लक्ष द्यावें. ज्ञानेश्वर मशीदीस प्रश्न करितात कीं "मैशद माय, सच्चाबोलो, तुम हिंदूकी क्या मुसलमीन कीं," असें ज्ञानेश्वरानी विचारल्या बरोबर इतक्यांत काय चमत्कार सांगावा, विजे सारिखा कडकडकड अवाज होऊन मशीदींतून दोन शद्ब निघाले. ते हे कीं "हाम हिंदुकी मुसलमीनको नहीं" हे शद्ब निवृत्ति ज्ञानदेवांनीं व फकीरानेंच ऐकिलें असें नाहीं तर त्या ठिकाणीं जितके लहानापासून मोठ्यापावेतों आणि ब्राह्मणापासून अंत्यजापावेतों जमले होते तितक्या सर्वांनींही ऐकिलें. त्या योगानें सर्वांस मोठा अचंबा वाटला. इतकेंच नाहीं परंतु ज्ञानेश्वर हे कोणी महा सिद्ध आहेत असें वाटून सर्वांनीं त्यांना साष्टांग प्रणिपात केला. या ज्ञानेश्वरासारख्या साधुसी वितंड वाद घेऊन त्याचा व्यर्थ छल केला म्हणून फकीरास फार वाईट वाटून त्यास पश्चात्ताप झाला, आणि तोही ज्ञानेश्वराच्या पायीं लागला. ज्ञानेश्वरानीं दगडाच्या मशीदींतून शब्द काढिले ही असंभाव्य गोष्ट आहे. रेड्याच्या मुखांतून वेद बोलविले तरी तेथें जीवित्व होतें; परंतु निर्जीव दगडाचे ठिकाणीं अशीहि गोष्ट कधींही संभवणार नाहीं. परंतु यांत कांहींच अर्थ नाहीं कारण हा एक योगमार्गाचा उपासनेचा किंवा सर्वात्मतेचा परिपाकच होय. ज्यास योग मार्गाचा पूर्ण अभ्यास असतो व त्या योगानें अणिमादिसिद्धी ज्याच्या स्वाधिन असतात त्यास कोणचेंही करण्यास अवघड नाहीं. अशा गोष्टी त्याच्या इच्छामात्रें करूनच घडून येतात. याविषयीं उदाहरण पूर्वी, शुकाचार्य पळत असतां व्यासानें मोठ्या विरहानें शुका! म्हणून हांका मारिली. शुकाचार्यांच्या सर्वत्मकत्वामुळें व्यासास वृक्षपाषाणादिकांनींही प्रत्युत्तर दिलें अशी भागवतीं कथा आहे. यावरून ज्ञानेश्वरानीं मशीद बोलविली हें असंभवनीय नाहीं, कारण ते प्रत्यक्ष ईश्वरांशच होते. असो, गांवामध्यें ज्ञानेश्वराची सत्कीर्ति फारच झाली. ग्रामस्थ लोकांनीं मोठ्या आग्रहानें ज्ञानेश्वराच्या भोजनादिकाची व्यवस्था करून

कांहीं दिवस त्यांना राहून घेतलें. एके दिवशीं अशी गोष्ट झाली कीं त्या गांवांत सच्चिदानंद बाबा या नांवाचा कोणी देशस्थ ब्राह्मण रहात असे, त्यास देवाज्ञा झाली. त्याची बायको सुशील व साध्वी अशी होती. तिनें असा मनांत विचार केला कीं पतीवाचून स्त्रियाचें जिणें व्यर्थ होय या करितां आपण पतीसह गमन करणें हें बरें. नंतर सर्व बंधुवर्गासहवर्तमान इष्टमित्र जमा झाल्यावर तिनें अभ्यंगस्नान करून कपाळी कुंकुमाचा मळवट भरून ती महा साध्वी पतीच्या शवा बरोबर सती जाण्यास निघाली. शव नेण्याची वाट त्या मशीदी वरूनच होती. व सच्चिदानंद बाबाचें शव त्या मशीदी सान्निध आल्यानंतर या मशीदींत कोणी महा सिद्ध साधु आले आहेत असें तिनें पूर्वीं ऐकिलें होतें. अंतकालीं साधूचें दर्शन झालें असतां मोठा भाग्योदयच असें समजलें पाहिजे असें मनांत आणोन त्या साध्वीनें पतीचें प्रेत क्षणभर उभे करावयास सांगितलें; आणि आपण मशीदींत जे महा विख्यात साधू निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान आणि मुक्ताबाई त्यांच्या दर्शनास गेली. बाईनें त्या सर्वांस नमस्कार केल्यावर ज्ञानेश्वरानीं बाईच्या कपाळी कुंकुमाचा मळवट पाहून बाईस “ सौभाग्यवती पुत्रवतीभव ” असा आशीर्वाद दिला. आशीर्वाद ऐकून बाईस फार दुःख झालें, आणि म्हणाली कीं महाराज ! आपण मला हा आशीर्वाद काय देतां; कारण यासमयीं माझ्या पतीचें प्रेत बाहेर उभे केलें आहे, आणि मी सहगमन करण्यास निघालें आहे. हें बाईचें भाषण ऐकून तिचें पातिव्रत्य व निश्चय पाहून ज्ञानेश्वरास फार आश्चर्य वाटलें; आणि ते आपले आशीर्वचन सत्य करण्यासाठीं प्रेत कोठें आहे ? असें विचारून प्रेत पाहण्यास बाहेर आले. ज्ञानेश्वरानीं बाबांचें नांव विचारिलें, आणि समागमे असणाऱ्या मंडळीच्या मुखानें सच्चिदानंद बाबा असें नांव समजल्यावर ज्ञानेश्वरानीं विस्मय झाल्यासारिखा दाखऊन मंद हास्य करून भाषण केलें कीं सत्, चित्, आणि आनंद, यास कधीं कोठें कोणी मृत्यु ऐकिला काय ? सच्चिदानंद हे सर्वोपाधी बाह्य आहे. याचे ठायीं मृत्यु हीं अक्षरें तरी कशी संभवतील ? असें बोलून बाबांचें शव खालीं उतारविलें, मंडळीकडून तें शव मोकळें केलें. काय हो चमत्कार ! ज्ञानेश्वरानीं बाबांच्या आंगावरून हात फिरऊन सच्चिदा-

नंद बाबा उठा, असें म्हणताच जसा निद्रिस्त पुरुष जागा होऊन उठून बसतो, त्याप्रमाणें ते सच्चिदानंदबाबा एकदम उठून बसले. पती उठले हें पाहून बाईनें ज्ञानेश्वरास साष्टांग प्रणिपात केला. त्याचप्रमाणें सच्चिदानंद बाबानें व सर्व मंडळींनीं दंडवत नमस्कार घातला. त्या दिवसापासून सच्चिदानंद बाबा नेहमी ज्ञानेश्वराच्या सेवेविषयीं मोठे तत्पर असत. पुढें ज्ञानेश्वरांनीं त्या मशीदींत एक शिला आहे त्यावर श्रीमद्भगवद्गीतेची टीका ह्मणजे ज्ञानेश्वरी ग्रंथ लिहिण्यास आरंभ केला. कांहीं दिवसांनीं तो ग्रंथ समाप्त करून सच्चिदानंद बाबास असें सांगितलें कीं बाबा! या शिलेवर लिहिलेल्या ग्रंथाची एक प्रत तुह्मी आपणाजवळ ठेऊन दुसरी प्रत उत्तम प्रकारें लिहून आम्हाकडे आळंदी येथें पाठऊन देणें, असें सांगून निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान आणि मुक्ताबाई हे तेथून निघाले. त्यांच्या वियोगानें ग्रामस्थ लोकास बहुत दुःख झालें, परंतु उपाय नाहीं. असो, ते निवृति ज्ञानेश्वर प्रभृति मार्ग क्रमण करीत असतां पुलतांबे येथें कांहीं दिवसांनीं येऊन पोहचले. तेथें गोदावरीच्या तीरीं चांगदेव* या नांवाचा कोणी महा सिद्ध योगी समाधी लाऊन बसला होता, व त्याच्या सभोंवतीं कांहीं मनुष्यांचीं प्रेतें पडलीं होतीं. त्या प्रेतांच्या संरक्षणार्थ प्रेतांचीं आप्तमंडळी बसलीं आहेत. याचें कारण असें कीं **चांगदेव** हा पूर्वी इंद्र होता. तो ब्रह्मप्राप्तीकरितां मृत्युलोकीं एक ब्राह्मणाच्या कुलांत अवतीर्ण झाला. हा रूपानें फार चांगला असे, ह्मणून आईबापानीं त्याचें नांव **चांग्या** असें ठेविलें. मौंजीबंधन झाल्यानंतर **चांगदेवानें** वेदशास्त्राचें अध्ययन करून तापीनदीच्या तीरीं बहुत तप केलें. मंत्राचें अनुष्टान करून कांहीं दैवतांचीं प्रसन्नता करून घेतली. अष्टांगयोगांमध्येंही ते मोठे प्रवीण झालें परंतु सद्गुरूचा उपदेश नसल्या कारणानें ते फार दुःख करीत असत. मनुष्य देहास

---

*ही कथा महीपतीकृत संतलीलामृतात, भक्तिकथामृतात, व नामदेव कृत अभंगांत आहे; आणि याविषयीं चांगदेवाचे बहुत अभंग आहेत. कोठें कोठें देहूकर तुकारामाच्या अभंगांत व एकनाथकृत अभंगांत या कथेचा उलेख आढळतो.

शतमान आयुष्य असल्यामुळें ज्या ज्या वेळेस त्याचा मृत्यु समय प्राप्त होई त्या त्या वेळेस **चांगदेवानें** एक वर्षपर्यंत समाधी लाऊन बसावें; आणि त्या योगानें कालवंचना करावी. असें करून ते चौदाशें वर्षें पर्यंत वांचले. त्यास चौदाशें शिष्य होते. त्यांच्या योगाचा असा परिपाक होता कीं ज्या वेळेस त्यानें समाधींतून उठावें त्या वेळेस येथें कोणी आहे काय ? असें विचारावें. त्यांच्या मुखांतून कोणी आहे काय असे शब्द निघाल्याबरोबर असमंताद्भागीं जितकीं मनुष्यांचीं व पशुपक्षांचीं प्रेतें असतील तितक्या प्रेतांनीं जीवंत होऊन येथें आह्मी आहोंत असा त्या जिवंत झालेल्या मनुष्यांनीं मुखानें उच्चार करावा. त्यांचीं प्रेतें जिवंत करण्याची कीर्ति चहूंकडे विस्तृत झाली असे. त्या योगानें **चांगदेव** ज्या ठिकाणीं समाधी लाऊन बसले असतील त्या ठिकाणीं लांब लांबच्या देशावर राहणारे लोक आपल्या घरच्या मृत झालेल्या पुरुषाचें प्रेत बरोबर घेऊन येत असत. **पुणतांब्या**मध्यें जी **चांगदेव** समाधी लाऊन बसले होते, ती त्याची चौदावी समाधी होय. असा गोदावरीच्या तीरीं **चांगदेव** समाधिस्थ आहेत व त्यांच्या असमंताद्भागीं कांहीं प्रेतें पडलीं आहेत, इतक्यांत त्याच मार्गानें **निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान** आणि **मुक्ताबाई** हें सर्व जात असतां यांनीं त्या **चांगदेवाच्या** समाधीस व प्रेतांस अवलोकन केलें नंतर **निवृत्ति ज्ञानेश्वरास** असें ह्मणाले कीं **ज्ञानेश्वरा** हा पहा ! महा सिद्ध **चांगदेव** समाधी लावून बसला आहे, व हीं प्रेतें याच्या कृपेनें जिवंत होणार आहेत. काय हा योगाचा परिपाक ! असें भाषण **ज्ञानेश्वरानीं** श्रवण करून त्यांच्या अंतःकरणांत त्या प्रेतांविषयीं फार दया उत्पन्न झाली. त्यांना असें वाटलें कीं, आतांच हीं प्रेतें जिवंत केलीं पाहिजेत. असें मनांत आणून **ज्ञानेश्वरानीं** आपली बहीण **मुक्ताबाई** तिला जवळ बोलाऊन तिच्या कर्णांत **रामानंद स्वामीं**पासून प्राप्त झालेल्या संजिवनी मंत्राचा उपदेश केला. आणि असें सांगितलें कीं, या मंत्राचा जप करून तूं या सर्व प्रेतांस जिवंत कर. ही **ज्ञानेश्वराची** आज्ञा **मुक्ताबाईनीं** मान्य करून त्या प्रेत रक्षकांच्या जवळ आली आणि ह्मणाली कीं. बाबानो ? तुह्मी कोण आहांत व येथें येण्याचें कारण काय? व हीं प्रेतें कोणाचीं आ-

हेत ? हें सांगावें. तें ऐकून प्रेत रक्षक मंडळींनीं आपापलें वृत्त मुक्ताबाईस निवेदन केलें, आणि चांगदेवाचेंही सर्व वर्तमान सांगितलें. मुक्ताबाईनें विचारलें कीं, हीं प्रेतें केव्हां जिवंत होणार ? मंडळींनीं उत्तर दिलें कीं, ज्या वेळेस चांगदेव समाधीतून उठतील तेव्हां हीं जिवंत होतील. हें बोलणें ऐकून त्या सर्वांस मुक्ताबाई म्हणाली कीं हीं शवें आतांच जिवंत व्हावीं अशी तुमची इच्छा असल्यास हीं सर्व प्रेतें एके ठिकाणीं जमा करा. सर्व प्रेतरक्षकांनीं तिच्या भाषणावर विश्वास ठेवून तीं सर्व प्रेतें एके ठिकाणीं जमा केलीं. तें पाहून मुक्ताबाईनीं कांहीं अंतरावर एका मृत श्वानाचें शकल पडलें होतें तें हातीं घेऊन त्या सर्व शवांवरून फिरवून झुगारून दिलें. काय चमत्कार सांगावा ? कीं तें मृत श्वानाचें शकल सचेतन कुत्रा होऊन पळालें, आणि इकडे सर्व शवें जिवंत झालीं. तें त्या लहान मुलीचें कृत्य पाहून प्रेत रक्षकांस व कांहीं चांगदेवाच्या शिष्यांस परम विस्मय झाला. ते निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई तेथून निघून मार्गक्रमण करूं लागले. कांहीं दिवसांनीं ते निवृत्ति ज्ञानेश्वरादि त्या रेड्यासहवर्तमान मोठ्या आनंदानें मार्ग क्रमण करीत असतां जुन्नर तालुक्यांत आळे या नांवाच्या गांवाबाहेर तो बरोबर आणिलेला रेडा मरण पावला. ज्ञानेश्वरानीं त्यास तेथेंच पुरून त्यावर एक धोंडा स्थापन केला; आणि त्याचें नांव ज्ञानोबा असें ठेविलें- त्याची यात्रा अद्यापि त्या गांवांत भरत असती. असो; ते निवृत्ति प्रमुख तेथून निघून मार्गोल्लंघन करीत आळंदीस आपल्या अजोळी येऊन पोंचले. त्यांचे अजोबा जे सिदोपंत ते फार वृद्ध झाले होते. ते आपले कन्येविषयीं व विठ्ठलपंतादिकाविषयीं फार काळजी करीत होते, त्यांना निवृत्ति ज्ञानदेवादि भेटल्यानंतर फार आनंद झाला. सिदोपंतानें निवृत्तिस विठ्ठलपंताविषयीं वर्तमान विचारलें कीं, तुह्मी आला, परंतु रखुमाबाई व विठ्ठलपंत कोठें आहेत ? निवृत्तिनीं आळंदी सोडल्यापासून झालेलें साकल्य वर्तमान निवेदन केलें. त्यांत विठ्ठलपंत रखुमाबाईस बरोबर घेऊन बद्रिकाश्रमीं तप करावयास गेले हेंही सांगितलें. तें ऐकून सिदोपंतास फार दुःख झालें; परंतु करितात काय, गतगोष्टीविषयीं उपाय नाहीं. दुसरे दिवशीं

पैठण क्षेत्रस्थ ब्राह्मणांनीं दिलेलें "शुद्धिपत्र" ज्ञानेश्वरानीं आळंदीस रहाणाऱ्यांस ब्राह्मणांस दाखविलें, त्या शुद्धिपत्रांतील मजकूर वाचून सर्वांस मोठा अचंबा वाटला. ज्ञानेश्वरांनीं पैठणास जाऊन रेड्याच्या मुखानें वेद बोलविलें. नेवासे मुक्कामीं दगडाची मशीद बोलविली, आणि श्रीमद्भगवतद्गीतेवर ज्ञानेश्वरी नामें ओंवीबद्ध टीका केली, इत्यादि कृत्यें सोपानाच्या मुखानें ऐकून सर्वांस असें खचितच वाटलें कीं, निवृत्ति ज्ञानेश्वर, सोपान, आणि मुक्ताबाई हे इश्वरांश आहेत; लांब लांबच्या गांवचे लोक तें वर्तमान ऐकून निवृत्ति ज्ञानेश्वराच्या दर्शनास येऊं लागले, व आळंदींतील सर्व लोक निवृत्ति ज्ञानेश्वरास पूज्य मानूं लायले; परंतु तेथें रहाणारा विसोबा* चाटी खिस्ती व्यापार करणारा ब्राह्मण तो मात्र ज्ञानेश्वरास मानीत नसे. त्यानें ज्ञानेश्वराची नित्य निंदा करावी. मुखानें ह्मणावें कीं, ही संन्याशाचीं मुलें आहेत; यांना वेदोक्त धर्माचा मुळींच अधिकार नाहीं. पैठणांतील ब्राह्मणांनीं कांहीं यांच्यापासून लांच खाऊन यांना शुद्धिपत्र दिलें आहे. या शुद्धिपत्रांतील मजकूरही सर्व खोटा आहे. असें त्यानें लोकांस नित्य सांगावें. दुर्जनाच्या स्वभावाची अशी रीतच असते. दहा हजार रुपयाचा घोडा जरी असला तरी काक पक्षी त्याच्या गुणाकडे व मोलाकडे लक्ष न देतां या घोड्यास नाळ कोठें पडली आहे काय? याचे आंगास कोठें व्रण पडले असल्यास बरें, नाहीं तर हा घोडा कांहीं उपयोगाचा नाहीं, अशा काक दृष्टीप्रमाणेंच दुर्जनाची दृष्टी असते. असो, एके दिवशीं निवृत्ति महाराजास मांडे खाण्याची इच्छा उत्पन्न झाली. कोणी अशी शंका घेतील कीं, हे साधु असतां यांना मांड्यासारखें मिष्टान्न खाण्याची इच्छा झाली हें कसें? तरी यांना मांडे खाण्याची इच्छा झाली ह्मणून साधुपणास ह्मणजे अंतर्निष्ठ ज्ञानास कमीपणा येईल काय? कधींही येणार नाहीं. कारण यांची मांडे खाण्याची इच्छा आणि प्रत्यगात्म्याचें ज्ञान यांत कांहीं संबंध नाहीं. असो, निवृत्तिनाथानीं ती गोष्ट मुक्ताबाईस कळविली. तिनें

---

* ही कथा भक्तिविजयांत, भक्तिकथासारांत व भक्तितत्वामृतांत आहे.

शेजारीं चार घरें फिरून मांड्याचें साहित्य आणिलें, परंतु मांडे करावयास मडक्याचें खापर लागतें ह्मणून मुक्ताबाईनें कुंभाराच्या घरीं जाऊन कुंभारास असें सांगितलें कीं, निवृत्ति दादास मांडे खाण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे तर मांडे करण्याकरितां कृपा करून तूं मला दोन तीन मडकीं दे. कुंभार फार भाविक होता, त्यास ज्ञानेश्वराची साधुपणाची सत्कीर्ति माहित असे ह्मणून त्यानीं मुक्ताबाईस तीन मडकीं दिलीं ती तिनें आपल्या हातांत घेऊन मार्गानें येत असतां मध्यें विसोबा चाट्याची गांठ पडली. विसोबानें मुक्ताबाईस विचारलें कीं, मुली? हीं मडकीं कोठें व कशाकरितां घेऊन चाललीस? मुक्ताबाईनें उत्तर दिलें कीं, हीं मडकीं मांडे करण्याकरितां घेतलीं आहेत. तें ऐकून विसोबानें विचारलें कीं तुह्मी साधु होऊन तुह्मास मांडे कशास पाहिजेत? असें बोलून त्यानें तिच्या हातांतील मडकीं फोडून टाकलीं. तीं मडकीं निरुपयोगीं झालीं ह्मणून मुक्ताबाई घरीं न जातां पुनरपि त्याच कुंभाराच्या घराकडे मडकीं मागावयास चालली. हें पाहून विसोबाही तसाच तिचे मागोमाग गेला, आणि त्यानें कुंभारास अशी ताकीद दिली कीं, जर तूं इजला पुन्हां मडकीं देशील तर तुला मजकडून व्यापाराकरितां एक पैसाही मिळावयाचा नाहीं; अशीच ताकीद सर्व कुंभारांस दिली. मग अर्थातच मुक्ताबाईस मडकीं कोठून मिळणार? नाहींच मिळावयाचीं. कारण, "द्रव्येण सर्वे वशाः" द्रव्याच्या योगानें सर्व लोक स्वाधीन होतात, व द्रव्याकरितां निषिद्ध कर्माचरणाविषयीं प्रवृत्त होतात. सारांश मुक्ताबाई एक प्रहरपर्यंत सर्व कुंभारांचीं घरें हिंडली, परंतु तिला कोणीही मडकीं दिलीं नाहींत. मग ती निरूपाय झाल्या कारणानें निराश होऊन आपले घरीं परत आली. तिनें झालेलें सर्व वर्तमान ज्ञानेश्वरास निवेदन केलें. कुंभारांनीं निवृति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई ह्या सत्पुरुषांचा यःकश्चित विसोबा चाटी याच्या सांगण्यावरून अनादर केला हें परमेश्वरास सहन न झाल्यामुळें त्या दिवसापासून आळंदी येथें कुंभारांचा व्यापार मुळींच चालेनासा झाला.; ही साक्ष अद्यापि तेथें आहे. असो, तें मुक्ताबाईचें वचन ऐकुन ज्ञानेश्वरानीं सांगितलें कीं, मुक्ताबाई? मडकीं नाहीं मिळत तर त्याविषयीं इतकी काळजी करावयास नको. परंतु मी विचारतों

त्याचें उत्तर दे माझ्या पाठीवर मांडे होतील किंवा नाहीं ? मुक्ताबाई मडक्यासारखे पाठीवर मांडे घालतां येतील, पण मडक्याखालीं अग्नीचीं ज्वाळा असते. पाठीखालीं कोठून येईल ? ज्ञानेश्वर ह्मणाले कीं पाठीखालीं कोठून येईल ह्मणजे–आपल्या पोटांत जठराग्नि आहे तो आपणास प्रदीप्त करतां येणार नाहीं काय ? मुक्ताबाई ह्मणाली कीं जठराग्नि प्रदीप्त करून जर कार्य होईल तर फारच चांगलें. नंतर मुक्ताबाईनें मांड्याचें पीठ भिजवून मांडे तयार केलें, आणि ज्ञानेश्वरास ओणव करून त्यांचे पाठीवर घातले. ज्ञानेश्वरानीं योगसिद्धीनें आपला जठराग्नि प्रदीप्त केला. ज्ञानेश्वराच्या योगबलाच्या सहायानें मुक्ताबाईनें मांडे परिपक्व करून आपल्या पित्यासमान जे आपले वडील बंधु निवृति महाराज त्यांना ते मांडे भक्षावयास दिलें, आणि त्या योगानें त्यांची इच्छा पूर्ण केली. इकडे मुक्ताबाईस मडकीं मिळालीं नाहींत तर ही मांडे कशी करील हें पाहण्याकारितां विसोबा चाटी तिचे मागोमाग येऊन दाराच्या आडून पहात होता. त्यानें ज्ञानेश्वराच्या जठराग्नीच्या योगानें तप्त झालेल्या पाठीवर मुक्ताबाईनें मांडे परिपक्व केलें हें सर्व कृत्य पाहून त्यास असें वाटलें कीं आज पावेतों मी जो यांचा रेड्याच्या मुखानें वेद बोलविण्याचा लौकीक ऐकत आहे तो सर्व खरा आहे यांत कांहीं संशय नाहीं. तर अशा सत्पुरुषांचा मी व्यर्थ छल केला. असा त्यास पश्चाताप होऊन तो एकाएकी दार न वाजावितां घरांत येऊन ज्ञानेश्वराच्या अग्रभागीं उभा राहिला. त्यास पाहून ज्ञानेश्वरास असें वाटलें कीं हा पुरुष कोणी तरी खेचर म्हणजे आकाशांत संचार करणारा यक्ष किंवा किन्नर असावा, अशा बुद्धीनें ज्ञानेश्वर म्हणाले कीं खेचरा ! यावे. हें ऐकून विसोबानें ज्ञानेश्वरास साष्टांग प्रणिपात करून भाषण केलें कीं महाराज मी आपला अपराधी विसोबा चाटी आहे. तर माझे सहस्त्र अपराध क्षमा करून मला कृतकार्य करावें. नंतर ज्ञानेश्वरानीं त्याचें खरें मुमुक्षत्व पाहून त्यास तत्वज्ञानाचा उपदेश करून कृतार्थ केलें. ज्ञानेश्वरानीं खेचर या नांवानें हांक मारिली म्हणून त्याचें नांव विसोबा खेचर असें पडलें; असो. इकडे याच वेळीं पुलतांबे मुक्कामीं चांगदेवानें आपले समाधीचें विसर्जन केलें; आणि असमंताद्भागीं पाहून कोणी येथें आहे काय ? असें विचारिलें, परंतु

त्यास कोणीही उत्तर दिलें नाहीं हें पाहून तो आपल्या शिष्य मंडळी-स विचारतो कीं ज्या अर्थी येथें कोणी उत्तर देत नाहीं त्या अर्थी या वर्षी कोणीही मरण पावलें नाहीं काय? शिष्य मंडळींनीं उत्तर दिलें कीं महाराज? येथें बहुत प्रेतें पडली होतीं परंतु थोडेच दिवसामागें निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव आणि मुक्ताबाई ह्या नांवाचे कोणी चौघे जण आले होते ते आपल्याकडे पाहून एकमेकांत बोलूं लागले. ते काय बोलले हें आम्हांस कांहींच कळलें नाहीं परंतु आम्हांस इतकेंच वाटतें कीं त्यांना आपले योगसिद्धीचें व समाधीचें कांहींच महत्व वाटले नाहीं. त्याजमध्यें ज्ञानेश्वर या नांवाचा एक पुरुष होता त्यानीं त्या मुक्ताबाई-च्या कानांत कांहीं गोष्ट सांगितली. मग ती काय असेल ती, असो. त्यानंतर तिनें तीं सर्व प्रेतें एके ठिकाणीं जमा करून पलीकडे लांब एक कुत्र्याचें शकल पडलें होतें तें एकदम धावत जाऊन घेऊन आली; आणि त्या सर्व प्रेतावरून ओवाळून फेंकून दिलें. महाराज! काय चमत्कृति सांगावी कीं एकदम सर्व प्रेतें सजीव होऊन उठून बसलीं; आणि तें कुत्र्याचें फेंकलेलें शकल अर्धे असतां त्याचे पूर्ववत् जसेचे तसेच कुत्रे बनून तेंही भों भों करीत पळून गेलें. तीं जिवंत झालेलीं मनुष्यें व त्यांची रक्षक मंडळी या सर्वांनीं त्या चौघांस साष्टांग नमस्कार करून ते आपआपल्या घरी गेले; आणि निवृत्ति, ज्ञानेश्वरादिक पुढें चालते झाले. महाराज? बहुत योगी पाहिले, बहुत तपस्वी पाहिले आणि बहुत साधू तत्ववेत्तेही पाहिलें परंतु मृत झालेल्या मनुष्यांवरून कांहीं तरी घेऊन—उदाहरणार्थ कुत्रेंच कां होईना—तें त्यावरून ओवाळून टाकावें, आणि त्या मृत मनुष्यांनीं तर काय परंतु त्यांना सजीव करण्याचें साधन जें कुत्रें त्यानें ही एक क्षण न लागतां जिवंत होऊन पळून जावें, असा चमत्कार आमच्या कोठेंही पाहण्यांत आला नाहीं. शिष्य मंडळींनीं निवेदन केलेलें सर्व वृत्त ऐकून चांगदेवास असें वाटलें कीं ते कोणी तरी महा वैष्णव तत्ववेत्ते जगाचा उद्धार करण्याकरितांच अवतरले असावेत यांत संशय नाहीं. असा त्यानें विचार करून भाषण केलें कीं शिष्य हो ते पुरुष कोण व ती स्त्री कोण? आणि ते गेले कोणीकडे हें तुम्हांस माहीत आहे काय? शिष्य मंडळींनीं उत्तर दिलें कीं महाराज! ते कोण होते हें आम्हांस माहीत नाहीं परंतु ते कोणी

साधू असावेत; आणि त्यांतूनही ते इतर पोटार्थी साधूप्रमाणें माळा मुद्रांचा शृंगार करून देवभोळ्या मनुष्यापासून द्रव्य उपटणारे नाहींत असें म्हणण्यास कांहीं चिंता नाहीं. कारण असें अलौकीक कृत्य इतराचे हातून व्हावयाचें नाहीं. असें शिष्यमंडळींनीं सांगितल्यानंतर चांगदेवास फार वाईट वाटलें. त्यानें असा विचार केला कीं आपणास ही सद्गुरुचा उपदेश नाहीं तर आपण योग सिद्धीच्या अभिमानाचा त्याग करून त्यांना शरण जावें, हें बरें दिसतें. असें मनांत आणून त्यानें योगसिद्धीच्या मार्गानें निवृत्ति ज्ञानेश्वरादिक कोठे वास्तव्य करितात याचा शोध करण्यास आरंभ केला. दोन घटका झाल्यानंतर सिद्धीच्या सहायानें निवृत्ति ज्ञानेश्वरादिक आळंदीसच राहतात, असें त्यास कळलें. नंतर त्यानें त्यांस पत्र पाठविण्याचा निश्चय केला. हातांत कागद व लेखणी घेऊन लिहिण्यास आरंभ करितात तों लागलाच संशय उत्पन्न झाला कीं त्यांना आरंभीं चिरंजीव लिहावें किंवा तिर्थस्वरूप लिहावें—चिरंजीव लिहावें तर ते आपणाहून ज्ञानानें वरिष्ठ दिसतात व त्यांना आपण सद्गुरु करणार आहोंत. सद्गुरूस चिरंजीव लिहिणें योग्य नव्हे. आतां तीर्थस्वरूप लिहावें तर ते वयानें आपणाहून लहान आहेत, असें शिष्यांच्या सांगण्यावरून समजतें. तरी त्यांना काय लिहावें हें कांहीं सुचत नाहीं. पहा! एवढा चौदाशें वर्षें वांचून आपणास मी मोठा सर्व योगामध्यें वरिष्ट, आणि ज्ञानवान् असें तो आपल्या मनांत मानीत असे; परंतु सद्गुरुमुखें अपरोक्ष ज्ञानाचा अनुभव नसल्यामुळें साधारण पत्राच्या वरील मायना लिहिण्यास तो इतका घोटाळ्यांत पडला. असो; शेवटीं त्यानें तो कागद कोराचा कोराच एका शिष्याच्या हातीं पाठऊन दिला. कांहीं दिवसांनीं तो शिष्य आळंदीस आला, आणि हें पत्र आमचे गुरू चांगदेव यानीं आपल्याकडे पाठविलें आहे, असें म्हणून त्यानें तो कागद ज्ञानेश्वरापुढें ठेविला. ज्ञानेश्वरानीं तो कागद फोडून आंत कोराच बंद आहे असें पाहून निवृत्तिचे हातीं दिला. त्यांनीं तो सोपानाचे स्वाधीन केला, व सोपानदेवानें त्याचप्रमाणें मुक्ताबाईचा आंगावर फेंकिला. मुक्ताबाईनें तो कोरा बंद हातांत घेऊन मोठ्या आश्चर्यानें ती म्हणाली कीं काय बाई मेला चौदाशें वर्षें वाचला—

उंच एरंडा सारखा वाढला आणि भोळे जन मात्र सिद्धाई दाखऊन बुडविले. तरी अद्यापे जसाचा तसाच कोरा राहिला. सारांश निवृत्ति ज्ञानेश्वरादिकांनीं शेवटीं तोच कागद त्या शिष्याच्या आंगावर फेंकिला. पत्राचें उत्तर मागितलें आहे, अशी शिष्यानें विनंति केल्यावरून ज्ञानेश्वरानीं एका कागदावर पासष्ट ओंव्या लिहून हें पत्राचें उत्तर असें म्हणून तो कागद त्याच्या हातीं देऊन त्यास परत लाविलें—त्या पासष्ट ओंव्याच्या उत्तरास " पासष्टी ग्रंथ " असें म्हणतात. शिष्यानें तें पत्र कांहीं दिवसांनीं पुलतांबें येथें आल्यावर चांगदेवाच्या पुढें ठेविलें. चांगदेव पत्र हातांत घेऊन वाचूं लागले, परंतु त्यांना त्या पत्रांतील एकाही अक्षराचा अर्थ कळेना. चांगदेवानें शिष्यास विचारलें कीं, शिष्या ! माझें पत्र पाहून त्यानीं कांहीं भाषण केलें काय ? शिष्यानें उत्तर दिलें कीं महाराज ! निवृत्ति, ज्ञानदेव, व सोपान, यांनीं कांहीं एक भाषण केलें नाहीं परंतु मुक्ताबाई मात्र म्हणाली कीं मेला चौदाशें वर्षें वांचून कोराचे कोराच राहिला. असें शिष्याचें वचन ऐकून चांगदेवास तर फारच पश्चात्ताप झाला. त्यास असें वाटलें कीं आपण प्रत्यक्ष भेटल्याशिवाय या पत्राच्या अर्थाचा उलगडा व उपदेश कांहींच व्हावयाचा नाहीं. नंतर त्यानें ज्ञानेश्वराच्या भेटीस जाण्याचा निश्चय करून निघण्याची तयारी केली, सुंब जळतें पण त्याचा पीळ जळत नाहीं या म्हणीप्रमाणें ज्ञानेश्वरास शरण जाऊन कृतार्थ व्हावें असा अनुताप जरी झाला तथापि त्याचा अंतर्गत योगसिद्धीचा अभिमान जळाला नाहीं. आपली योगसिद्धि दाखविण्याकरितां आपण सजीव व्याघ्रावर बसून व त्यास मारण्याकरितां हातीं सर्पाचा प्रतोद करून ते चांगदेव सर्व शिष्यांसहवर्तमान योगबलानें पक्षाप्रमाणें आकाश मार्गानें आळंदीस जाण्याचा मार्ग क्रमण करूं लागले. त्यावेळेस प्रातःकाळचा सुमार होता, म्हणून निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान, आणि मुक्ताबाई, हे भिंतीवर मूख प्रक्षालन करीत ऊन घेत बसले होते. इतक्यांत मुक्ताबाईची दृष्टी आकाशाकडे गेली. आणि तीवर पहाते तों सर्व आकाश टोळधाडी प्रमाणें व्याप्त झालें, असें तीस दिसलें. तिनें ज्ञानेश्वरास विचारिलें कीं आकाश इतकें कशानें व्याप्त झालें आहे ? ज्ञानेश्वरानीं आका-

शाकडे पाहून सांगितलें कीं तें ( वर हात करून ) पुलतांब्याचे योगी चांगदेव चौदाशें शिष्यांसहवर्तमान आकाशमार्गानें आपणास भेटण्याकारितां येत आहेत. तें ज्ञानेश्वरांचें भाषण ऐकून मुक्ताबाई म्हणाली कीं तर मग आपण त्यांना सामोरे गेलें पाहिजे. पण जावें कशावर. ज्ञानेश्वर म्हणाले कीं, आपण ज्यां भिंतीवर बसलों आहोंत त्या भिंतीवरच बसून जावें. मुक्ताबाई म्हणाली कीं चलातर चलों.

**अहींद्र तोत्रं मृगराजवाहन माकाश मार्गेण समागतं हितं॥ज्ञानेश्वरः सिद्धिमदं निरक्षितं भीत्यांस्थितः सर्पाहिसर्पचाहतां ॥ १ ॥ अर्थ ॥**

ज्यानें सर्पाचा प्रतोद केला, व व्याघ्राचें वाहन केलें आहे, असा आकाश मार्गानें येणारा जो चांगदेव त्याचा हा सिद्धिमद अवलोकन करून ज्ञानेश्वर ज्या भिंतीवर बसले होते त्या भिंतीप्रत सर्प सर्प ( लौकर चल लौकर चल ) असें म्हणाले. काय तें आश्चर्य ! ती भिंत निर्जीव असतां ज्ञानेश्वराच्या योगबलानें रथाप्रमाणें पळू लागली. निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान आणि मुक्ताबाई, हे निर्जीव भिंत चालवून सामोरे येत आहेत असें पाहून आपण सजीव व्याघ्रावर बसून आकाश मार्गानें चाललों आहों यांत आपला कांहींच पराक्रम नाहीं असें चांगदेवास सहजच वाटलें: आणि त्या योगानें त्याचा सर्व अभिमान गलित झाला. चांगदेवानें व्याघ्रावरून खाली उडी टाकून ज्ञानेश्वराच्या पायावर मस्तक ठेवलें, आणि म्हणाला कीं मी मूढ अज्ञानी आहे; तर मजवर कृपादृष्टी करून कृतार्थ करण्यास आपण समर्थ आहां. ज्ञानेश्वरानीं त्यास उठवून कांहीं काळजी करूं नकोस असें सांगून त्याचें शांतवन केलें. सर्व शिष्यांनींही निवृत्ति ज्ञानदेवादिकांस साष्टांग प्रणिपात केला. मार्गानें झालेल्या श्रमाचा परिहार व्हावा, ह्मणून तेथें एक महाविस्तृत् वटवृक्ष होता त्या वृक्षाच्या खालीं ते सर्व विश्रांति घेण्यास बसले. त्या वृक्षास अद्यापि “ विश्रांती वड” असें म्हणतात. तेथें कांहीं वेळपर्यंत त्यांनीं प्रेम भरीत भाषण करून निवृत्ति ज्ञानदेवादीक व चांगदेव सर्व शिष्यासहवर्तमान आळंदी गांवापध्यें येत असतां त्याचे पाठीमागें भिंत येत आहे हें पाहून ज्ञानेश्वरानीं असा विचार केला कीं ही भिंत जर अशीच चालू लागेल तर अनवस्था होईल; व भिंत चालविण्याचा हेतु ही पूर्ण झाला आहे, ह्मणून

आतां या भिंतीस गमन करण्याचें कांहींच कारण नाहीं. ह्मणून गांवाबाहेरच त्यानीं त्या भिंतीस येथेंच उभी रहा असें सांगून ते आपल्या घरीं येऊन पोंहचले; व ती भिंत ज्ञानेश्वराच्या आज्ञेनें गांवाबाहेर उभी राहिली. ती अद्यापि तेथेंच आहे. भावीक लोक आपल्या घरच्या मंडळीस कांहीं अजार उत्पन्न झाला ह्मणजे त्या भिंतीची मृत्तिका आणून औषधाप्रमाणें पाण्यांत घालून अजारी मनुष्यास देत असत, त्या योगानें ती भिंत क्षीणत्वाप्रत पावली. नंतर गांवकरी लोकांनीं त्या भिंतीचा अंशमध्यें ठेऊन चहूंबाजूनें कांहीं विटाची व कांहीं दगडाची मिळून भिंत तयार केली आहे. या नवीन भिंतीस सुमारें पंचवीस किंवा तीस वर्षें झालीं असावीत. असो, ज्ञानेश्वरादीक घरीं आल्यानंतर चांगदेवानेंही आपल्या शिष्यांसह गांवाबाहेर तळ दिला. त्या दिवसापासून चांगदेवानें प्रति दिवशीं उपदेशाच्या हेतूनें ज्ञानेश्वरांच्या घरीं जाण्याचा क्रम ठेविला. एके दिवशीं चांगदेवाच्या येण्याचे समयीं मुक्ताबाई नग्न नहावयास बसली होती तीस पाहून नग्न स्त्रियाचे सान्निध पुरुषानें कसें जावें अशी चांगदेवास शंका उत्पन्न होऊन तो किंचित् मागें सरला. ही नहात आहे म्हणून शंकायुक्त होऊन चांगदेव मागें सरला, हें पाहून तिनें भाषण केलें कीं मेला चौदाशें वर्षें वांचून योगबलानें मोठी सिद्धि दाखवितो; व मोठ्या ज्ञानाच्या गोष्टी सांगतो. परंतु अद्यापि ही ह्याचा अंतर्यामीचा स्त्रीपुंवत्भाव गेला नाहीं. हे शब्द चांगदेवाच्या हृदयास फारच लागले; आणि त्या दिवसांपासून तो त्यांच्या सेवेंत तत्पर असून वारंवार उपदेश करण्याविषयीं ज्ञानेश्वराची प्रार्थना करीत असे. शिष्यशाखेचा अभिमान व देहावरील ममत्व ही दोन्हीं ह्याच्या हृदयांतून नष्ट झालीं आहेत किंवा नाहींत, नष्ट झाली नसल्यास दोन्हींचाही निरास एक समयींच होईल, असा कांहीं चमत्कार करून यास अनुभव आणून द्यावा, असें मनांत आणून ज्ञानेश्वरानीं त्यास सांगितलें कीं उपदेश घेण्यास उदईक मुहूर्त फार चांगला आहे; परंतु अगोदर एकबळी द्यावा लागतो, बळी आण, म्हणजे लागलाच उपदेश. ज्ञानेश्वराचें भाषण ऐकून चांगदेवास फार आनंद झाला, आणि बळी म्हणजे काय ? आपणाजवळ इतके चौदाशें

शिष्य आहेत त्यांतून कोणीना कोणी तरी मजकरितां बळी जाण्यास तयार होईलच, असें मनांत म्हणत तो धावत धावत आपले शिष्य मंडळींत आला. तेथें येऊन चांगदेवानें त्या सर्वांस बळी जाण्याचें वर्तमान सांगितलें; परंतु कोणत्याही शिष्यानें त्यास रुकार दिला नाहीं. चांगदेव म्हणाले कीं तुम्हीं इतकेजण असून आज माझ्या कोणी एक ही उपयोगास पडत नाहीं, तरी तुम्हीं सर्व भोजनभाऊच दिसतां: असो ईश्वर इच्छा. सारांश, शिष्यांची आपल्याठिकाणीं ह्या प्रकारची निष्ठा पाहूच चांगदेवास जें दुःख झालें तें लिहितां येत नाहीं. शेवटीं चांगदेवांच्या अभिमानाचा सर्व प्रकारें निरास होऊन तो ज्ञानेश्वरापाशीं आला, आणि त्यांचें चरणारविंदीं मस्तक ठेऊन दीनपणानें म्हणाला, महाराज ? हा जड मूढ पातकी चांगदेव आपणास अनन्यभावें शरण येऊन प्रणिपात करीत आहे, तरी ह्या दीनावर कृपाकरून जन्म मरणापासून मुक्त करावें. हें चांगदेवाचें दीन भाषण ऐकून ज्ञानेश्वराचें अंतःकरण फार सद्गदित झालें; व ह्याजवर आतां मुमुक्षु दशेचीं चिन्हें खरीं उमटलीं आहेत, तरी ह्यांस उपदेश देण्यास कांहीं चिंता नाहीं, असें मनांत आणून ज्ञानेश्वरानीं मुक्ताबाईस ज्ञानेश्वराच्या आज्ञनुरूप चांगदेवाच्या मस्तकीं हस्त ठेवून त्यास तत्वज्ञानाचा उपदेश केला; आणि तेणेंकरून तो कृतार्थ झाला. असो पूर्वोक्त नेवासें येथें ज्ञानेश्वरानीं शिलेवर "ज्ञानेश्वरी" लिहून सच्चिदानंद बाबास तिची एक प्रत आपणाजवळ ठेवावी, व दुसरी प्रत मजकडे पाठवून द्यावी असें सांगितलें होतें याची अठवण वाचकांस असेलच त्याप्रमाणें सच्चिदानंद बाबानें एक प्रत ज्ञानेश्वराकडे पाठविली. थोडेच दिवसांनीं ती प्रत ज्ञानेश्वराकडे येऊन पोंहचल्यानंतर ज्ञानेश्वरानीं ती निवृत्तिनाथास दाखविल्यावर निवृत्तिनाथानीं ती सर्व वाचून पाहिली; आणि म्हणाले कीं ज्ञानेश्वरा तुम्हीं गीता भाष्य ज्ञानेश्वरी या नामें हा ग्रंथ केला तो चांगला झाला आहे, परंतु ही ज्ञानेश्वरी श्रीमद्भगवद्गीतेवर टीका आहे. तरी मला असें वाटतें कीं एखाद्या मूळ ग्रंथाचा आधार घेऊन त्यावर आपण टीका करणें यांत कांहींच आश्चर्य नाहीं, कारण त्याजमध्यें कर्म, उपासना व ज्ञान इत्यादिक विषयावर त्याचे उत्तम प्रकारें निरूपण श्रीकृष्णानीं केलें आहे. वि-

शेष आपण संस्कृताचें मराठी मात्र केलें. तस्मात् धन्य तो मुकुंदराज, कीं ज्यानें कोणच्याही मूळ ग्रंथाचा आधार न घेता स्वकपोलकल्पित "विवेक सिंधू" नामक ग्रंथ केला त्यांत त्याची मात्र बुद्धीची व ज्ञानाची कुशलता खरी; तसें कांहीं तुम्ही केलें नाहीं, हें निवृत्तिनाथाचें भाषण ऐकून ज्ञानेश्वर मनांत म्हणतात कीं आपण जी ज्ञानेश्वरी केली, ती सद्गुरु निवृत्तिनाथास पसंत झाली नाहीं. बरें आपण त्यांना दुसरा ग्रंथ करून दाखवूं मग त्यांनीं त्या दिवसापासून वेदाच्या दहांही उपनिषदांचा सारांश येईल व जेणें करून अमृत म्हणजे चित्स्वरूपाचा अनुभव येईल, अशा पदाचा प्रयोग करून "अमृतानुभव" नामक ग्रंथ करण्यास आरंभ केला. कांहीं दिवसांनीं तयार करून तो निवृत्तिनाथास दाखविला. तो "अमृतानुभव" ग्रंथ पाहून निवृत्तिनाथास फारच आनंद झाला ही गोष्ट चांगदेवाचा उद्धार झाल्यानंतर झाली. आणखी ज्ञानेश्वरानीं पवनविजय, योगवाशिष्टावर टीका पंचीकरण आणि दुसरे हरीपाठ वगैरे स्फुट अभंग असें बहुत ग्रंथ केलें. पूर्वीं ज्या वेळेस रामानंद स्वामीनीं ज्ञानेश्वरास श्रीविठ्ठलाची प्रसादरूप तुलसीमाला दिली त्या वेळेस त्यांनीं त्यास श्रीविठ्ठलभक्तिचा प्रसार करण्याची आज्ञा केली होती. त्यावरून ज्ञानेश्वर पंढरीक्षेत्रीं श्रीविठ्ठलाच्या दर्शनास दोन वेळा गेले होते. त्यांनीं श्रीविठ्ठलास संबोधून श्रीविठ्ठलवर्णनात्मक एक अष्टक केलें आहे. पंढरीक्षेत्राहून आळंदीस आल्यानंतर अज्ञानजनानीं भक्तिमार्गास लागावें या हेतूनें ज्ञानेश्वरानीं आपल्या घरीं ज्ञानेश्वरी वाचण्याचा क्रम चालू केला. प्रथमारंभी श्रवणास फारसे लोक येत नसत. नंतर पुढें बरीच मंडळी येऊं लागली; व ज्ञानेश्वराचेविषयीं लोकांच्या मनांत अत्यंत पूज्यबुद्धि उत्तरोत्तर वाढू लागली. ज्ञानेश्वरानीं बहुत लोकांस उपदेश करून भक्तिमार्गास लाविले. आळंदीमध्यें* त्र्यंबकपंत या नांवाचा प्रथम शाखेचा ब्राम्हण रहात असे. तो रूपानें फार सुंदर दिसत असे. त्यांच्या स्त्रीचें नांव पार्वतीबाई, ती महासाध्वी होती. तो त्रिंबकपंत आपल्या कुटुंबाचा त्याग करून एका शूद्र स्त्रीशीं लुब्ध झाला होता, त्या यो-

---

* ही आणि पुढील कथा, कथाकल्पवृक्षामध्यें आहे.

गानें पार्वतीबाई फार दुःख करीत असे. तिनें ज्ञानेश्वरांची सत्कीर्ति ऐकून एके दिवशीं त्यांच्या घरीं गेली, आणि त्यांना आपल्या पतीविषयीं सर्व वृत्तांत निवेदन केला. ज्ञानेश्वरानीं तिचें शांतवन करून तीस परत लाविलें. दुसरें दिवशीं त्यांनीं त्या शूद्र स्त्रीस आपणाजवळ बोलाविलें, आणि तिजकडून त्र्यंबकपंतास ही बोलाऊन आणिलें. प्रथम त्यास इतकाच उपदेश केला कीं तूं जें करीत आहेस तें उत्तमच आहे. परंतु माझी प्रार्थना इतकीच आहे कीं तुम्हीं दोघांनीं येथें नित्य ज्ञानेश्वरी दोन घटिका श्रवण करण्यास येत जावें. ही गोष्ट त्रिंबकपंताच्या मनांतून मान्य करण्याची नव्हती; परंतु त्या शूद्र स्त्रीनें मान्य केली; आणि तिच्या अनुरोधानें त्रिंबकपंतासही रुकार देणें भाग पडलें. असो; त्या दिवसापासून ते दोघे गीताभाष्य श्रवण करण्यास येत असत. कांहीं दिवस त्या उभयतांचा असा क्रम चालला असतां एके दिवशीं ज्ञानेश्वरानीं ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांतील जीवाच्या अज्ञान दशेवर निरूपण केलें. तें ऐकून त्या दोघास मोठा पश्चात्ताप झाला. पुराण समाप्त झाल्यावर दोघांनीं ज्ञानेश्वरास साष्टांग नमस्कार घातला; आणि आमच्या जन्माचें सार्थक कसें होईल कारण आह्मीं पातकी आहोंत, आह्मीं फार निंद्य कर्म केलें; तरी आह्मावर जगदीश्वर कृपा करील काय? याप्रमाणें त्यांनीं ज्ञानेश्वरापुढें दीनवाणीनें भाषण केलें. ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं त्रिंबकपंत माझी आज्ञा तुह्मास मान्य असेल तर तूं स्वस्त्रीसहवर्तमान ग्रहस्थाश्रम करून जगदीश्वराची उपासना करावी; आणि इतर सत्पुरुषांची सेवाकरून ईश्वर नामस्मरणानें कालक्षेप करावा. असें केलें असतां तुह्मा उभयतांचें कल्याण होईल. मग ते उभयतां ज्ञानेश्वराचें वचनावर विश्वास ठेऊन तदनुसार वर्तन करूं लागले. तें पाहून त्या महासाध्वी पार्वतीबाईस फारच आनंद झाला. तीस असें वाटलें कीं ज्ञानेश्वराचे उपकार जन्मजन्मांतरींही फिटावयाचे नाहींत. कांहीं दिवसांनीं त्या पार्वतीबाईस तीन पुत्र झाले. त्या मुलांची मौंजीबंधनादिक कार्यें झालीं. तेव्हां त्रिंबकपंतानें विचार केला कीं आपला ग्रहस्थाश्रम करण्याचा हेतु पूर्ण झाला; तर आतां स्वहिताचा विचार केला पाहिजे. असें मनांत आणून तो ज्ञानेश्वरास अनन्य भावानें शरण गेला. ज्ञानेश्वरांनीं त्याचें मुमुक्षुत्व पाहून तत्वज्ञानाचा उपदेशानें त्यास

कृतार्थ केलें. त्याच्या स्वरूपापासून लोकांस फार आनंद होत असें ह्मणून त्याचें नांव स्वरूपानंद असें ठेविलें. त्या दिवसापासून ज्ञानेश्वराच्या पुराणास लोकांची बहुत गर्दी होव असे. घरांत जाग्याचा संकोच असल्यामुळें ते कधीं कधीं आळंदीपासून अर्ध्या कोसावर जांबूळबेट असे तेथें पुराण सांगत असत. यानंतर चरवली मुकामीं एक विमलानंद या नांवाचा स्वामी रहात असे, त्यानें मध्वाचार्या जवळ वेदभाष्याचें अध्यन केलें होते. श्रीज्ञानेश्वराची कीर्ति श्रवण करून तो मतसंबंधानें अद्वैत मताचा फार विरोधी असल्यामुळें ज्ञानेश्वराचा अत्यंत धिःकार करी. त्यानें ज्ञानेश्वराची निंदा गांवच्या लोकांजवळ नित्य करावी. एके दिवशीं ग्रामवासी लोकांनीं त्यास असें सांगितलें कीं तूं आमच्या जवळ त्या सत्पुरुषाविषयीं आपल्या विद्येच्या प्रतिष्ठेनें तुच्छ बुद्धि दर्शिवतोस परंतु हजारो मनुष्यें त्यांच्या पुराणश्रवणानें अनुताप युक्त होऊन त्यांचा उपदेश घेऊन कृतार्थ होतात. अशा श्रेष्ठ पुरुषाची तूं व्यर्थ निंदा करितोस तस्मात् हें तुझें कृत्य जसें सूर्यापुढें काजव्यानें आपल्याच प्रकाशाची प्रतिष्ठा मानणें तसें आहे. तुझी ज्ञानाची बडबड आमच्या सारख्या अज्ञानाजवळ करून काय उपयोग! तर तूं स्वतः आपली ज्ञानाची प्रतिष्ठा व द्वैत प्रतिपादन करणें तें ज्ञानेश्वराच्या समक्ष करावें; आणि त्यांच्यापासून आपल्या मनाची खात्री करून घ्यावी. व्यर्थ त्यांच्या परोक्ष निंदा करणें हें युक्त नव्हे, असें ऐकून तो विमलानंद स्वामी दुसरे दिवशीं भोजनोत्तर मोठ्या त्वेषानें ज्ञानेश्वराचें मत खंडण करावें अशा बुद्धीनें आळंदीग्रामीं येऊन ज्ञानेश्वराचा शोध केला. तेव्हां गांवांतील लोकांनीं त्यास असें सांगितलें कीं तुह्मास ज्ञानेश्वराची गाठ घेणें असल्यास या वेळेस जांबूळ बेटांत ते पुराण सांगत आहेत. आपण तेथें जावें; असें ऐकून तो तेथून निघून जांबूळेबटांत आला. आणि पहातो तों त्यास असा चमत्कार दृष्टीस पडला कीं चतुर्भूज पीतांबरधारी साक्षात् नारायणच गीता सांगत बसले आहेत, व त्यांच्या सभोवती कश्यपादि ऋषी मंडळी गीता श्रवणार्थ बसली आहेत हें पाहून त्यानें लोकांस असा प्रश्न केला कीं येथें ज्ञानेश्वर पुराण सांगतात ते कोणचे? मंडळींनीं उत्तर दिलें कीं जे मध्यंतरी बसले आहेत ते. तिकडेस पाहतो तों आपले उपास्य दैवत

श्रीकृष्ण ते पुराण सांगत आहेत असें पाहून त्यास परम पश्चाताप झाला. नंतर तो द्वैताभिमान सोडून अनन्य भावानें ज्ञानेश्वरास शरण गेला. परम दयालू ज्ञानेश्वरानीं कृपा करून त्यास कृतार्थ केलें.

## ॥ पंचमोल्लासः ॥

### श्री वि ठ्ठ ल

## ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

क्वचित्तीर्थयात्रामिषेणैवनीत्वा । स्वसंवेद्यतत्वंनजानासिविष्णोः ॥
अतोविठ्ठलेनाज्ञितोनामदेवः । समाधिस्थमूर्तिंभजेज्ञानदेवं ॥ १ ॥

पहा? सत्पुरूष किती पवित्र असतात, कीं जगतास पावन करणारीं जीं तीर्थें त्यांनाही सत्पुरूष पवित्र करितात. *आळंदी येथें श्रीज्ञा-

---

* या तीर्थयात्रेंतील ज्ञानेश्वरांनीं केलेल्या अद्भुत गोष्टीविषयीं नरहरी सोनारकृत भक्तिकथासार, भक्तिकथामृत, धुंडीराजकृत भक्तिलीलामृत, नरहरीमालुकृत भक्तिसारामृत, व कथाकल्पवृक्ष असे बहुतग्रंथप्रमाणें आहेत. आतां नामदेवांनही तीर्थावळीचे अभंग केले आहेत; परंतु नामदेवकृत तीर्थावळीमध्यें असें आहे कीं श्रीज्ञानेश्वर आणि नामदेव हे दोघेच यात्रा करण्यास गेले होते; व त्यांतमध्यें या चमत्काराच्या कांहीं गोष्टीं वर्णन केल्या आहेत व कांहीं नाहींत. आतां वाचक असें ह्मणतील कीं नामदेव हा त्या तीर्थयात्रेच्या वेळेस बरोबर होता, श्रीज्ञानेश्वर आणि नामदेव समवयस्कही होते, तर त्यानें जें वर्णन केलें असेल तेंच खरें, परंतु जसा नामदेव बरोबर होता, त्याचप्रमाणें नरहरी, चोखामेळा व गोराकुंभार हेही बरोबर होते; तर यांनीं केलेले ग्रंथ कां खरे ह्मणूं नयेत? व या यात्रेसंबंधीं घडलेल्या चमत्काराविषयीं श्रीज्ञानेश्वराचे कांहीं अभंग आढळतात; व श्रीज्ञानेश्वरानीं देशपरत्वें तैलंगी भाषेंत, कर्णाटकी भाषेंत व हिंदुस्थानी भाषेंत कांहीं अभंग केले आहेत. त्यांत मध्येंही या कांहीं कांहीं गोष्टीचा उल्लेख आढळतो, आणि या कथेविषयीं बहुत साधूंचीं प्रमाणें आहेत; ह्मणून बहुत मताचेंच ग्रहण केलें. पुष्कळ ग्रंथांच्या आधारानें या पुढील कथा लिहिल्या आहेत.

नेश्वर भजन, पुराण, कीर्तन इत्यादिकें करून अज्ञान जीवांचा उद्धार करीत असतां, एक दिवशीं रात्रीं निद्रिस्त असतांना ज्ञानेश्वरास असें स्वप्न पडलें कीं, आपल्या सन्मुख कांहीं रूपवती शृंगारयुक्त स्त्रिया येऊन उभ्या राहिल्या. तुह्मीं कोण आहांत ह्मणून ज्ञानेश्वरानीं त्यांस विचारलें. त्यांतून कोणे एके स्त्रीनें मी कृष्णा, मी भामा, मी भागीरथी, मी यमुना, असें त्या सर्वांनीं सांगितलें. तीं नांवें ऐकून ज्ञानेश्वरास अशी शंका उत्पन्न झाली कीं, गंगा, यमुना, ह्मणून जीं तीर्थें ह्मणतात तीं तर स्त्रियांच्या रूपानें आली नसतीलना? असें मनांत आणन त्यांस प्रश्न करितात कीं, बायानो! तुह्मीं कोण आहांत? त्यांनीं उत्तर दिलें कीं, गंगा, यमुना, भागीरथी आदिकरून जीं तीर्थें ह्मणतात तींच आह्मीं आहोंत. हें त्यांचें भाषण ऐकन ज्ञानेश्वरास परम आनंद झाला. ज्ञानेश्वरांनीं त्या सर्वांस साष्टांग नमस्कार करून असा प्रश्न केला कीं, आज आपलें आगमन इकडे कोणीकडे? त्यांनीं उत्तर दिलें कीं, कलियुगाचीं चार हजार वर्षें झालीं. ह्या चार हजार वर्षांत जनानीं स्नानें करून आपल्या पातकांचा त्याग आमच्याठायीं केल्यामुळें त्या पापाचा भार इतका झाला आहे कीं, तो आमच्यानें आतां सहन करवत नाहीं. तरी आपणास आमची इतकी विनंती आहे कीं, आपण एकवार येऊन आमच्या जळांत आपलें स्नान झालें म्हणजे आह्मीं जनांच्या पातकापासून मुक्त होऊं, किंबहुना त्वत्सदृश साधूंच्या स्नानानें आमचेही देह पावन होतील. इतकें भाषण करून त्या सर्व स्त्रिया गुप्त झाल्यानंतर ज्ञानेश्वरही जागे झाले; आणि विचार करितात कीं, काय हें चमत्कारिक स्वप्न! याचा अर्थ तरी काय असावा बरें? ह्या स्वप्नावरून तर मला असें वाटतें कीं, सर्व तीर्थें मला बोलावीत आहेत व मलाही जावें असें वाटतें. मग ज्ञानेश्वरानीं तें स्वप्न निवृत्ति, सोपान, आणि मुक्ताबाई ह्या तिघांस निवेदन केलें. तें स्वप्न ऐकून निवृत्तिनाथास मागील वृत्तांताची आठवण झाली; आणि म्हणाले कीं, खरोखरीच आपण तीर्थयात्रेस गेले पाहिजे; कारण मागें ज्या वेळेस मी त्र्यंबकेश्वरीं श्रीगुरू गैनीनाथांच्या आश्रमीं गेलों होतों; त्या वेळेस तेथें श्रीदत्त महाराज, मत्स्येंद्रनाथ आणि गोरक्षनाथ यांचें दर्शन झालें तें वृत्त मी तुला कथन केलेंच आहे. ज्या वेळेस ते त्रिवर्ग

जावयास निघाले, त्या वेळेस मी त्यांना अशी विनंती केली कीं, महाराज पुनरपि आपल्या दर्शनाचा योग केव्हां येईल ? त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, तुझा बंधु तीर्थयात्रेस जाईल त्याजबरोबर तुह्मी आला ह्मणजे मणिकर्णिकेच्या घाटावर आमचें दर्शन होईल. मला असें वाटतें कीं, त्यांच्या भाषणाचा आणि या स्वप्नाचा चांगला मेळ जमतो. तरी आपण सर्वच जाऊं. तें ऐकून ज्ञानेश्वरास फारच आनंद झाला. नंतर सर्वांनीं तीर्थयात्रेस निघण्याचा निश्चय केला. ज्ञानेश्वरानीं मनांत असा विचार केला कीं, आपण यात्रेस जाणार खरें, परंतु आपल्या बरोबर कोणी तरी भगवद्गुणानुवाद करणारा प्रेमळ पुरुष सोबतीस असला ह्मणजे मार्ग क्रमण करीत असतां कालक्षेप चांगला होईल. परंतु कोण असा मिळेल या विचारांत असतां इतक्यांत पंढरपुरांत वास करणारा जो नामदेव त्याचें स्मरण झालें. ज्ञानेश्वरानीं नामदेवाची प्रेमळपणाविषयीं पूर्वींच कीर्ति ऐकलीच होती व यांची आणि त्याची पूर्वीं भेटही झाली होती. असो; त्यानीं नामदेवास बरोबर घेण्याविषयीं उत्पन्न झालेला हेतु निवृत्तिनाथास निवेदन केला. त्या विषयीं निवृत्तिनाथाचें अनुमोदन मिळाल्यानंतर त्या सर्वांनीं एके दिवशीं सुमुहूर्त पाहून निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर, सोपानदेव आणि मुक्ताबाई सर्व मिळून श्रीविठ्ठलाचें स्मरण करून तीर्थयात्रेस जाण्याच्या हतूनें घरांतून बाहेर पडले. निवृत्ति ज्ञानेश्वरादि करून सर्व तीर्थयात्रेस जात आहेत हें वर्तमान ग्रामस्थ लोकांस कळतांच त्यांच्यामध्यें जे लोक ज्ञानेश्वराच्या मतानुवर्ती होते, व जे ज्ञानेश्वरास परम साधु, ईश्वर अंश, अशा पूज्य भावनेनें मानीत होते, ते सर्व त्यांच्याबरोबर यात्रेस निघण्यास तयार झाले. निवृत्ति, ज्ञानेश्वर प्रभृति कांहीं ग्रामस्थ मंडळी बरोबर घेऊन ज्या वेळेस निघाले त्या वेळेस आळंदीतील लोकांनीं त्यांचा चांगला सत्कार करून लवकर परत येण्याविषयीं विज्ञप्ति ही केली. असो, ती सर्व मंडळी मार्ग क्रमण करीत असतां मध्येंच चाकण मुक्कामीं महिपतराव या नांवाचा जहागीरदार रहात होता. त्याची ज्ञानेश्वराचे ठायीं अत्यंत पूज्य बुद्धि होती. निवृत्ति ज्ञानेश्वरादिक मंडळी तीर्थयात्रेस जात आहेत हें ऐकून त्यानें मोठ्या आग्रहानें एक दिवसपर्यंत त्या सर्वांस राहून घेतलें. त्या दिवशीं

त्यांचा भोजन समारंभ त्यानें अति उत्तम केला. निवते वेळेस महिपतरावानें ज्ञानेश्वरांची अशी विनंती केली कीं, माझी कन्या सीताबाई ही कऱ्हाडचे रामराजास दिली आहे. तिचा हेतु आपले चरणीं फार आहे. आपण यात्रेस जात आहां, तर जातांना स्मरण धरून तिला भेटून जावें, ही माझी आपणास विनय पूर्वक प्रार्थना आहे. ती महिपतरावाची गोष्ट निवृत्ति ज्ञानेश्वरादिकांनीं मान्य करून ते सर्व तेथून निघाले. तो मार्गक्रमण करीत करीत कांहीं दिवसांनीं पंढरपुरीं येऊन पोंहचले. प्रथम ते नामदेवाच्या घरीं गेले. त्या सर्वांस पाहून नामदेवास अति आनंद झाला. त्यानें निवृत्ति ज्ञानेश्वरादि करून मंडळींस बसावयास दिलें व एकमेकांच्या भेटी झाल्या नंतर नामदेवानें त्यांना मध्येंच आपलें आगमन इकडे होण्याचें कारण काय? असें विचारलें. ज्ञानेश्वरानीं नामदेवास तीर्थांचा दृष्टांत झाल्यापासून एकंदर वृत्तांत सांगितला; आणि तूंही आमच्या बरोबर असावें असेंही त्यास कळविलें. नामदेवाची श्रीविठ्ठलचरणारविंदीं एकनिष्ठ भक्ति असल्या कारणानें त्यास ही गोष्ट पसंत झाली नाहीं. परंतु काय उपाय, त्यास ज्ञानेश्वरापुढें बोलतां येईना. नामदेवानें असें उत्तर दिलें कीं, महाराज, माझीं सर्व तीर्थें विठ्ठलचरणीं वास करितात. ज्या विठ्ठलास मी काया, वाचा, मनेंकरून विकलों आहे, त्याचीच जर आज्ञा होईल तर मी आपणाबरोबर येईन. मग निवृत्ति ज्ञानेश्वरादिकरून मंडळी नामदेवास बरोबर घेऊन श्रीविठ्ठलाचें दर्शनास गेले. श्रीविठ्ठलास सर्वांनीं साष्टांग प्रणिपात करून ज्ञानेश्वरानीं त्यांना तीर्थयात्रेस जाण्याचा व नामदेवास बरोबर नेण्याचाही हेतु दर्शविला. श्रीविठ्ठलानीं हास्यवदन करून ज्ञानेश्वरास विचारलें कीं, ज्ञानेश्वरा तूं सर्व तीर्थांचा तीर्थरूप असतां तुला तीर्थयात्रेस जाणें युक्त नव्हें; ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं, महाराज, पुरूष जीवनमुक्तज्ञानी जरी झाले तरी त्यांनीं जगदीश्वराची उपासना, भजन व तीर्थयात्रा इत्यादि कधींही सोडूं नये. नंतर श्रीविठ्ठलानीं मोठ्या हर्षानें नामदेवाकडे पाहून भाषण केलें कीं, नाम्या, आज तुझें केवढें भाग्य! कीं, प्रत्यक्ष परब्रह्मस्वरूप जो ज्ञानेश्वर तो तुझ्या समागमाची इच्छा करीत आहे. अरे! सर्व तपाचें, योगाचें व सर्व साधनाचें हेंच फळ आहे कीं ज्ञानेश्वर

सद्दश साधूचा समागम व्हावा; तो आज तुला अनायासें होत आहे, म्हणून तुझ्या सारखा भाग्यवान् या ब्रह्मांडांत कोणीही नसेल. आतां तूं यांचे बरोबर तीर्थयात्रेस जाऊन लवकरच परत ये. अरे, असा योग पुनरपि यावयाचा नाहीं. असें श्रीविठ्ठलाचें भाषण ऐकून नामदेवानें तीर्थयात्रेस जावयाचा निश्चय केला. तीन दिवसपर्यंत निवृत्ति ज्ञानेश्वरादिक मंडळी पंढरपुरीं राहून चवथे दिवशीं प्रातःकालीं नामदेवास बरोबर घेऊन निघाली. श्रीविठ्ठल ही निवृत्ति ज्ञानेश्वरादिकांची व नामदेवाची बोळवण करण्याकरितां आले. पुंडलिकास नमस्कार करून चंद्रभागेच्या पैलतीरीं आल्यावर श्रीविठ्ठलास पाहून नामदेवाचा कंठ सद्गदित झाला. नेत्रांतून आश्रू गाळीत म्हणाला कीं विठोबा, आज तुमच्या चरणाचा वियोग होणारना ! मला तुमच्यावांचून क्षणभरही चैन पडावयाचें नाहीं. अहो ! तुम्हाला या नाम्याचा कंटाळा आला कीं काय ? तीर्थयात्रेस जाऊन तरी मला काय करावयाचें आहे; कारण, मला सर्व तीर्थांचें माहेर आपणच आहांत. हें नामदेवाचें भाषण ऐकून श्रीविठ्ठलास ही फार वाईट वाटलें, श्रीविठ्ठलाच्या नेत्रांतून अस्खलित आश्रूधारा वाहूं लागल्या आणि ज्ञानेश्वरास ह्मणाले कीं ज्ञानेश्वरा ! तुझ्या भिडेस्तव आज मी नामदेवास तीर्थयात्रेस पाठवितों. अरे, मला नाम्या सारखा प्रेमळ भक्त पुन्हा मिळावयाचा नाहीं; व याची माझ्याठायीं मोठी एकनिष्ट भावना फार आहे. नाम्या हें एक माझें वृद्धपणचें एकुलतें एक आवडतें लेंकरूंच होय असें बोलून नामदेवाचा हात ज्ञानेश्वराच्या हातांत घालून पुन्हा म्हणाले कीं ज्ञानेश्वरा, मी आतां परत जातो; परंतु माझ्या आवडत्या नाम्यास फारफार जपत जाहो ! हा फार अज्ञान आहे. आतां सर्वस्वी याचा सांभाळ करणारे आईबाप तुम्हींच आहांत. असें सांगून श्रीविठ्ठल परत जाते झाले. निवृत्ति ज्ञानेश्वर नामदेवादि मंडळी पंढरपुरांतून निघाली. विठ्ठलनामाचा गजर करीत करीत मार्गक्रमण करीत आहेत तों इतक्यांत ज्ञानेश्वरास महिपतरावाच्या भाषणाचें स्मरण झालें. मग ज्ञानेश्वरानीं निवृत्तिनाथास कऱ्हाडास जाण्याविषयीं सूचऊन ती सर्व मंडळी कऱ्हाडचा मार्ग क्रमण करूं लागली. निवृत्ति ज्ञानेश्वर नामदेवादिक महायात्रेस जात आहेत, हें ऐकून पंढरपुरांतील चोखामेळा व आरण-

डींतील सावतामाळी इत्यादि कांहीं मंडळी निवृत्ति ज्ञानेश्वरांच्या बरो बर यात्रेस जावयास निघाली. ते सर्व मार्गक्रमण करीत करीत कऱ्हाडाजवळ दोन कोसांवर येऊन पोहचले. इतक्यांत त्या गांवांत रहाणारा एक वृद्ध ब्राह्मण गांवांतून बाहेर येत होता त्यानें ही साधु मंडळी महा तेजःपुंज पाहून ह्या सर्वांस नमस्कार करून विचारलें, कीं, महाराज, आपण कोठें जात आहां? ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं, ह्या आह्मी कऱ्हाड गांवींच जात आहों. तो ब्राह्मण ह्मणाला कीं, आपलें येथें काय काम आहे? ज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं, चाकण गांवच्या महिपत रावाची कन्या ह्या गांवच्या राजास दिली आहे तर तिला भेटावयाचे आहे. ब्राह्मण म्हणाला महाराज आपणास माझी विनंती इतकीच आहे कीं आपण ह्या गांवाचा रामराजा म्हणजे चाकणच्या महिपतरावाचा जावाई ह्यानें आलाकडे साधुंचा फार द्वेष मांडला आहे, तो असा कीं, कपाळी गोपीचंदन लावलेला, कंठीं तुळसीकाष्ठ माला धारण केलेला व हातांत पताक घेतलेला अशा साधूस अवलोकन केलें असतां त्याला तत्काल देहांत शासन करावें, असें त्यानें आपल्या सर्व सेवकांस हुकूम दिला आहे. हें ऐकून ज्ञानेश्वरानीं असें विचारलें कीं, राजास इतका साधुंचा द्वेष करण्यास काय कारण असावें बरें? वृद्ध ब्राम्हण म्हणाला महाराज! याचें कारण असें आहें कीं, आमच्या बाईसाहेब सीताबाई ह्या महा साध्वी व सदाचर संपन्न आहेत. यांना सत्समागम करून आत्मचर्चा करावी अशी फार आवड आहे. बाईसाहेबानीं राजाची निरंतर अशी प्रार्थना करावी कीं, अहो मनुष्यानें जन्मास येऊन कांहीं तरी जगदीश्वराची उपासना व सत्समागम करावा आणि आपल्या देहाचें सार्थक करावें, त्या योगानें तर जन्मास आल्याचें साफल्य. माझ्या बापाच्या घरीं सत्समागम होत असे व त्याच्याच आशीर्वादेकरून, मला आपल्या सारखा रूपसंपन्न भर्ता, व पांच वर्षांचा सुंदर पुत्र; व या सर्व राज्याचा उपभोग प्राप्त झाला आहे त्यांत तुह्मीही कांहीं तो मार्ग स्वीकाराल तर मी आपल्यास संसारांत मोठे धन्य मानीन. महाराज, त्या प्रार्थनेनें त्याचें मन सत्संगतीविषयीं फार उत्सुक झालें. परंतु चार लोकांनीं त्याचे मनांत असें भरवून दिलें कीं साधू मोठे ढोंगी असतात. ते कांहीं तरी गप्पा मारून

बाधकांस फितवितात. त्यावरून त्यानें आपल्या राज्यांत
दुःखप्रद हुकूम फर्माविला आहे. वृद्ध ब्राम्हणापासून तें सर्व वर्तमान
ऐकून नामदेवादिक मंडळी फारच घाबरली. ज्ञानेश्वरानीं त्या ब्राह्मणास सांगितलें कीं असें असेल तर आह्मांस गांवांत येऊन तरी काय करावयाचें आहे ? बरें आह्मीं येथेंच वास करितों. परंतु आपण गांवांत जाऊन राजाचा कुटुंबास असें सांगावें कीं अळंदीचे ज्ञानेश्वर येथें आले आहेत. तो ब्राह्मण फार भावीक व विश्वासूक असल्यामुळें त्यानें त्याप्रमाणें राजपत्नीस कळविलें. तें ऐकून तिला जो आनंद झाला तो वर्णन करितां येत नाहीं. मग तिनें त्या ब्राह्मणास, आज रात्रौ मजबरोबर ज्या ठिकाणीं ज्ञानेश्वर उतरले आहेत तें ठिकाण दाखविण्याकारितां आले पाहिजे, असें सांगितलें, आणि त्याच रात्रीं तिचा पती रामराजा व इतर सर्व मनुष्यें निद्रिस्त झालेलीं पाहून आपल्या बरोबर एक दासी, ता ब्राह्मण आणि मशालजी घेऊन निघाली तों ती ज्या ठिकाणीं ज्ञानेश्वरादि संत मंडळी उतरली होती तेथें आली त्या वेळेस नामदेव कीर्तनास उभे राहिले होते. ज्ञानेश्वरादिक मंडळी कीर्तन श्रवण करण्यास बसली होती; त्या कीर्तनांत साधुसंतांच्या मुखीं अन्नाचें एक शीत पडलें असतां महत्पुण्य होतें असें नामदेवानें कथन केलें. तें ऐकून सीताबाईला मोठा आनंद झाला. ह्या सर्व संतमंडळींस आपल्या येथें उदयीक भोजनास बोलवावें असें तिच्या मनांत येऊन तिनें लागलेंच ज्ञानेश्वराच्या चरणीं नमस्कार करून भाषण केलें कीं, महाराज, उदयीक सर्व मंडळींनीं माझ्या घरीं भोजनास यावें. ज्ञानेश्वरानीं तिच्या मुखाकडे अवलोकन करून विचारलें कीं, बाई, आपण कोण आहांत ? मला तर महिपतरावाच्या कन्ये सारख्याच दिसतां ? तिनें उत्तर दिलें कीं, महाराज, मी महिपतरावाची कन्या ह्या गांवच्या राजाची स्त्री, आणि माझें नांव सीताबाई. तें ऐकून ज्ञानेश्वरास अति आनंद होऊन असें वाटलें कीं, आपण जिच्याकरितां आलों आहों तिची तर भेट झाली. आतां ही उदयीक सर्वांस भोजनास बोलावीत आहे तर कसें करावें; नंतर ज्ञानेश्वर ह्मणाले कीं, सीताबाई ! तुझ्या नवऱ्याची गांवांत साधुसंत न येण्याची जर सक्त ताकीद आहे तर उद्यां आह्मीं भोजनास कसें यावें ?

सीताबाईनें उत्तर दिलें कीं, त्याची काळजी आपणास कशास पाहिजे, त्याचा सर्व बंदोबस्त मी केला आहे. असें बोलून ती त्या ब्राम्हणास व दासीस घेऊन परत आपल्या घरीं आली. तिनें आपल्या मनांत असा विचार केला कीं, उद्यीक ज्ञानेश्वरादिक संत मंडळी ज्या योगा- नें राजाचा संतोष राहून आपल्या घरीं भोजनास येतील असें कांहीं कृत्य केलें पाहिजे. नंतर तिनें आपल्या करांगुलीच्या अंगठींतील हिरकणी काढून तिचें चूर्ण केलें व तें चूर्ण पाण्यांत कालऊन तें पाणी आपल्या एकुलत्या एक मुलास जागें करून पाजिलें. त्या योगानें त्या मुलाच्या शरीरांत दहा झाला; त्याचा जीव फार कासावीस होत आहे असें पाहून तिनें आपल्या नवऱ्यास जागें केलें; आणि म्हणाली कीं, अहो ? हा फार घाबरल्यासारखे करीत आहे. ह्याच्या प्रकृतीस काय झालें हें कांहीं कळत नाहीं. वैद्यास तरी बोलवा. हें ऐकून राजा घाबरून उठला आणि त्यानें दूताकडून वैद्यास बोलावून आणिलें. वैद्य औषधी मात्रा घेऊन येतात, तों मुलगा मरण पावला. पुत्राचा मृत्यु अवलोकन करून ते उभयतां फार शोक करूं लागले. शोक करितां- ना तिनें असें भाषण केलें कीं, या वेळेस जर मी आपल्या बापाच्या घरीं असतें तर बापानें कोणी तरी साधु बोलावून आणून त्याजकडून या मुलास उठविलें असतें ! काय करूं ! मी आपणास वारंवार सत्स- मागमाविषयीं सांगत होतें; परंतु माझें न ऐकतां उलटा साधूंचा छल केला त्या घातकाच्या योगानें तर असा हा परिणाम झाला नसेलना ? अहो, अद्यापि तरी साधूचा शोध करा ? तें स्त्रीचें भाषण ऐकून राजास परम पश्चात्ताप होऊन तो अश्रु गाळीत म्हणाला कीं, स्त्रिये ! या वेळेस मी साधूस कोठें पाहूं ? व ते मला कसे भेटतील ? अहो, कोणी तरी मला साधूचा शोध सांगा. राजपुत्र मरण पावला, हें वर्तमान नग- रांत कळतांच राजवाड्यांत प्रधानादि करून बहुत लोक जमा झाले. त्यांत पूर्वोक्त वृद्ध ब्राह्मणही आला होता. त्यानें मला साधु कसे भेट- तील हे राजाचे शब्द ऐकतांच तो पुढें येऊन म्हणाला कीं, सरकार ! आपणास साधु जर पाहिजेत तर या वेळेस ज्ञानेश्वरादि कांहीं संत मंडळी आपल्या गांवाबाहेर उतरले आहेत. मर्जी असल्यास त्यांना घेऊन यावें. हें ऐकून राजास परम आनंद झाला, नंतर राजानें प्रधा-

नादि मंडळी बरोबर घेऊन ज्या स्थळीं ज्ञानेश्वर उतरले होते तेथें येऊन त्यांस साष्टांग प्रणिपात केला; आणि दीन वाणीनें म्हणाला, महाराज, आपण त्वरित आमचे घरीं येऊन आम्हास पवित्र करावें. राजास पाहून ज्ञानेश्वरास परम विस्मय वाटला कीं, हा राजा साधुंचा द्वेष्टा असून, आज मोठ्या नम्रतेनें माझ्या घरीं चलावें असें म्हणतो तस्मात् ह्याचें कारण काय बरें असावें! राजाची घरीं नेण्याविषयीं फार उत्कंठा पाहून ते सर्व मंडळीसह त्यांचे बरोबर निघून राजवाड्यांत येऊन पोहोंचले. ज्ञानेश्वरास पाहून सीताबाईस फार आनंद झाला. तिनें ज्ञानेश्वराची अर्घ्यपाद्यादिक पूजा करून हळूंच कर्णांत विनंती केली कीं, महराज! आपलें आगमन येथें व्हावें व साधुविषयीं ह्याचें अंतःकरण प्रीतियुक्त व्हावें म्हणून मी आपल्या मुलास मारिलें आहे. आतां याचा अभिमान धरणें आपणाकडे आहे. असें ऐकून ज्ञानेश्वर म्हणाले कीं, हें माझें चरणतीर्थ या पुत्राच्या मुखांत घातलें असतां श्रीविठ्ठल त्यास पुनरपि सजीव करतील. नंतर काय चमत्कार सांगावा कीं ज्ञानेश्वराचें चरणतीर्थ तिनें त्या पुत्राच्या मुखांत घालितांच तो पुत्र जिवंत होऊन उठून बसला. हें कृत्य पाहून सर्व नगरवासी जनास मोठा आनंद झाला. असो, त्या राजानें ज्ञानेश्वरादि मंडळीस मोठ्या आग्रहानें आपले घरीं तीन दिवस ठेऊन त्यांच्या भोजनाची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेविली. शेवटीं ज्ञानेश्वास अनन्यभावानें शरण जाऊन रामराजानें व सीताबाईनें त्यांचा उपदेश ग्रहण केला. त्या योगानें ते उभयतां कृतार्थ झाले. नंतर ज्ञानेश्वर नामदेवादि करून विठ्ठलनामाचा गजर करीत राजास विचारून कऱ्हाड प्रांतांतून निघाले. ते मार्ग उल्लंघन करीत असतां ज्या ठिकाणीं मुक्काम करीत त्या त्या ठिकाणीं नामदेवास कीर्तनास उभे करीत असत आणि त्या कीर्तनांत ज्ञानेश्वराची व नामदेवाची प्रश्नोत्तरेंही होत असत. याप्रमाणें दरकुच दरमजल करीत असतां ते तेर या नांवाचे गांवांत येऊन पोहचले. तेथें गोराकुंभार राहत असे. तो श्रीविठ्ठलाचा अत्यंत भक्त होता. ज्याचा श्रीविठ्ठल चरणीं इतका निश्चय होता कीं त्याच्या हातांनीं श्रीविठ्ठलाचें शपतेचें उल्लंघन केलें म्हणून त्यानें आपल्या हाताचे पंजेच तोडिले होते. त्या योगानें तो थोटा

झाला होता आणि हात नसल्यामुळें त्याचा व्यापार बंद झाला होता. हें वर्तमान श्रीविठ्ठलास कळतांच त्यानीं रुक्मिणीस व गरुडास बरोबर घेऊन कुंभाराच्या वेषानें गोराकुंभाराचे घरीं कांहीं दिवस वास्तव्य करून त्याचा प्रपंच चालविला. काय हा उपासनेचा परिपाक ? असो, त्या गोराकुंभाराचे घरीं सर्व संतमंडळी आल्यानंतर त्यानें सर्वांची अर्घ्यपाद्यादिक पूजा करून ज्ञानेश्वरास विचारिलें कीं, आपण सर्व संतमंडळीस घेऊन कोठें जात आहां. ज्ञानेश्वरानीं आह्मीं तीर्थयात्रेस जात आहों असें त्यास सांगितलें. त्या दिवशीं गोराकुंभारानें मोठ्या आनंदानें सर्वांच्या भोजनाची व्यवस्था ठेविली. त्याच रात्रीं नामदेव कीर्तनास उभे असतां विठ्ठलनामाचा गजर करतांना सर्वांनीं टाळी वाजवावी असें त्यानीं निरूपण केलें. गोराकुंभारानें असें विचारिलें कीं ज्याचे हात थोटे असतील त्यानें टाळी कशी वाजवावी ? नामदेवानें उत्तर केलें कीं तशाच थोट्या हातांनीं टाळी वाजविली असतां त्यास श्रीविठ्ठल कृपेनें हस्तकमल उत्पन्न होतील. नामदेवाचें वचनावर विश्वास ठेऊन गोऱ्याकुंभारानें तशीच टाळी वाजविली तों क्षणएक न लागतां ज्याप्रमाणें वृक्षास वसंतऋतु आला ह्मणजे कोमल पल्लव फुटतात त्याचप्रमाणें त्याचे हातांस पंजेरूप पल्लव फुटले. तसेंच गोऱ्याकुंभाराचा एक मुलगा, गोराकुंभार विठ्ठल नामस्मरण करीत असतां त्याच्या पायाखालीं मृत्तिकमध्यें तुडविला जाऊन मरण पावला होता. तो पुत्र जिवंत व्हावा ह्मणून गोऱ्याकुंभाराच्या स्त्रियांनीं नामदेवाची प्रार्थना केली. नामदेवानीं त्या स्त्रियांना असें सांगितलें कीं तुम्हीं त्या मुलाचें नांव घेऊन हांक मारिली असतां तो मुलगा पुनरपि जिवंत होईल. नामदेवाच्या सांगण्याप्रमाणें गोराकुंभाराच्या स्त्रियेनें आपल्या मुलास हांक मारल्या बरोबर तो पांच वर्षांचा मुलगा जिवंत होऊन मोठ्या त्वरेनें धांवत आला; आणि तिच्या मांडीवर येऊन बसला. हें पाहून सर्वांस अतिशय आनंद झाला. दुसरे दिवशीं सर्व संतमंडळी भोजन करून बसली असतां एका कोनाड्यांत त्या गोऱ्याकुंभाराची मडकीं करण्याचीं हत्यारें होतीं. हत्यारें पाहून मुक्ताबाई ह्मणाली कीं, कायरे गोऱ्या, तें लांबसें हत्यार इकडे आण बरें, त्यापासून तुह्मांस काय उपयोग असतो ? नंतर तो गोराकुंभार तें थापटणें घेऊन आला, आणि

म्हणाला कीं ह्या हत्याराचा इतकाच उपयोग आहे कीं, मडकीं कच्चीं किंवा पक्कीं आहेत हें सर्व कळतें. मुक्ताबाईनें असा प्रश्न केला कीं, गोऱ्या ही सर्व मनुष्यें ईश्वरनिर्मित मडकींच होत. हीं कच्चीं आहेत किंवा पक्कीं आहेत हें तुला कळेल काय? कळत असल्यास परिक्षा कर. असें मुक्ताबाईचें भाषण ऐकून गोऱ्याकुंभारानें तें थांपटणें हातीं घेऊन प्रथम निवृत्तिनाथाचे मस्तकीं मारिलें, आणि त्याचप्रमाणें इतर साधुच्या मस्तकावरही मारूं लागला. त्या सर्वांमध्यें नामदेव हा श्रीगुरुच्या उपदेशावांचून, व ब्रम्हाचें सर्व व्यापित्व, सर्वज्ञत्वादि ज्ञानावांचून कच्चा होता. त्यानें तें थापटणें मारण्यांचें कृत्य पाहून एकाएकीं उभा राहून ह्मणाला कीं, गोरोबा सर्वांच्या मस्तकावर थापटणें मारून जसे सर्व उगीच बसले तसा मी बसणारा नव्हें, म्हणून तूं मजकडे येऊं नको. इतकीं अक्षरें ऐकतांच गोराकुंभार ह्मणाला कीं, अहो, सर्व संतमंडळी हो, हा नामदेव श्रीगुरू कृपेवाचून कच्चा आहे. सर्व मडक्यांमध्यें येवढेंच मडकें मात्र कच्चें लागलें बाकीं सर्व पक्कीं आहेत. हें ऐकून सर्व संतमंडळी हसूं लागली. त्या योगानें नामदेवास फार दुःख झालें. पहा? अपमान दुःख सहन करणें फार कठीण आहे. नंतर ज्ञानेश्वरानीं नामदेवाचें बहुत प्रकारें शांतवन केलें. नंतर हें वृत्त पंढरपुरांत जाऊन श्रीविठ्ठलास कळविल्यावाचून ह्याचा परिहार व्हावयाचा नाहीं असें मनांत आणून नामदेव उगीच बसला. असो, तीन दिवस गोराकुंभाराचे घरीं राहून चौथे दिवशीं निवृत्ति ज्ञानेश्वर नामदेवादि करून सर्व संतमंडळी निघाली. त्यांच्या बरोबर गोराकुंभार ही आपल्या दोन कुटुंबास घेऊन यात्रेस निघाला. ते सर्व मार्गक्रमण करीत असतां कांहीं दिवसांनीं अवंढ्यानागनाथीं येऊन पोहोंचले. ज्या दिवशीं आले त्या दिवशीं शिवरात्र होती, सर्वांनीं उपवास करून रात्रौ जागर व्हावा म्हणून महादेवाचे देवालयांत नामदेवास कीर्तनास उभे केले. ती ब्राम्हणाची सोंवळ्यांत अभिषेक करण्याची वेळ होती. नामदेवाच्या कीर्तनांत शूद्रादिक मंडळी बहुत असल्यामुळें ब्राह्मणांस सोवळ्यानें जाण्याची अडचण होऊं लागली. नंतर ग्रामस्थ ब्राह्मणांनीं नामदेवास देवालयाच्यामार्गें कीर्तन करण्यास सांगितलें. आपल्यापासून दुसऱ्याला त्रास

होऊं नये ह्मणून नामदेव ज्ञानेश्वरादि मंडळी महादेवाच्या पाठीमागें जाऊन, नामदेव तेथें पुनरपि पहिल्याप्रमाणें कीर्तन करूं लागला. कीर्तन करितांना वक्त्याचें लक्ष्य अग्रभागीं देवतेवर असावें अशी रीतिच आहे त्याप्रमाणें नामदेव ज्या ज्या वेळेस अग्रभागीं पहात असे त्या त्या वेळेस त्यास पुढें भिंत दृष्टीस पडे. हें पाहून नामदेवास मोठें वाईट वाटलें. नंतर, काय त्या पुरुषाची उपासना ! कीं, ज्याचें कीर्तन श्रवण करण्याकरितां महादेवानीं नंदीस पाठीमागें टाकून आपण नामदेवाकडे मुख केलें. कांहीं वेळानें ब्राम्हण मंडळींचे अभिषेक समाप्त झाल्यानंतर ते सर्व बाहेर येऊन पहातात, तों नामदेव कीर्तनास पुढेंच उभा आहे. हें पाहून सर्व ब्राम्हण क्रोधयुक्त होऊन ह्मणाले कीं, या संताड्यानें आतां तर कमाल केली. ह्यास मागें उभा रहा म्हणून सांगितलें असतां हा मागें न जातां येथेंच उभा राहिला आहे. असें बोलून ब्राह्मण देवास प्रदक्षिणा करितात तों देवामागें नंदिकेश्वर अवलोकन केला. हें पाहून, हा नंदी महादेवावर रुसून इकडे मागें कोणीकडे आला ? असें ते परस्पर बोलूं लागले. नंतर त्यांपैकीं एका वृद्ध ब्राम्हणानें त्या सर्वांस सांगितलें कीं तुम्हीं त्या संत मंडळीस मागें कीर्तन करावयास सांगितलें त्याप्रमाणें ते मागें कीर्तन करीत होते, हे मी प्रत्यक्ष अवलोकन केलें. पहा ? काय चमत्कार सांगावा ! त्यांचें कीर्तन श्रवण करण्याकरितां महादेवानें तुमच्या अभिषेकाचें प्रेम एकीकडे ठेऊन आपलें मुख कीर्तनाकडे केलें असावें असें मला वाटतें. नंतर सर्वांस ती गोष्ट सत्य वाटून व त्या सर्वांस पश्चाताप होऊन ते सर्व ज्ञानेश्वर नामदेवादिकांस शरण गेले. तो नंदिकेश्वर अद्यापि देवाच्या पृष्टभागींच आहे. या नामदेव ज्ञानेश्वराच्या गोष्टीवरून, असें स्पष्ट दिसतें कीं अलिकडच्या टिळा टोपी माळा घालून शिवरात्रीच्या दिवशीं तांबूल भक्षण करणाऱ्या ढोंगी वैष्णवाप्रमाणें त्या वेळेस ते अद्वयानंद स्वरूपी निमग्न झालेले वैष्णव शिवाचा द्वेष करीत नसत. दुसरे दिवशीं शिवरात्रीचें पारणे करून ते सर्व तेथून निघाले; ते मोठ्या हर्षानें मार्ग उल्लंघन करीत करीत कांहीं दिवसांनीं सातपुड्यांतील अरण्यांत येऊन पोहोंचले. तेथें हरिपाल या नांवाचा एक व्याध रहात होता. तो श्रीविठ्ठलाचा मोठा भक्त असे.

प्रत्येक आषाढमासीं तो पंढरपुरास श्रीविठ्ठलाचे वारीस जात असे. तो आपलें व्याध कर्म करीत असून त्याचा इतका नियम होता कीं, ज्या पुरुषांस श्रीविठ्ठलदैवत माहित नाहीं व जो श्रीविठ्ठलाचें नामस्मरण कधींही करीत नाहीं त्या पुरुषाचें त्यानें द्रव्य हरण करावें. असो; तो नित्य नियमाप्रमाणें एकाटेकडीवर हातांमध्यें धनुष्यबाण धारण करून व कमरेला एक लहानशी तरवार लावून उभा राहिला आहे तों इतक्यांत निवृत्ति, ज्ञानदेव, नामदेवादि करून मंडळी त्या अरण्यांत प्राप्त झाली त्या सर्वांस पाहून हरिपालास आनंद झाला. आज आपणास बरीच शिकार सांपडली आहे असें मनांत आणून तो टेकडीवरून खालीं उतरला आणि जवळ येतो तों सर्वांचा श्रीविठ्ठल नामस्मरणाचा गजर एक सारखा चालला आहे हें ऐकून हे कोणी तरी भगवद्भक्त आहेत असें त्यांस वाटलें. नंतर तो जवळ येऊन सर्वांस साष्टांग नमस्कार करून मोठ्या नम्र वाणीन ह्मणाला कीं, महाराज आपण कोण आहांत, आपलीं नांवें काय ? व आपण कोठे जात आहां, हें सर्व निवेदन करावें. हें ऐकून ज्ञानेश्वरानीं ह्या देहाला ज्ञानेश्वर, हे श्रीगुरु निवृत्तिनाथ, हा पंढरपुरांतील नामदेव याप्रमाणें सर्वांचीं नांवे कथन केलीं, आणि आह्मीं तीर्थयात्रेस जात आहों हेंही सांगितलें. हरिपाल प्रत्येक आषाढीला पंढरपुरास जात असल्या कारणानें त्यास ज्ञानेश्वर नामदेव ह्यांची साधुपणाविषयीं कीर्ति माहित होती आणि तेच हे सत्पुरुष आले आहेत, हें पाहून तर फारच अल्हाद झाला. नंतर त्यानें मोठ्या आग्रहानें त्या सर्वांस आपल्या घरीं नेलें. त्यानें सर्वांचा अर्घ्यपाद्यादि पूजा करून असें भाषण केलें कीं, महाराज, डर्वत्रांनीं आज या पामराच्या घरीं भोजन करावें ही माझी सर्वांस विनंती आहे. ती गोष्ट सर्वांनीं मान्य केल्यानंतर हरिपाल घरांत येऊन पहातो तों, धान्याचा एक दाणाही नाहीं, हें पाहून त्यास मोठें वाईट वाटलें. मग कोणा तरी पुरुषाचें द्रव्य हरण करून आणावें, आणि या सत्पुरूषांना भोजनास घालावें, असा त्यानें विचार करून पूर्ववत् धनुष्यबाण हातामध्यें घेऊन द्रव्य हरण करण्याकरितां वाटसरूं लोकांची मार्गप्रतिक्षा करीत टेंकडीवर जाऊन उभा राहिला. त्या दिवशीं असा चमत्कार झाला कीं, तीन प्रहरपर्यंत त्या

मार्गानें कोणीही वाटसरू आला नाहीं हें पाहून त्यास फार दुःख झालें; आणि नेत्रांतून आश्रु झाळीत म्हणाला कीं नारायणा! आज माझ्या घरीं निवृत्ति ज्ञानदेवासारखे सत्पुरुष आले असतां ते भोजन न करितां परत जातीलना धिःकार असो. अहो अशा सत्पुरुषास भोजन घालावें असें तरी माझ्या पदरीं पाहिजेना. ज्याअर्थीं ह्या वेळे-पर्यंत आज मला कोणीही मार्गस्थ लोक भेटत नाहींत त्याअर्थीं परत जाऊन वैष्णवास काय मुख दाखवावें ? जगदीश्वरा! यापेक्षां मृत्यु बरा! आतां हाच तीर आपल्या हृदयांत मारून घेतों. असें बोलून तो तीर आपल्याकडे उरफाटा लावला. चमत्कार काय सांगावा कीं हरिपालाची वैष्णवाविषयीं खरी मनीषा पाहून दीनवत्सल प्रभूनीं एक उत्तररथ त-यार करून रुक्मिणीच्या आंगावर कोट्यावधि रुपयांचे दागीने घालून तीस बरोबर घेतली; आणि रथाचा वडघडाट करीत ज्या अरण्यांत ह-रिपाल होता तेथें आले. तो इतक्यांत हरिपालानें त्यांना अवलोकन केलें आणि मनांत म्हणतो कीं, कायहो आज माझें भाग्य धन्य! मी नारायणाचा महत् उपकारी आहे. त्या परमेश्वरास माझी करुणा येऊन त्यानें ही मला अपूर्व शिकार पाठविली; पण न जाणो तो भगवद्भक्त अस-ला तर काय करावयाचें आहे. बरें, विचारून पहावें, नंतर त्यान धनुष्य-बाण हातांमध्यें घेऊन त्या टेंकडीवरून खालीं उतरून प्रभूचा रथ थोपू-न धरिला: आणि ह्मणतो कीं, अहो गृहस्थ ! तुह्मी कोण आहा ? व तुमचें नांव काय ? हें ऐकतांच प्रभूनीं रथ थांबवून उत्तर दिलें कीं, माझें नांव जगत्पाल शेटजी व ही स्त्री जवळ असलेली माझी आहे. हरिपाल ह्मणतो कीं अहो ! तुह्मी कधीं पंढरपुरास जाऊन श्रीविठ्ठलास नमस्कार केला होता काय ? विठ्ठलाचें नामस्मरण करीत असतां काय ? करीत असल्यास सांगा. आपले ठिकाणीं याचा निश्चय किती आहे हें पहाण्याकरितां श्रीविठ्ठलानीं भाषण केलें कीं अरे आह्मास तुझें पंढर-पूर माहीत नाहीं आणि तुझा तो चोर जार शिरोमणी विठोबाही आ-ह्मी पाहिला नाहीं. अरे, त्या दुष्ट देवाची उपासना तुझ्यासारख्या चोरानींच करावी. आह्मी तर त्या देवाचें मुखावलोकन ही करणार नाहीं. अशी आपल्या उपास्य दैवतेची निंदा ऐकून हरिपाल सक्रोध होऊन म्हणाला कीं, अहो चांडाळ आधीं तुम्हीं आपल्या अंगावरची

वस्त्रें भूषणें उतरून येथें ठेवा. आज तुमच्या मृत्युनेंच तुम्हांस ग्रासिलें आहे. असें बोलून हरिपालानें मोठ्या अवेशानें त्यांच्या रथावर चढून शेटजीस भूतलावर आणिलें; आणि वामहस्तानें प्रभूच्या मस्तकाचे कुटिल केश धरून दक्षिण हस्तांत मारण्याकरितां खडग् घेऊन म्हणतो कीं दुष्टा ! माझ्या विठोबाची निंदा करितोस ? पाहूं ! या वेळेस तुला कोणचा दुसरा देव सोडवावयास येईल तो !! हें पाहून रुक्मिणीच्या सर्वांगाचा कप झाला; आणि नेत्रांतून आश्रु गाळीत रथाखालीं उतरून म्हणाली कीं, अरे व्याधा ? तुझ्या मी पाया पडतें तूं आमच्या आंगावरची वस्त्रें भूषणें सर्व घे, परंतु आम्हास जिवंत सोड. असें करशील तर तूं माझा धर्माचा बाप होय, आणि मी तुझी कन्या होय, तर हें तुला कन्या दानाचें पुण्य लागेल, या योगानें श्रीविठ्ठल तुझें कल्याण करील. असें बोलूनही ऐकत नाहीं हें पाहून रुक्मिणीनें शेवटीं त्यास असें सांगितले कीं तूं जर आम्हाला मारशील तर तुला श्रीविठ्ठलाचीच शपथ आहे. असें ऐकतांच हरिपालानें शेटजीचे केश सोडून हातांतील शस्त्राचाही त्याग केला; आणि तुह्मी आज मृत्यु मुखांतून वांचला असें ह्मणून त्या उभयतांचीं वस्त्रेंभूषणें घेऊन मोठ्या आनंदानें तो आपल्या घरीं आला. इकडे श्रीविठ्ठलही अंतर्धान पावले. नंतर हरिपालानें त्या भूषणांपैकीं एक कंकण बाजारांत विकून त्या पैशाचें धान्य आणिलें. कांहीं वेळानें स्वयंपाक झाल्यावर सर्व संत मंडळीस यथास्थित भोजन घातलें. त्याच रात्रीं तुला इतका उशीर कां लागला ? असें हरिपालास ज्ञानेश्वरानीं विचारलें, आणि त्यानें जगत्पाल शेटजीचें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून ज्ञानेश्वरास असें खचितच वाटलें कीं, हरिपालाचे भक्तिकरितां प्रत्यक्ष श्रीविठ्ठल जगत्पाल शेटजीच्या रूपानें आलेअसावेत यांत कांहीं संशय नाहीं. असो; रात्रौ नामदेवाचें कीर्तन होऊन दुसरे दिवशीं सर्व संतमंडळी तेथून निघाली. त्यांच्याबरोबर हरिपालही यात्रेस निघाला. ते सर्व कांहीं दिवसांनीं सातपुड्यापलीकडे धारेस येऊन पोहोंचले. तेथें कमळाकर भट या नांवाचा ऋग्वेदी ब्राम्हण रहात होता. त्याचें घरीं ज्ञानेश्वरादिक भोजनास गेले असतां त्याचा गोपाळा या नांवाचा सात वर्षांचा मुलगा सर्प दंश होऊन मरण पावला. हें वृत्त ज्ञानेश्वरानीं अंतर्ज्ञा-

नानें जाणून त्या मुलास जिवंत केलें. दोन दिवस तेथें वास्तव्य करून कमळाकरभटजीस बरोबर घेऊन तेथून निघाले. निवृत्ति ज्ञानेश्वरादिक मार्ग क्रमण करीत उज्जनीस आले. तेथें उज्जनीच्या राजाजवळ एक वीरमंगळ या नांवाचा जोशी होता. तो न्याय व्याकर्णादि चार शास्त्रामध्यें मोठा प्रवीण असून त्यांत ज्योतिष शास्त्रामध्यें तर फारच निपूण होता. तो आश्रित होता ह्मणून ज्योतिष व इतर शास्त्रांच्या संबंधानें उज्जनीचा राजा त्यास पगार देत असे. राजाश्रय असल्यामुळें त्यास लोकही फार मानीत असत. एके दिवशीं उज्जनीचा अधिपति आपले समागमे कांहीं सेना घेऊन अरण्यांत जाऊन मृगया करावी या हेतूनें जों निघाला तों आपल्या नगराच्या ग्रामद्वाराबाहेर आला. इतक्यांत त्याच रस्त्यानें एक अति रूपवती नवयौवन संपन्न रजक स्त्री येत होती. त्या दिवशीं तिला ऋतुप्राप्तीचा चतुर्थ दिवस होता. तिचें तें अति लावण्य रूप अवलोकन करून राजाची वासना त्या स्त्रीचे ठायीं गेली. ही स्त्री आपणास उपभोगास योग्य आहे, असें मनांत आणून त्यानें ही कोणाची आहे व ही कोण जातीची आहे याचा शोध करण्यास आपल्या सेवकास सांगितलें. सेवकानें ती राजाज्ञा मान्य करून त्या स्त्रीस तुझी जाती कोण? असें विचारतांच तिनें त्या सेवकास सांगितलें कीं, मी जातीची परटीण आहे. हें ऐकून सेवकानें परत येऊन तें वर्तमान राजास कळविलें. ती रजक स्त्री आहे हें सेवकाच्या मुखानें ऐकतांच राजास परम पश्चात्ताप झाला; आणि मनांत ह्मणतो कीं, शिव शिव! मला आज रजक स्त्रीच्या उपभोगाची वासना झाली हें कांहीं चांगलें नव्हे; त्यापेक्षां आज मृगया करणेंच नको, असें राजाचें अंतःकरण सखेद होऊन तो मृगयेस न जातां पुनरपि परत आपले घरीं आला; आणि मंगल स्नान करून वीरमंगळ जोशीबावास बोलावून आणून विचारलें कीं, जोशीबावा, आजपर्यंत तुह्मी माझे आश्रित ह्मणवितां आणि ज्या तुमच्या ज्योतिष विद्येकरितां माझा पगार तुह्मास चालू आहे त्याची परीक्षा मला आज घेणें आहे; ती अशी कीं, मी मृगयेला जातांना माझें मनांत काय आलें होतें. आणि पुनरपि मी आपले घरीं परत कां आलों. याचें उत्तर तुह्मी मला आजपासून सातवे दिवशीं द्यावें, न दिल्यास तुह्मास तोफे-

च्या तोंडीं देईन, असा राजानें धाक घातला; त्या योगानें जोशीबावा तर फारच घाबरले. अधींच ब्राह्मण निर्बळ उंदरास भिणारे आणि त्यांत तोफेच्या तोंडी देण्याचा हुकूम मग त्या घाबरण्यास काय विचारावें ! असो; जोशीबावानें ज्योतिष शास्त्रामध्यें जितकी अक्कल खर्च करावयाची तितकी केली, परंतु राजाच्या मनांत निश्चयें करून अमुकच आलें होतें असें कसें कळेल ? तस्मात् राजा मला या जगतांत ठेवीत नाहीं; असा त्यानें आपल्या मनांत विचार करून आपलीं सर्व मुलें माणसें बोलावून त्यांची संसारसंबंधी कागदपत्र द्रव्यादिकें करून व्यवस्था केली; आणि आपण अहोरात्र काळजी करीत आहे कीं, आजचा दिवस गेला, पण उद्यां परमेश्वर संरक्षण करणार समर्थ आहे , त्या वांचून या जगतांत मला कोणीही त्राता नाहीं. असें चिंतन करून दुःख करीत आहे तों, पांचवे दिवशीं नदीवर स्नानाकरितां मार्गानें रुदन करीत जात असतां त्याची दुःखाची स्थिति एका ग्रामस्थ वेश्येनें अवलोकन करून दासाच्या हातून जोशीबावास आपल्या माडीवर पाचारिलें, आणि हात जोडून ह्मणते कीं, महाराज, जोशीबावा, तुह्मी महा विद्वान् असून राजाश्रित आहां, असें असतां तुह्मी महत् दुःख समुद्रामध्यें निमग्न होऊन अगदीं निस्तेज दिसतां; त्यापेक्षां असें आपल्यावर संकट तरी काय आलें आहे तें मला सांगा; भगवत् कृपेनें आपलें संकट निवारण होईल. हें ऐकून जोशीबावानें आपली सर्व हकीकत त्या वेश्येस निवेदन केली. ती ह्मणाली कीं महाराज, एवढ्यासाठींच कां इतकें दुःख ! यांत काय आहे ! मी तुम्हास सांगतें तुह्मी विनाकारण दुःख कां करितां ? माझ्या सांगण्याप्रमाणें आपण राजास उत्तर द्यावें. आपणास कांहीं एक भय न होतां उलटा राजा तुह्मांस शरण येईल क्षणमात्र बसावें. असें सांगून वेश्येनें योगमार्गानें त्या गोष्टीचा शोध करितां तिला तो राजाच्या मनांतील हेतु सर्व कळला; आणि डोळे उघडून जोशीबावास सांगितलें कीं, महाराज, आपण निःशंकपणें राजास असें सांगावें कीं, तूं मृगयेला जात असतां वेशीच्या बाहेर रजस्वला स्त्री येत होती तिच्या उपभोगाविषयीं तुमच्या मनांत वासना उत्पन्न झाली. परंतु सेवकाकडून तिची रजक जाती कळल्यावर तुह्मी मृगयेला न जातां आपलें घरीं परत आलांत. तें ऐकून जोशीबावानें असा विचार

केला कीं, न जाणो ! या वेश्येला कांहीं मनांतील ओळखण्याची विद्या येत असेल ! किंवा इला कांहीं ती वार्ता श्रुत असेल, आपण राजास प्रथम सांगून पहावें, परमेश्वरास माझी करुणा आली असल्यास इच्या वचनास नारायण यश देऊन मला या संकटांतून मुक्त करतील. वस्तुतः मी इला कोठें आपलें दुःख कळविण्यांस आलों होतों, ही सहज गोष्ठ घडून आली आहे तर परमेश्वरानें इच्या हृदयांत प्रवेश करून मला विचारविलें. असें मनांत आणून तो वीरमंगळ जोशी स्नानास न जातां तसाच राजवाड्यांत येऊन त्यानें राजास आशीर्वाद केला. राजानें जोशीबावास पाहून मनांत म्हणतो कीं, माझ्या मनांतील गोष्ट यांना कळली असावी, ह्मणूनच आज हे लवकर आले आहेत ! आणि यांचें मुखहीं प्रफुल्लित दिसत आहें. नंतर राजानें विचारिलें कीं जोशीबावा, मृगयेला जातांना माझे मनांत काय होतें हें सांगताना? त्यावेळेस राजाजवळ कांहीं मुत्सद्दी मंडळी बसली होती त्यांस पाहून जोशीबावा म्हणाले कीं, राजन् ! आपल्या मनांतील वृत्त एकांतीं सांगू किंवा चार-मंडळींत सांगूं. हें ऐकतांच राजा मनांत चकीत झाला आणि यांना माझ्या मनांतील हेतु कळला असावा. कायहो हें ज्योतिष विद्येचें सामर्थ्य ! परंतु मोहगम विचारावें हें बरें दिसतें. असें मनांत आणून म्हणतो कीं, जोशीबावा कांहीं थोडा हेतु तर सुचवा; असें ह्मणोन जोशीबावा म्हणाले राजन् आपण मृगयेला जात असतां नगराच्या वेशीबाहेर जी स्त्री अवलोकन केली ती कोण जातीची होती ? हें ऐकून राजा म्हणाला कीं, पुरें आतां पुढें बोलूं नका. तुह्मी माझे मनांतील अभिप्राय ओळखला खरा. वहावा ! याचें नांव ज्योतिष विद्या. असें बोलून राजानें जोशीबावास भरजरीचा पोषाक व रत्नजडित दागीने देऊन परम संतुष्ट केलें आणि मोठ्या समारंभानें त्यांना त्यांचें घरीं मंगलवाद्यें वाजवीत नेऊन पोहचविलें. घरीं आल्यानंतर जोशीबावास अत्यंत पश्चात्ताप झाला. त्यानें असा विचार केला कीं, या जगतांत परवश रहाणें हा जिवंत नरक होय. असो. परंतु काय हें अश्चर्य ! राजाचें मनोगत त्या वेश्येस कसें कळलें ? बरें विचारून पाहूं. असें मनांत आणून जोशीबावानें वेश्येच्या घरीं येऊन नम्रतेनें विचारिलें कीं, हें मनांतील वर्तमान तुला कसें कळलें, तें सांग. वेश्या ह्मणाली महाराज मला रामानंद स्वामीचा

उपदेश आहे. त्यांनीं उपदेश करितांना मला कांहीं योगविद्या दिली आहे, तर त्या श्रीगुरुच्या कृपेनें व योगमार्गानें मला अशा सर्व गोष्टी समजतात. हें तिचें वचन ऐकून जोशीबावा म्हणाले— शाबास तूं वेश्या असून धन्य आहेस. कारण तूं आपल्या श्रीगुरु कृपेनें देहाचें सार्थक करून घेतलें. मी ब्राम्हण होऊन कांहीं उपयोग नाहीं. असो. ते वीरमंगळ जोशी पश्चाताप युक्त होऊन सर्व प्रपंचाचा त्याग करून काशीस गेले; आणि रामानंद स्वामीस शरण जाऊन कांहीं दिवस त्यांची सेवा करून मला कृतार्थ करावें अशी विनंती केली. स्वामींनें असें उत्तर दिलें कीं जोशीबावा, तुह्मास कृतार्थ व्हावें अशी इच्छा असल्यास तुमची जन्मांतरींची पातकें निवारण करून तुम्हास मुक्त करावें असें सामर्थ्य ज्ञानेश्वर त्यांचें अंगीं आहें. ते सात वर्षांनें तीर्थयात्रेच्या निमित्तानें उज्जनीस येतील. त्यांना तुह्मी शरण जावें ह्मणजे ते तुह्मास कृतार्थ करतील. हें ऐकून जोशीबावानें रामानंद स्वामीनें सांगितलेला दिवस लक्षांत धरून ते उज्जनींत आपल्या घरीं आले, श्रीगुरुचें दर्शन झाल्यावाचून भोजन करावयाचें नाहीं, असा त्यांनीं नियम करून नित्य फलाहार करीत गांवांबाहेर दोन प्रहर पर्यंत ज्ञानेश्वराची मार्ग प्रतीक्षा करावी. असा क्रम चालत असल्या कारणानें जोशीबावाचा देह अस्थि मात्र राहिला. माझ्यावर श्रीगुरु ज्ञानेश्वर कृपा करतील काय ? कारण मी फार पातकी आहे, अशी ते नित्य काळजी करीत असत. ह्या गोष्टीला सात वर्षें पूर्ण झालीं. पुढें ज्ञानेश्वरादि मंडळी यावयाची त्या दिवशीं आज कृतार्थ होण्याचा दिवस म्हणून ते परमानंदानें मंगलस्नान करून गांवाबाहेर वाटेवर येऊन बसले. तों इतक्यांत प्रहर दिवसाच्या सुमारास तेथें वैष्णवाचा मेळा प्राप्त झाला. शोध करतांना श्रीज्ञानेश्वराची मूर्ति तेजःपूंज सर्व वैष्णवांच्या मध्यंतरीच चालली आहे असें अवलोकन करून जोशीबावानें श्रीगुरु ज्ञानेश्वराचें चरणीं मस्तक ठेऊन हस्त जोडून या दासास कृतार्थ करावें अशी विनंती केली आणि आपलें सर्व वर्तमान निवेदन केलें. परम कारुणिक दीनवत्सल जे श्रीज्ञानेश्वर त्यांनीं कृपावलोकनानें तत्वज्ञानाचा उपदेश करून त्यास कृतार्थ केलें. नंतर जोशीबावानें अशी प्रार्थना केली कीं, महाराज श्रीगुरुदर्शनाचा योग

पुनः होणार नाहीं, ह्मणून हा देह आपले चरणीं आतांच अर्पण करितों. असें बोलून ज्ञानेश्वराच्या चरणीं मस्तक ठेऊन त्यानें प्राणोत्क्रमण केलें. पुढें त्याला श्रीज्ञानदेवानीं आपल्या हातें समाधी दिली, आणि तेथें एक शंकराचें लिंग स्थापन केलें. त्याचें नांव मंगलेश्वर महादेव असें ठेविलें. तें स्थान उज्जनी बाहेर संदीपानाच्या आश्रमाजवळ अद्यापि आहे.असो; ज्ञानेश्वर प्रभृतिमंडळी दोन दिवस उज्जनीस राहून तिसरे दिवशीं तेथून निघाले ते मार्गक्रमण करीत प्रयागास येऊन पोहोंचले. त्या ठिकाणीं त्यांनीं त्रिवेणीचें स्नान केलें आणि भारद्वाजाचा आश्रम व लोपामुद्रेचें स्थान पाहून तेथें तीन दिवस राहून मोठ्या आनंदानें निघाले ते काशीच्या पंचक्रोशींत प्राप्त झाले. श्रीक्षेत्रकाशीमध्यें महा पंडित मुद्गलाचार्यानें यज्ञास आरंभ केला होता. त्या यज्ञाकारितां लांबलांबचे वैदिक, शास्त्री, पुराणीक, असे वशिष्ट वामदेव सदृश ब्राम्हण पुष्कळ आले होते. यज्ञमंडप मणिकर्णिकेच्या घाटावरच होता. ब्राम्हणांच्या वेदमंत्राचा घोष अज्यादिहविर्द्रव्यानें अग्नीची प्रज्वलित ज्वाला आणि शुभ्र दुग्धाप्रमाणें गंगेच्या उदकाचा प्रवाह इत्यादिकें करून त्या यज्ञास फार शोभा दिसत होती. असा रमणीय यज्ञ होत असतां शेवटीं अग्रपूजेचा सन्मान कोणास द्यावा याविषयीं सर्व ब्राह्मण परस्परांत वाद करूं लागले; कारण तेथें जे जे ब्राह्मण जमा झाले होते ते ते सर्व वेदशास्त्र संपन्न व मान्यच होते. ज्याला त्याला अग्रपूजेचा सन्मान मला असावा असें वाटे. कांहीं वेळानें मुद्गलाचार्यानें असें ठरविलें कीं, हस्तिनीचा पूजा करून तिच्या शुंडेमध्यें संकुलपुष्पमाला द्यावी; आणि ज्याच्या कंठांत पुष्पमाला अर्पण करील त्यास अग्रपूजेचा मान द्यावा, ह्मणजे पूजेविषयीं कोणाचाही वाद होणार नाहीं. ही गोष्ट सर्वत्रांनीं मान्य केल्यानंतर तत्रस्थ एक जहागीरदाराकडून एक हस्तिनी आणून तिची पूजा केली; आणि तिच्या शुंडेंत एक संकुलपुष्पमाला देऊन ती सर्व काशीक्षेत्रामध्यें गमन करूं लागली. ही हस्तिनी कोणाच्या कंठांत माळ आर्पण करितें हें पहाण्याकरितां तिच्या मागें मुद्गलाचार्य प्रभृति बहुत लोक चालले होते. ज्यानें त्यानें या हस्तिनीनें ही माला माझ्या कंठांत घालावी म्हणून तिच्या अग्रभागीं

येऊन उभे रहावें. परंतु ईश्वरेच्छा वेगळीच असते. ती माला त्या हस्तिनीनें कोणाच्याही कंठांत न घालितां ती फिरत फिरत गांवा बाहेर आली. तों इतक्यांत निवृत्ति ज्ञानदेव प्रमुख संतमंडळी त्याच मार्गानें येत होते. हस्तिनीनें ज्ञानेश्वराजवळ येऊन ती संकुलपुष्पमाला ज्ञानेश्वराच्या कंठीं अर्पण केली; आणि मस्तक भूमीला लाऊन प्रणिपात केला. असा अद्भुत चमत्कार पाहून मुद्गलाचार्यानें श्रीज्ञानेश्वराच्या चरणावर मस्तक ठेऊन हस्त धरून तें त्यांना यज्ञ मंडपांत मोठ्या हर्षानें घेऊन आले. नंतर सत्कार करून उत्तम असनावर बसविलें असतां तें पाहून वरकड मानी महाविद्वानास व ऋत्विजादिकांस फार क्रोध उत्पन्न झाला. ते सर्व मुद्गलाचार्यास म्हणाले कीं, अहो आचार्य ! तुम्ही यांना अग्रपूजेचा मानदेणार कीं काय ? अग्रपूजा म्हणजे भलत्या पुरुषांस द्यावी हें युक्त नव्हें. त्याला महा अधिकार संपन्न व वेदार्थज्ञ पुरुष लागतो, असें असून हस्तिनी म्हणजे पशू जाती ! तिला काय समजते. तिनें माळा तों काय घातली आणि तुह्मी यांना अग्रपूजेचा मान तो काय देतां, ह्याचा कांहीं विचार करा. असा ह्यांच्या अंगीं कोणचा अधिकार आहे ? तो पूर्वी आह्मास सांगा आणि नंतर पूजा करा. असें त्या ब्राम्हणांचें बोलणें ऐकून नामदेव मोठ्या नम्रवाणीनें म्हणतो कीं महाराज ! तुम्हास जो अधिकारी पुरुष पाहिजे तो कसा काय असावा ? एवढें तर सांगा. एक ब्राम्हण मोठ्या त्वेषानें म्हणतो कीं, अहो, आह्मास असा अधिकारी मनुष्य पाहिजे कीं, त्यानें हा यज्ञाचा पुरोडांश हातीं धारण करून विश्वेश्वराच्या देवालयांत जावें, आणि विश्वेश्वरानीं प्रत्यक्ष प्रगट होऊन तो पुरोडांश भक्षण करावा असें सामर्थ्य अंगीं असल्यास आम्ही अग्रपूजेचा मान यांना देतां. नामदेव म्हणतो कीं तुमच्या आशीर्वादें करून तसेंही होईल. यांत कांहीं मोठी अगाध गोष्ट नाहीं. हें ऐकून ब्राम्हण परस्पर बोलूं लागले कीं कां हो ? हे कोण पुरुष आहेत बरें ? कोणी म्हणतात ज्ञानेश्वर या नावाच्या पुरुषानें पैठणांत रेड्याच्या मुखानें वेद बोलविले ते हे तर नसतील ना ? तेच असल्यास मग महत्पुण्य समजलें पाहिजे. असें म्हणून एका ब्राम्हणानें त्या वैष्णव मंडळींत शोध केला कीं महाराज ?

आमचे मुद्गलाचार्य ज्यांना अग्रपूजेचा मान देत आहेत ते कोण आहेत ? व त्यांचें नांव काय ? वैष्णवानें उत्तर दिलें कीं यांना ज्ञानेश्वर ह्मणतात. हे महा सामर्थ्यवंत आहेत. ह्यानींच पैठणामध्यें सर्व ब्राह्मणा समक्ष रेड्याच्या मुखानें वेद बोलविले. हें ऐकून तर सर्व ब्राम्हणांनीं आग्रह धरून हा अद्भुत चमत्कार आपल्या आज दृष्टीस पडेल. अशा हेतूनें ह्मणाले कीं अहो सामर्थ्य असल्यास हा यज्ञाचा पुरोडांश हातीं धारण करून श्रीविश्वेश्वराच्या देवालयांत चलावें. असें ऐकून श्रीज्ञानेश्वर प्रमुख वैष्णव मंडळी व सर्व यज्ञातील ब्राह्मण मोठ्या समारंभानें जय विश्वेश्वर असा ध्वनी करीत त्या यज्ञमंडपांतून बाहेर निघाले, तों विश्वेश्वराच्या देवालयांत येऊन पोहोंचले. हा अद्भुत चमत्कार पहाण्यासाठीं गांवांतील बहुत लोक जमा झाले. नंतर श्रीज्ञानेश्वरानीं आपल्याहातांत यज्ञातील पुरोडांशाचें पात्र घेऊन श्रीविश्वेश्वराची अशी प्रार्थना केली कीं मी सहाजीक तीर्थ यात्रेकरितां निघालों आहे. माझा हेतु अग्रपूजे विषयीं मुळींच नसून आपणच हस्तिनीचें हृदयांत प्रेरणा करून माझ्या कंठांत पुष्पमाला घालविली; तर या पामराला अग्रपूजेचा मान असावा असें आपल्याच मनांत आहे. आतां हा पुरोडांश भक्षण करण्यास अनमान करूनये. कारण तुमचा हेतु तुह्मीच पूर्ण केला पाहिजे. अशी प्रार्थना श्रवण करून एकदाच मेघध्वनी प्रमाणें शब्दाचा कडकडाट होऊन त्या पिंडींतून नंदिकेश्वरावर आरूढ झालेले व अंकावर पार्वती आहे असें साक्षात् विश्वेश्वर प्रगट झाले. त्या योगानें चहूंकडे देवालयांत विद्युल्लते प्रमाणें प्रकाश पडला. श्रीविश्वेश्वरास पाहून ज्ञानेश्वरानीं साष्टांग नमस्कार केला. श्रीज्ञानेश्वर पूर्णब्रह्म अवतार ह्मणून विश्वेश्वरानींही त्यांना नमस्कार केला. इतक्यांत, विश्वेश्वरानीं ज्ञानेश्वरांच्या हातांतील पुरोडांश घेऊन मोठ्या प्रीतीनें भक्षण केला. नंतर विश्वेश्वर हे अंतर्धान पावले. हा चमत्कार ऋत्विजादि ब्राह्मणांनीं व नगरवासी जनांनीं पाहून श्रीज्ञानेश्वरास साष्टांग प्रणिपात करून ते ह्मणाले कीं आपण ईश्वरांश आहां, तस्मात् अग्रपूजा स्विकारून आह्मा दीनांचा उद्धार करावा. नंतर मंगल वाद्य लाऊन ज्ञानेश्वरास यज्ञ मंडपांत मिरवत आणिलें. सर्वांनीं जयजयकार शब्द

करून श्रीज्ञानेश्वरांची अग्रपूजा केली. मुद्गलाचार्यास असें वाटलें कीं, जसा श्रीशुकाचार्यांच्या आगमनानें धर्माचा राजसुयज्ञ पूर्ण झाला तसा माझाही यज्ञ पूर्णतेप्रत पावला. असो; निवृत्ति ज्ञानेश्वरादि संत मंडळी काशीमध्यें एक्या धर्मशाळेंत जाऊन उतरली. विश्वेश्वरानीं श्रीज्ञानेश्वराच्या प्रार्थनेवरून पुरोडाश भक्षण केला, अशी कीर्ति काशीमध्यें सर्वतो मुखीं विस्तृत झाली. त्या वेळेस रामानंद स्वामी तेथेंच होते. त्यानीं आपले मठांत श्रीज्ञानेश्वर प्रभृति आदिकरून वैष्णव मंडळीस नेऊन त्यांचा बहुत सत्कार केला; आणि कबीरानें ही आपल्या घरीं नेऊन ज्ञानेश्वरादिकांची पूजा केली. या गोष्टीला तीन दिवस झाल्यानंतर एके दिवशीं प्रातःकालीं निवृत्ति ज्ञानेश्वरादिक भागीरथीचें स्नान करून मणिकर्णिकेच्या घाटावर जों येतात, तों इतक्यांत पूर्वोक्त संकेताप्रमाणें श्रीगुरू दत्तात्रय, मत्स्येंद्र आणि गोरक्ष या त्रिवर्गांची भेट झाली. निवृत्तिनाथानें त्यांना अवलोकन करून साष्टांग प्रणिपात केला; आणि ते ज्ञानदेवास ह्मणालें कीं ज्ञानदेवा, हे आपले गुरुवर्य श्रीदत्तात्रय मत्स्येंद्र व गोरक्ष आले आहेत. यांना नमस्कार करा, असें ऐकतांच श्रीज्ञानेश्वरानीं त्रयमूर्तीच्या चरणीं मस्तक ठेविलें. तेव्हां त्रिवर्गांनीं ज्ञानेश्वरास असा आशीर्वाद दिला कीं, तुह्मी भक्तिमार्ग प्रगट करून कोट्यावधि अज्ञान जीवाचा उद्धार कराल. तुमचें नामस्मरण जे लोक करतील ते सर्व पातकांपासून मुक्त होतील. असें सांगून ते तिघे जाते झाले. निवृत्ति ज्ञानदेवादि काशीमध्यें सात दिवस वासकरून आठवे दिवशीं सर्वांनीं तेथून निघण्याचा बेत केला. ते सर्व निघतेवेळेस विश्वेश्वराच्या दर्शनास गेले असतां विश्वेश्वर प्रत्यक्ष मूर्तिमंत प्रगट होऊन ज्ञानदेवादिकांस सामोरे आले. यानंतर गंगा, गुहा, कालभैरव, दंडपाणी, गणपती इत्यादिक देवता मनुष्य रूपानें ज्ञानेश्वरादिकांची बोळवण करण्याकरितां आल्या; व कांहीं गांवातील रामानंद प्रभृति लोकही आले; असो. निवृत्ति ज्ञानेश्वरादिक सर्वांची आज्ञा मागून श्रीक्षेत्र काशीच्या पंचक्रोशींतून बाहेर निघाले. ते विठ्ठलनामश्रवणाचा गजर करीत मार्गांत आढळलेली गया अयोध्या गोकुल वृंदावन द्वारकादि तीर्थें करून जुन्या गडीस आले. तेथें नरसीमेहता या नांवाचा साधु होता. त्यानें

निवृत्ति ज्ञानेश्वरादिकांची भोजनाची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेविली. एक दिवस तेथें वास्तव्य करून निघाले ते मारवाड देशांत आले, तों अरण्यामध्यें दोन प्रहरच्या सुमारास नामदेवास तृषेनें फार व्याकूळ केलें तेव्हां नामदेव श्रीज्ञानदेवास म्हणाले कीं महाराज मी तृषेनें व्याकूळ झालों आहे; आणि या अरण्यांत कोठेंहीं उदक आढळत नाहीं. काय करावें! श्रीज्ञानदेवानें उत्तर दिलें कीं नाम्या! हें निर्जल अरण्य आहे. येथें पाणी कोठून मिळणार? येथें अत्युष्णता असल्यामुळें पशुपक्षादिकही संचार करीत नाहींत. परंतु अग्रभागीं एक कूप दिसत आहे. कदाचित् त्यांत जर उदक असेल तर पाहूं. नंतर ते सर्व ज्या ठिकाणीं कूप होता तेथें आले; आणि अवलोकन करितात तों कूपामध्यें उदक फार खोल होतें. हाताला येण्याजोगें नाहीं, हे पाहून ज्ञानेश्वर ह्मणाले नाम्या! हें उदक फार खोल आहे. रज्जूनें कांहीं येणारे नव्हें; तर माझ्याजवळ एक युक्ति आहे. व त्या युक्तीनें आपण सर्वही पाणी पिऊं. नामदेवानें विचारलें कीं अशी युक्ति ती कोणची? नंतर ज्ञानेश्वरानीं अष्टमहासिद्धि पैकीं लघिमासिद्धीच्या योगानें अणुप्रमाण देह धारण करून सर्व संतांच्या समक्ष कूपांतरभागीं प्रवेश केला; आणि एका घटिकेंत उदक प्राशन करून वर आले. ही गोष्ट सर्वमंडळींनीं मान्यकरून ज्ञानेश्वरांच्या सिद्धिबलानें अणुप्रमाण होऊन कूपांतील उदक प्राशनकरून यावें असा क्रम चालू असतां ती गोष्ट नामदेवास मान्य झाली नाहीं. ज्ञानेश्वरांच्या सिद्धिबलानें अणुस्वरूप होऊन कूपांतील जलप्राशनकरणें हें दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्यासारखें होतें, तर माझी श्रीविठ्ठलचरणीं सत्यभक्ति असल्यास श्रीविठ्ठल मला येथें पाणी आणून देईल; असें मनांत आणून नामदेवानें अंतःकरणवृत्तींची ऐकता करून श्रीविठ्ठलाचा धावा केला. तो धावा सर्वांतर्यामी श्रीविठ्ठलास कळतांच त्यानीं नामदेवाची तृषा शांत व्हावी ह्मणून वरुणास आज्ञा केली. वरुणानें त्या कूपांतील उदक वर वाहून जाईल असें केलें. तें पाहून श्रीज्ञानेश्वर ह्मणाले, नाम्या? शाबासरे शाबास? तुझा देव ऋणी आहे. काय तुझी उपासना! मग सर्वांनीं उदक प्राशन करून तेथून मार्गक्रमण करूं लागलें तों मध्येंच दिल्लींत नामदेवाच्या कीर्तनांत बादशाहानें गाय

मारली असतां ती गाय **नाम**देवानें पांच दिवसांनीं जिवंत केली. ते सर्व **अवंतिका, माया, प्रभास, बद्रिकेदार, ओंकारमांधाता, गोकर्ण, महाबळेश्वर, परळी, वैजनाथ, सोरटीसोमनाथ, नागनाथ, श्रीशैलमल्लकार्जून, शिवकांची, विष्णकांची, रामेश्वर, आदिनाथ, घृष्णेश्वर, त्र्यंबकेश्वर,** आदिकरून द्वादश जोतिर्लिंगें व सप्त मोक्षपुऱ्या अवलोकन करून यात्रा करीत **कर्णाटक** देशांत प्राप्त झाले. तेथें **तमण्णाचा**र्याचापुत्र **सायन्ना**चार्य हा **रामा** या नांवाच्या गड्यानें मारिला होता. मारण्याचें कारण असें झालें कीं, **सायन्ना**चार्याची चुलती **लक्ष्मी**बाई या नांवाची होती. तिचा पती ग्रामांतरीं गेला होता, व तिजला हा रामागडी विषय बुद्धीनें पहात लुब्ध असे. ती महा साध्वी असल्याकारणानें रामाच्या इच्छेनुरूप तीचें वर्तन होईना त्यावरून एके दिवशीं रात्रौ सर्व मंडळी निद्रिस्त असतां आपल्या हातांत रामानें खड्ग घेऊन **सायन्ना**चार्याचा वध केला; आणि तें खड्ग **लक्ष्मी**बाईच्या उशाशीं ठेविलें. दुसरे दिवशीं **लक्ष्मी**बाईनें **सायन्ना**चार्यास मारिलें असा त्यानें बोभाट केला. हें वर्तमान तेथील राजास कळतांच राजानें तिला न्याय अन्याय न पहातां तोफेच्यातोंडी देण्याचा हुकुमकेला. त्यावेळेस **लक्ष्मी**बाईला जें दुःख झालें तें वर्णन करितां येत नाहीं. असो, तिला गांवांबाहेर तोफेच्या तोंडी देण्याकरितां आणली. इतक्यांत तिकडून **निवृत्ति ज्ञानेश्वर** प्रभृती मंडळी येत होती. तिनें हे महासाधू आहेत असें मनांत आणून राजाज्ञेनें श्री**ज्ञा**नेश्वराच्या चरणीं मस्तक ठेविलें. तेथें **तमण्णा**चार्य त्या गांवचा राजा, रामा गडी व दुसरे बहुत लोक जमा झाले होते. रामानें राजास असें भासविलें कीं, ही **लक्ष्मी**बाई आतां ज्यास नमस्कार करण्याकरितां गेली आहे तो हिचा प्रिय पुरुष आहे; व ह्याच्याच नादानें हिनें **सायन्ना**चार्याचा शिरच्छेद केला. राजा फार अन्यायी व अधर्मी आणि अविचारी असल्यामुळें त्यानें **लक्ष्मी**बाईच्या बरोबर **ज्ञा**नेश्वरास ही तोफेच्या तोंडीं द्यावें ह्मणून हुकूम दिला. **निवृत्ति नामदे**वादि मंडळींनीं आह्मीं पांथस्थ आहोंत, व हे **ज्ञा**नेश्वर महा साधु आहेत असें बहुत प्रकारें सांगितलें परंतु राजानें तें कांहीं ऐकिलें नाहीं. **लक्ष्मी**बाईस व **ज्ञा**नेश्वरास एकेठिकाणीं बांधून तोफेच्या तोंडीं देणार, तों

इतक्यांत आकाशामध्यें कड्कड् अवाज होऊन हे **ज्ञानेश्वर** ईश्वरांश आहेत, ह्याना तोफेच्या तोंडीं द्यालतर हे न मरतां तुमचामात्र सर्वांचा नाश होईल असा ध्वनी झाला. तें ऐकून राजास भीति उत्पन्न झाली. त्यानें **ज्ञानेश्वराच्या** चरणावर मस्तक ठेविलें आणि विचारलें कीं, महाराज, या मुलास मारिलें हें कृत्य कोणी केलें असावें ? कारण, आह्मी फार अज्ञानी आहोंत, आह्मांस हें कसें कळेल ? नंतर **ज्ञानेश्वरानीं** त्या मुलाचें शीर व कलेवर आणावयास सांगितलें. ते शीर आणल्यावर त्यास हें कृत्य कोणी केलें असें **ज्ञानेश्वरानीं** विचारलें. नंतर त्या शिरानें **रामागड्याचें** साद्यंत वर्तमान निवेदन केलें. असा अद्भुत चमत्कार पाहून सर्वांस मोठे आश्चर्य वाटलें. मग **ज्ञानेश्वरानीं** तें शीर कलेवरास लावलें, आणि कृपादृष्टीनें अवलोकन करून **सायन्नाचार्यास** जिवंत केलें. **राजा** व रामागडी या दोघास महत्पश्चाताप होऊन ते **श्रीज्ञानदेवास** शरण आले. परम दयाळू **ज्ञानदेवानीं** त्यांच्या दुष्टबुद्धीचा नाश करून त्यांना कृतार्थ केलें. ते सात दिवस तेथें राहून नंतर तेथून निघाले ते मोठ्या आनंदानें मार्गक्रमण करीत असतां वाटेनें **तैलंगादिदेश** अवलोकन करून पुढें चालले. **ज्ञानदेवानीं** ज्या ज्या देशांत जावें त्यात्या देशीय भाषचे अभंग करून सवास उपदेश करावा. असो ; कांहीं दिवसांनीं ती सर्व मंडळीं **पंढरपुर** येथें प्राप्त झाली. **श्री ज्ञानदेव** नामदेवादि तीर्थयात्रा करून परत आले, हें **श्री विठ्ठलास** कळतांच ते आपला रथ घेऊन कांहीं मंडळीसहवर्तमान गांवाबाहेर त्यांना सामोरे आले. परस्पराचें कांहीं वेळ प्रेमभरीत भाषण झाल्यानंतर **भागीरथीची** पुजाकरून तिला आपल्या रथांत घेऊन **निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, नामदेव, सावतामाळी, गोराकुंभार,** इत्यादि संत मंडळी मोठ्या समारंभानें गांवांत मिरवत आणिलीं. उत्तम दिवशीं **काशीचें** मांवदें झाल्यानंतर सर्व संत आपआपल्या गांवीं निघून गेले. त्याच प्रमाणें **निवृत्ति ज्ञानदेवादि श्रीविठ्ठलाची** आज्ञा घेऊन निघाले, ते **आळंदीस** येऊन पोहोंचले. **आळंदीकर** मंडळींनीं **ज्ञानदेवादिकांस** मिरवत आणून **काशीचें** मांवदें केलें. असो; **श्रीज्ञानदेवानीं** पूर्ववत् तेथें भजन, पुराण, कीर्तन इत्यादि क्रम सुरू केला.

## ॥ षष्ठमोल्लासः ॥

### श्री वि ठ्ठ ल

## ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

॥ श्रीगैनींप्रणमाम्यहंद्विजवरंगोरक्षनाथानुजं ॥
॥ ब्रह्मानंदसुखास्पदंशरणकंधर्मार्थकामप्रदं ॥
॥ नित्यानित्यविवेकजातसततब्रम्हात्मविद्यासिना ॥
॥ कामक्रोधजराभयोन्नततमोमोहांधकारच्छिदं ॥ १ ॥

आतां या उल्लासांत निवृत्तिनाथानीं श्रीज्ञानेश्वरास जो उपदेश* केला त्याचें वर्णन करितों. या उपदेशावरून श्रीज्ञानेश्वराचें मत वेदमतास अनुसरून आहे किंवा नाहीं हें वाचकांच्या सहजच लक्षांत येईल. हा उपदेश मत्स्येंद्रसंहितेंत ब्रह्मायामल, रुद्रयामल व विष्णु-यामल इत्यादि ग्रंथाधारें कथन केला आहे. त्याजमध्यें फार विस्तार आहे, म्हणून ग्रंथविस्तार भीतीनें त्याचें संक्षेपानें वर्णन करितों. सद-रील ग्रंथाचेच श्लोक या उल्लासांत दिलें आहेत असें नाहीं तर उपनि-षद्, शांकरभाष्य, विद्यारण्यकृतपंचदशी भागवत, श्रीमद्भगवद्गीता व वेदांतचिंतामणी इत्यादि बहुत ग्रंथांतील श्लोकांचीं प्रमाणें दिलीं आहेत. असो;

**निवृत्तिनाथः—ज्ञानदेवा!** जगताच्या उत्पत्तिविषयीं बहुत मतें आहेत व त्या मतवादी लोकांचे वाद अद्यापिही सुरू आहेत, बृहत्संहितेंत ह्मटलें आहे. **॥ कापिलप्रधानमाह द्रव्यादीन् कणभुगस्यविश्वस्य ॥ ॥ कालःकारणमेकेस्वभावमपरेजगुः कर्म ॥ १ ॥** **सांख्यकर्ते** जे **कापेलाचार्य** त्यांचें असें मत आहे कीं हें जगत् प्रकृति आणि पुरुष या उभय तांच्या संयोगानें उत्पन्न झालें आहे. त्यांत पुरूष हा अकर्ता आहे ह्मणू-

---

* हा उपदेश मत्स्येंद्रसंहिता, व भक्तितत्त्वामृत, ह्या ग्रंथाच्या आधारानें केला आहे.

नच जगदुत्पत्तीस प्रकाति ही निमित्तकारण आहे. द्रव्य, गुण, विशेष सामान्य आणि समवाय इत्यादिकांच्या योगानें जगदुत्पत्ति झाली आहे असें **कणादऋ**षीचें मत आहे. कोणी जगदुत्पत्तीचें कारण काल असें ह्मणतात कोणी कर्मानेंच जगउत्पन्न होतें असें ह्मणतात. अशीं बहुत मतें जरी आहेत तरी आह्माला प्रत्यक्ष अनुभवास येतें कीं कारणावांचून कार्योत्पत्ति होत नाहीं. व **सूर्य, चंद्र, तारे,** ही अयन परत्वे भिन्नभिन्न रीतीनें गमन करितात, तस्मात् यांचा कोणी योजक असावा असें स्पष्ट दिसतें. व या जगतांमध्यें शरी-रांतर्गत शोणित प्राणादि असें कांहीं पदार्थ आहेत त्यांच्यावर मनुष्यादिकांची सत्ता नसून ते परसत्तेनेंच वर्तन करितात असा प्राणिमात्रास प्रत्यय आहे. ह्मणून जगताचा उत्पन्न करणारा कोणी तरी आहे असें सिद्ध होतें.

**ज्ञानदेवः**—कोण आहे ?

**निवृत्तिः—पंचदशी, श्लो० इदंसर्वंपुरासृष्टेरेकमेवाद्वितीयकं ॥ ॥ सदेवासीन्नामरूपेनास्तामित्यारूणर्वचः** ॥ १ ॥ हें संपूर्ण सृष्टीच्या पूर्वी एक अद्वितीयक सत् असतें झालें. सत्पुरूष त्यासच देव, असें ह्मणातात. त्याला नाम रूप नाहीं; असें **अरुणाचा** पुत्र जो **उद्दालक** त्याचें वचन आहें व ह्याविषयीं **सदेवसौम्येदमग्रआसीत् एकमेवाद्वितीयकं,** असें श्रुतींतप्रमाण आहें.

**ज्ञानदेवः**—अद्वितीय पदाचा अर्थ एक असा होत असतां पुनरपि श्रुतीनें एकं एव असा प्रयोग करण्याचें कारण काय ?

**निवृत्तिः—वृक्षस्यस्वगतोभेदःपत्रपुष्पफलादिभिः ॥ वृक्षांतरात्सजातीयःविजातीयःशिलादिभिः** ॥ १ ॥ लोकामध्यें भेदत्रय आहेत त्यांची उपस्थिति न व्हावी ह्मणून श्रुतीनें दोन वेळा एकाच अर्थाचीं पदें घातलीं आहेत.

**ज्ञानदेवः**—ते भेद कोणचे ?

**निवृत्तिः**—एक **स्व**गत, दुसरा **स**जातीय आणि तिसरा **वि**जातीय, वृक्षांस पत्र पुष्प फलादीक आहेत हा **स्व**गत भेद, त्या वृक्षांहून जे अन्य वृक्ष, तो **स**जातीय भेद, आणि शीलादिक हा **वि**जातीय भेद, असे भेद त्रय आहेत. **तथासद्वस्तुनो भेदत्रयं प्राप्तं निवार्यते ॥ ऐक्यावधारण द्वैतप्रतिषेधैस्त्रिभिःक्रमात्** ॥ १ ॥ अनात्म्याचेठायीं जे

भेद आहेत त्याप्रत प्रस्तुत श्रुति निवारण करिते या अर्थी सांगतों. लौकिकांत जसें भेद त्रय आहेत सद्वस्तूचेंठायीं प्राप्त होते. ते ऐक्यावधारण आणि द्वैत प्रतिनिषेध एतन्नामक उपायांनीं अनुक्रमें निवारिलें जातें. वस्तु सामान्येंकरून अनात्म्याप्रमाणेंच सद्रूप, चिद्रूप, आणि अनंतरूप, असें प्रस्तुत जे स्वगतादि भेदत्रय त्यांतील एक एक भेद, एकं, एव अद्वितीयं, या पदत्रयेंकरून. निराकरणाप्रत पावतो. **एकमेवाद्वितीयं सत् सिद्धमत्रतुकेचन ॥ विव्हला अ देवेदं पुरासीदित्यवर्णयन् ॥ १ ॥** आतां सत् ही वस्तु एकच अद्वितीय आहे हें निश्चयें करून सिद्ध झालें. परंतु कोणी विव्हल, (बुद्धिहीन पुरुष) असदेवेदमग्रआसीत्, असत् हेंच सृष्टीच्या पूर्वी होतें असें ह्मणतात; परंतु सृष्टीच्या पूर्वी असत् होतें असें संभवत नाहीं. कारण असतापासून साकार जगत कसें उत्पन्न होईल. त्या असताला सद्योग किंवा सदात्मता पाहिजे, असें ह्मटलें तरी युक्त दिसत नाहीं, कारण सदात्मता ह्मणावा तर असत् नव्हे; व सद्योग ह्मणावा तर, मम माता वंध्या, ह्या न्यायाप्रमाणें व्याघात होतो, ह्मणून दोन्हीही संभवत नाहीं. जसा तमाचा संयोग सूर्याला होत नाहीं व सूर्य तमोमय होत नाहीं. किंवा जशी सताची प्रतीति होते तशी असताची प्रतीति होत नाहीं, ह्मणून असत् वाद करणारे मूर्ख आहेत, असें श्रीमच्छंकराचार्य मंडणमिश्राशीं वाद करीत असतां म्हणाले आहेत. शांकरविजय—**भगवत्पूज्यपादाश्चशुष्कतर्कपटूनमून् ॥ आहुर्माध्यमिकान्भ्रांता न चिंत्येस्मिन् सदात्मनि ॥१॥ अनादृत्यश्रुतिंमौर्ख्यादिमेबौद्धास्तमस्विनः ॥ आपेदिर निरात्मत्वमनुमानैकचक्षुषः ॥ १ ॥** अर्थ—शुष्क तर्क काढण्यामध्यें पटाईत झालेले जे माध्यमिक (अर्धवट) त्यांप्रत अचिंत्य सदात्याविषयीं भ्रांत अशी सत्पुरूष संज्ञा देतात हे तपस्वी बौद्ध [ जैन वगैरे ] मूर्खपणानें श्रुतीप्रत अव्हेरून केवळ अनुमान दृष्टीनें मुळींच आत्मा नाहीं असें ह्मणतात. अशी आचार्योक्ति आहे ह्मणून सृष्टीच्या पूर्वी सत् होतें असें शास्त्रानें व युक्तीनें सिद्ध आहे. आतां सत् जें अद्वितीय ब्रह्म त्याचें लक्षण सांगतों. मत्स्येंद्र संहिता—**सृष्टेःपुरासदेवासीदेकमेवाद्वितीयकं ॥ सत्यं ज्ञान मनंतंयत् वेदत्यं ब्रम्हलक्षणं ॥ १ ॥** सृष्टीच्या पूर्वी एक अद्वितीयसत् जें ब्रम्ह तें असतें झालें. सत्यं,

ज्ञानं, अनंतं, असें त्रिविध ब्रम्ह लक्षण वेदामध्यें वर्णन केलें आहे.
ज्ञानदेव–सत्य म्हणजे काय, ज्ञान ह्मणजे काय, व अनंत म्हणजे काय ?

निवृत्ति पंचदशी— **सत्यत्वं बाधराहित्यं जगद्बाधैकसाक्षिणः ॥ बाधः किं साक्षिकोब्रूहिनत्वसाक्षिकइष्यते** ॥ १ ॥ **अर्थ**—जें कालत्रयाबाधित तें सत्य ह्मणावें, त्याचा बाध कधींही कोठें केला जात नाहीं असें पूर्वी आचार्यांनीं निर्मित केलें आहे. असो, सर्वांतर्गतव्याप्तित्वामुळें स्थूल, सूक्ष्म, शरीरादिलक्षणाचा जो बाध ह्मणजे सुषुप्ति, मूर्च्छा, समाधीचें ठायीं अविद्यमानता यांचें साक्षित्वानें वर्तन करणारें जें ब्रह्म त्यास कोठें बाध आहे काय ? याचाही साक्षी दुसरा कोणी आहे. असें म्हणावें तर याचा बाध होईल. या वेगळा आणीक साक्षीचा साक्षी कोणी नाहीं. असाक्षीला बाध कां नाहीं, अशी शंका घेशील तर साक्षीरहीत बाध पाहिला नाहीं, साक्षीरहीत बाध आहेच असें म्हणता अतिप्रसंग होतो. व, **सआत्माबाधवर्जितः**, अशी श्रुति आहे म्हणून ब्रम्हाचें जें बाधराहित्य त्यासच सत्य म्हणावें. आतां ब्रम्हाचें ज्ञान लक्षण सांगतों. ब्रम्हज्ञानस्वरूप आहें. त्यास वेदशास्त्राचें ज्ञान व मायेचें अज्ञान या दोहींचाही संबंध नाहीं, तें ज्ञानाज्ञानरहित ज्ञानस्वरूप आहें. पंचदशी. **सवेत्तिवेद्यंतत्सर्वंनान्यस्तस्यास्तिवेदिता ॥ विदिताविदिताभ्यांतत् पृथक्बोधस्वरूपकं** ॥ १ ॥ **अर्थः**—ब्रह्म स्वयंप्रकाश आहें, तें ब्रम्ह जें जें जाणण्यास योग्य आहं, त्या त्या सर्वाप्रत जाणतें, अर्थात् त्यांप्रत जाणणारा त्यांवाचून दुसरा कोणीही नाहीं. त्याचें बोधस्वरूप विदित [ ज्ञानानें विषयींकृत ] अविदित ( अज्ञानानें व्याप्त ) या दोहोंतून ही ब्रह्म वेगळे स्वयं प्रकाश आहं, ह्याविषयीं **येनेदं जानतेसर्वं तत्केनान्येनजानतां**, असें यजुर्वेद ब्राम्हणांत वाक्य आहे. ज्या ब्राह्मणाच्या अस्तित्वामुळें हें सर्व जाणलें जातें, तें ब्रम्ह बाह्य ज्ञानानें प्रकाशित व अज्ञानानें अच्छादित असें कसें होईल ह्मणून तें ज्ञानाज्ञानरहित बोधस्वरूप आहे असें सिद्ध होतें.

**ज्ञानदेव**:—ज्ञानाज्ञानाहून वेगळे जें बोधस्वरूप तें अनुभवास येत नाहीं.

**निवृ०—जिव्हा मास्ति न वेत्युक्तिः लज्जायै केवलं यथा ॥**

**न बुध्यते मया बोधो बोद्धव्य इति तादृशी ॥ १ ॥** अर्थ— ब्रह्माच्या ज्ञान स्वरूपाचा बोध होत नाहीं हें बोलणेंच मुळीं खोटें आहें जसें मला जिव्हा आहे किंवा नाहीं हें बोलणें लज्जास्पद होय. कारण, जिव्हेवाचून पूर्वोक्त प्रश्न तरी कसा झाला, तसें मला बोध नाहीं, बोध होणें आहे असें जें बोलणें तेंही लज्जेस कारण होय. ज्या ब्रम्हाच्या अस्तित्वामुळें तूं व्यवहार करितोस त्याचा अनुभव नाहीं हें भाषण सर्वथा मिथ्या होय. त्याचं अस्तित्व नसेल तर व्यवहारच व्हावयाचा नाहीं. एवं ब्रम्ह ज्ञानस्वरूप आहे असें सिद्ध झालें. आतां त्या ब्रह्माचें अनंत स्वरूप लक्षण कथन करितों.

**श्लो० ॥ नव्यापित्वात् देशतोंतो नित्यत्वान्नापिकालतः ॥ नवस्तुतोपिसर्वात्म्या दानंत्यं ब्रम्हणि त्रिधा ॥ १ ॥** अर्थ—देशे करून, काले करून, व वस्तुत्वे करून ब्रह्माचा अंत नाहीं. कारण तें व्यापक, नित्य. आणि सर्वात्मा आहें. ब्रह्माचें ठायीं त्रिधा प्रकारें देश काल वस्तु परिछेद नाहीं; या कारणास्तव त्यास अनंतत्व हें उघड आहें. श्रुतिप्रमाण–**नित्यंविभुं सर्वगतं सुसूक्ष्मं आकाशवत् सर्वगतश्चनित्यः ॥ इदं सर्वंयदयमात्मासर्वंह्यतत् ब्रम्हैवेदं** । इत्यादि श्रुतींनीं व्यापित्व, नित्यत्व, आणि सर्वात्मत्व, ब्रह्मास प्रतिपादिलें आहे. आतां केवल हें श्रुति प्रतिपाद्य आहें असें नाहीं, तर युक्तीनें ही आहे

**श्लो० ॥ देशकालाद्यवस्तूनां कल्पितत्वाच्चमायया ॥ नदेशादिकृतोंतोस्ति ब्रम्हानंत्यं स्फुटंततः ॥ १ ॥** देशकाल वस्तु हीं माया कल्पित आहेत. जसा गंधर्व नगरादिकाच्या योगानें आकाशाचे ठायीं प्रदेशादि परिछेद जितका भासतो, तितकाच कल्पित देशकालादि परिछेद ब्रह्माचे ठायीं भासमान होतो, ह्मणजे मुळींच नाहीं असें झटलें पाहिजे. असें ब्रह्माचें अनंतत्व शास्त्रानें व युक्तीनें सिद्ध होतें. सत्य ज्ञानानंत असें ब्रह्म लक्षण शास्त्रपुराणांनीं सांगितलें आहे सांख्यशास्त्र–**श्लो० ॥ अनादिरात्मापुरुषोनिर्गुणःप्रकृतेःपरः ॥ प्रत्यग् धामा स्वयंजोतिर्विश्वंयेन समान्वितम् ॥ १ ॥** मत्स्येंद्र संहिता० **श्लो० ॥ नस्त्रीपुमान्नापि नपुंसकंच नसन्नवासत् सदसच्चयत्र ॥ पश्यंतियब्रम्हविदोमनुष्यास्तदक्षरंनक्षरतेतिविद्धि ॥ १ ॥** भागवत० **श्लो० ॥ स्थित्युद्भवप्रलयहेतुरहेतुरस्य यत्स्वप्न जागर सुषुप्तिषुसद्बहिश्च ॥**

**देहेंद्रियासु हृदयानिचरंतियेन संजीवितानि तदवेहिपरंनरेंद्र ॥**
स्कंदपुराण० **श्लो०—अशद्बमस्पर्शमरूपमव्ययं तथारसं नित्यमगंधवच्चयत् ॥ अनाद्यनंतं महतःपरंध्रुवंजानीहितत्वंप्रणवस्य पार्वति ॥१**
अध्यात्म रामायण—**श्लो० ॥ आनंदं निर्मलंशांतं निर्विकारं निरंजनं ॥ सर्वव्यापिनमात्मानं स्वप्रकाशमकल्मषं ॥ १ ॥ अर्थ**—अनादी, आत्मा, निर्गुण, ( प्रकृतिजन्यगुणरहित ) प्रकृतिपर, प्रत्यगूधामा, स्वयंप्रकाश, ज्याणें हें विश्वसमन्वित आहें त्यासच कपिलाचार्य पुरुष म्हणतात, तें ब्रम्ह स्त्री, पुरूष, नपुंसक, सत् किंवा असत् नव्हें, असें जें अक्षर ( अविनाशी, ) ब्रम्ह त्यास ब्रम्हवेत्ते मनुष्य अवलोकन करितात. तें ब्रम्ह उत्पत्ति, स्थिति, लय, याला कारण असून अकारण आहें, जें जागृति, सुषुप्ति, स्वप्न, समाधी या चारी अवस्थेचे ठायीं सत् आहें, ज्याच्या योगानें देह, इंद्रिय, प्राण, अंतःकरण, इत्यादि जीवित होत्साते संचार करितात, त्यालाच ब्रम्ह म्हणावें. तें शद्ब स्पर्श, रूप, रस, गंध याहून वेगळे आहे, आणि अनादी, अनंत, अव्यय, प्रणवाचें तत्व असें जाण. तें आनंद, निर्मल, शांत, निर्विकार, निरंजन, सर्वव्यापी, स्वप्रकाशक, अकल्मष, अशीं ब्रम्हाची लक्षणें बहुत वर्णन केलीं आहेत. स्थलसंकोच्यामुळें येथें विस्तार करीत नाहीं. असो, एतल्लक्षण युक्त जें ब्रम्ह त्या पासून प्रकृति निर्माण झाली, तिला वेदांती लोक माया म्हणतात.

**ज्ञानदेवः**—प्रकृति म्हणजे काय ?

**निवृत्तिः**—आत्मपुराण० **श्लो० ॥ स्वेच्छैव प्रकृतिप्रोक्ता सांख्येन मतवादिना ॥ द्वैतस्य वादिनश्चाहुरनादिरव्ययापिसा ॥ १ ॥**
**अर्थ**—सांख्यकर्ते जे कपिलाचार्य त्यांचें ब्रम्हाची जी स्वेच्छा तिला प्रकृति ह्मणावी असें मत आहें. ती अनादी, अव्यय आहे असें द्वैतवादी म्हणतात व विद्यारण्य प्रभृति मायेचें वर्णन फारसे करीत नाहींत, कारण, पंचदशी० **श्लो० ॥ नासदासीद्विभातत्वान्नोसदासीच्चबाधनात् ॥ विद्यादृष्टयाश्रुतं तुच्छं तस्य नित्यनिवृत्तितः ॥१॥**
**अर्थ**—माया जर नाहीं म्हणावी तर ती भासते. माया आहे म्हणावी तर मिथ्यत्वे करून बाधते, या विषयीं, नेहनानास्ति किंचन असें श्रुति प्रमाण आहें. ती सदसद्रूप आहे. ( सत् ही आहे

आणि असत् ही आहे. ) अशी म्हणावी तर एकासच दोन धर्म म्हणणें विरुद्ध दिसतें. या करितां अयुक्त असें जाणून श्रुतींनीं मायेच्या वर्णनाची उपेक्षा केली. युक्ति दृष्टी करून अनिर्वचनीयत्व दाखवून **तुच्छमिदंरूपमस्याः** इत्यादि श्रुती विद्वदनुभवें करून तिच्या निरंतर निवृतित्वामुळें मायेस तुच्छत्वदाख्विते ह्मणून विद्वान् लोक मायेच्या प्रतिपादनास प्रवृत्त होत नाहींत. असेंच आचार्यांचें शारीरभाष्यांत मत आहे. असो; मायेचें लक्षण संक्षेपानें वर्णन करितों, मत्स्येंद्र संहिताः—**तस्मिन्ब्रम्हण्यतिगूढाचिच्छक्तिरस्यादतर्किका ॥ वन्हिशक्तिवच्चकार्यानुमयाश्रुतिराहृतां ॥ अर्थ ॥** अधिष्टान - ब्रह्माचे- ठायीं जी गूढ चिच्छक्ति अतर्किका आहे तिला माया असें ह्मणतात. जसी दहनावरून अग्नीची शक्ती कळते तसीच जगत्कार्यावरून ब्रह्म- चिच्छक्तींचें अनुमान होतें. "कार्यानुमेयासासीत्" अशी श्रुति आहे व पंचदशी० **श्लो०** ॥ चिदानंदमयब्रह्म प्रतिबिंब समान्विता ॥ तमोरज सत्वगुणाप्रकृतिर्द्विविधाचसा ॥ १ ॥ अर्थ ॥ चिदानंदरूप ब्रह्म त्याचे प्रतिबिंबानें ( प्रतिछायेनें ) समन्वित ( युक्त ) आणि तमोरज सत्वादी गुणाची जी साम्य अवस्था तीसच प्रकृति म्हणतात. ती दोन प्रकारची आहे, **श्लो०** पं० ॥ सत्वशुध्यविशुद्धिभ्यां मायाविद्येच ते मते ॥ मायाबिंबोवशीकृत्य तांस्यात् सर्वज्ञ ईश्वरः ॥ १ ॥ अर्थ ॥ इतर गुणांनीं कलुषीकृत् न झालेली तीसच शुद्धसत्व माया ह्मणतात; आणि दुसरी मलिनसत्व प्रधान तिला अविद्यता म्हणतात. सत्वगुण प्रधान जी माया तिनें चिच्छक्तीचा निष्कर्ष करून प्रतिबिंबित जो चिदात्मा तो सर्वज्ञत्वादि गुणक व मायी ईश्वर जाणावा, आणि अविद्या प्रति- बिंबित जो चिदात्मा तो अविद्यावशग जीव जाणावा. तो ईश परतंत्र ( ईश्वराधीन ) आहे. त्या अविद्या गुण वैचित्रेकरून देव, मनुष्य तिर्यकादि नाना योनी उत्पन्न झाल्या. त्यायोगानें जीवासही नानात्व प्राप्त झालें. असा जो जीव त्यास शरीरत्रयाची उपाधी आहे, त्याचें विवेचन करितों. प्रथम स्थूल शरीर, दुसरें लिंगशरीर आणि तिसरें कारण शरीर हे तीन देह तत्वज्ञानेकरून पाहिलें असतां नष्ट होतात. ह्मणूनच यांना शरीर असें ह्मणतात. त्याचें कारण शरीराचेंठायीं अज्ञान तादात्म्याध्यासेकरून अहं असा अभिमानवंत जो जीव तो प्राज्ञ या-

नामेंकरून प्रसिद्ध आहे. आतां क्रमानें आलेलें सूक्ष्म शरीर आणि तदुपाधिक जीव यांचें वर्णन करितों. प्राज्ञादि अविद्या अभिमानवंत जे जीव त्यांच्या भोगाकारणें ("सुखदुःख साक्षात्काराच्या सिद्धीकारणें") जीमध्यें तमोगुण मुख्य आहे, अशी पूर्वी सांगितलेली जी प्रकृति तिच्या सान्निध्येंकरून शासनादि शक्तियुक्त जो जगाचा अधिष्टाता परमेश्वर त्याच्या उत्पत्ति करण्याविषयीं इच्छारूप निमित्तास कारण भूत आज्ञेनें आकाश, वायु, तेज, उदक, आणि पृथ्वि, हीं पांच उत्पन्न झालीं. आकाशादि पंचभूताच्या सत्वगुण भागानीं कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि नासिका हीं पांच ज्ञानेंद्रियें क्रमानें एक एकाच्या सत्वांशापासून एकेक उत्पन्न होतात ( आकाश-कर्ण, वायू—त्वचा, तेज नेत्र, उदक--जिव्हा, आणि नासिका, ) पंचभूतांचें सर्व सत्वांश एकरूप होऊन अंतःकरण झालें, तें अंतःकरण वृत्तिभेदानें मन आणि बुद्धि असें दोन प्रकारचें झालें. त्या दोघांचें स्वरूप सांगतों. संशयात्मक जी वृत्ति तें मन आणि निश्चयात्मक जी वृत्ति ती बुद्धि जाणावी. व आकाशादि पंचभूतांचे जे रजोभाग ते उपादान कारणभूत होऊन त्यापासून वाक्, पाणी, पाद, पायू आणि उपस्थ या नांवांचीं कर्मेंद्रियें उत्पन्न झालीं. पंचभूतांचे रजांश एकत्र होऊन प्राण निर्माण होतो, तो प्राण वृत्तिभेदानें प्राण, अपान, व्यान, उदान, आणि समान या नांवांनीं पांच प्रकारचा होतो. असें बुद्धि, मन, पंचकर्मेंद्रियें, आणि पंचप्राण अशा सप्तदश संख्येनें सूक्ष्मशरीर होतें, त्यासच **श्रीमच्छंकरा**चार्य, **विद्यारण्य**प्रभृति जे जे वेदांती ते लिंगशरीर असें ह्मणतात. प्राज्ञ ( मलिनसत्व प्रधान अविद्योपाधिकजीव ) तो शद्बानें बोलण्यास योग्य जें अंतःकरण त्यानें उपलक्षित जें लिंगशरीर त्याचें ठायीं तादात्म्याध्यासाभिमानानें तैजस् नांव पावला, आणि विशुद्धसत्व प्रधान मायोपाधिक परमेश्वर लिंग शरीराचेंठायीं अहं अशा अभिमानानें हिरण्यगर्भ नांव पावला. आतां तैजस् जो जीव व हिरण्यगर्भ जो ईश्वर या दोघांस ही लिंग शरीराचा अभिमान जर सारखा आहे, तर दोघें ही समान झालें. मग परस्परें त्या एकएकास भेदीं बंधन कां, अशी शंका घेशील तर तैजस् जीवास व्यष्टित्व आहे; आणि हिरण्यगर्भ ईश्वरास समष्टित्व आहे. एवढ्याच करितां त्या दोघांमध्यें भेद सांगितला आहे.

हिरण्यगर्भ जो ईश्वर तो संपूर्ण जीवांच्या एकत्वाच्या जाणण्यानें समष्टी होतो. आणि ईश्वरावाचून दुसरे जे जीव आहेत ते सर्वांच्या एकपणाच्या ज्ञानाभावानें व्यष्टिसंज्ञेनें सांगितले जातात. आतां स्थूलशरीराची उत्पत्ति निरूपितों. भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न जो परमेश्वर तो पुनः पुनः जीवाच्या भोगाकारणें भोग्य जें अन्नपानादि विषय त्या भोगाचें स्थान जें स्थूलशरीर, त्याच्या उत्पत्ति करितां आकाशादि भूतपंचकाप्रत एकेकास पांच प्रकारें करिता झाला. प्रथम पंचभूतें एकेक द्विधा केलीं. पांचाचें जे अर्धविभाग त्यास दुसरे जे अर्धविभाग आहेत ते एकेक चतुर्धाकरून ज्याना जो स्वविभाग तो वेगळा करून इतर चार विभागासी मेळविला. याप्रकारे पंचीकरण केलें. तें जें पंचीकृत ब्रंह्मांड उत्पन्न झालें, त्या ब्रंह्मांडांतील भूम्यादि व अतलादि चतुर्दश भूवनें त्याचे ठायीं प्राण्यांनीं उपभोगावयास योग्य अन्नादि विषय उत्पन्न करून त्यांच्या उपभोगाकरितां आकाशादि पंचभूतांचे शब्दादि हे गुण कर्णादि इंद्रियांस अनुक्रमें विषय होऊन असे अनेक प्रकार युक्त ईश्वराज्ञेनें स्थूल शरीर निर्माण झालें. त्या स्थूल शरीराचें ठायीं अभिमानवंत जो हिरण्यगर्भ ईश्वर त्यास वैश्वानर अशी संज्ञा प्राप्त झाली. आणि तैजस् जो जीव तो स्थूल शरीराभिमानी होऊन त्यास विश्व ही संज्ञा प्राप्त झाली. ह्याप्रमाणें पातंजली पंचीकरणावरून व पंचदशी शारीर भाष्यादि ग्रंथावरून शरीरत्रययुक्त प्राणी व ब्रम्हांड इत्यादि जगदुत्पत्ति संक्षेपानें निवेदन केली. आतां या शरीर त्रयांचेंठायीं पंचकोश आहेत त्याचें विवरण करितों. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय, असें हे पंचकोश आहेत. यांना कोश ह्मणण्याचे कारण असें आहे कीं यांच्या योगानें स्वात्मा अछादित होत्साता स्वस्वरूप विस्मरणें करून संसृतिते ( जन्ममरण रूप संसाराते ) पावतो. जसा कोश आपल्या अवरकत्वानें कोशकार किड्यांस क्लेश कारण होतो त्याच प्रमाणें हें अन्नमयादीक आवरकत्वें करून आत्म्याच्या क्लेशास कारण होतात. या करितां त्यांस कोश असें ह्मणतात. आतां पंचीकृत भूतांपासून उत्पन्न झालेला जो स्थूल देह तोच अन्न संज्ञक कोश होय. लिंग शरीराचेंठायीं वागणारे प्राणापानादि पंच वायु आणि वाक्पाण्यादि कर्मेंद्रिय पंचक अशा देहास प्राणमय कोश अशी संज्ञा आहे. पंच

भूतांचें सत्व कार्य असें जें संशयात्मक मन, तें बुद्धि आणि कर्णादि पंच ज्ञानेंद्रियें यांच्या सहवर्तमान मनोमय संज्ञक कोश होय. लिंग शरीराचेठायीं सत्वगुण कार्यरूप निश्चयात्मक बुद्धि आणि पूर्वोक्त श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियें यास विज्ञान मय कोश असें म्हणतात. कारण शरीर (कारणभूत अविद्या जी मलिन सत्व प्रधान ) तिच्याठायीं इछित वस्तूंचें दर्शन, स्पर्श, लाभ, भोग, इत्यादिवांपासून होणाऱ्या सुख विशेषासहवर्तमान आनंदमय कोश होय. असें पंचकोशाचें विवेचन केलें. आतां अशा पंच कोशाचा अन्वय व्यतिरेकांनीं निरास केला जातो. ह्याप्रमाणें पंचकोश युक्त शरीरत्रय व जगदुत्पति ईश्वराच्या चिच्छक्तीच्या योगानें प्रकृती पासून झाली. आतां प्रकृती जर मिथ्या आहे तर तिचें गुणमय जगत्कार्य सत्य कोठून असणार? ह्मणून जीवांनीं पंचकोशाचा निरास करून योगमार्गानें सर्व शक्तिमान् सर्वज्ञ आणि अव्यय असा जो परमेश्वर त्याची उपासना करावी.

**ज्ञानदेव**—प्रकृतिजन्य जर सर्व मिथ्या आहे तर जीवही प्रकृति पासुनच झाला आहे. म्हणून तोही मिथ्या आहे. तर मिथ्या जीवांनीं उपासना करावी हें वचन मिथ्या होय.

**निवृत्ति**—पूर्वोक्त शुद्धसत्व प्रधान जी माया तिजमध्यें प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्यास ईश्वर असें ह्मणतात. आणि मलिनत्व प्रधान जी अविद्या तिजमध्यें प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्यास जीव असें म्हणतात. आतां परमार्थ दृष्टीनें पाहिलें असतां माया विद्याकल्पित जीवेश्वर आहे, असें सिद्ध होतें. ह्याविषयीं **मायीसईश्वरः अविद्यावशगोजीवः** असें श्रुति प्रमाण आहे. **श्लो० मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतत्वतः ॥ मायिकावेवजीवेशौस्वस्थौ ांकाच कुंभवत् ॥१॥ मायाख्यायाः कामधेनोः वत्सौ जीवेश्वरावुभौ ॥ यथेच्छं पिबताद्वैतं तत्वंत्वद्वैतमेवही ॥ १ ॥ अर्थ ॥** माया आणि अविद्या, ह्या **ईश्वर** आणि जीव याजप्रत आपल्या अभासानें करितात. इत्यादि श्रुति माया विद्याधीन जें जीवेश्वराचें चिदाभास त्याचें मायिकत्व प्रतिपादितें. तें जर मायीक आहेत तर त्यास मायीक देहादिकाहून विलक्षणता नसावी. असें जर म्हणशील तर खरोखर नाहींच. पण दोघांची उत्पत्ति पृथ्वीपासून असतां जसा काचेचा घट मातीच्या घटाहून

विलक्षण दिसतो, त्याप्रमाणें हे ही देह विलक्षण दिसतात. असो, या कामधेनूरूप मायेचें जीवेश्वररूप वत्स द्वैतरूप दुग्धाप्रत यथेच्छ प्राशन करितात. परंतु खरें तत्व ह्मटलें तर अद्वैतच होय. असें विद्यारण्य स्वामीचें मत आहें. जसें आपलें मुख स्वच्छ असून शुद्ध दर्पणीं आणि मलीन छिन्न दर्पणीं पाहिलें असतां एक प्रतिबिंब स्वच्छ, दुसरें मलीन आणि नानात्व युक्त असें दिसतें. याचें कारण ती दर्पणें होत. प्रतिबिंबाधिष्ठान मुखाकडे पाहिलें असतां मलीनत्व व छिन्नत्व मुळींच नाहीं. तसें हा स्वतः सच्चिदानंदरूप आत्मा असून माया विद्योपाधीनें जीवेश्वराप्रत पावला. यांचें अधिष्ठान स्वरूप सत्यं ज्ञान मनंतं ब्रम्ह एतत् रूप आहे. त्याचें विस्मरण होऊन अवस्था सप्तकानें जीवेश्वर-त्याप्रत प्राप्त होऊन हा संसृतिबंध पावला. म्हणून जीवांनीं माया विद्योपाधींचा तत्वमस्यादि वाक्यानीं निरास करून आपलें सच्चिदानंद स्वरूप जाणण्याकरितां ब्रह्मोपासना केली पाहिजे.

**ज्ञानदेव**--शरीरांतर्गत सच्चिदानंद स्वरूप आत्मा आहे, असा आह्माला अनुभव नाहीं. पूर्वोक्त अवस्थासप्तक ह्मणजे काय ?

**निवृत्ति**--माझ्या शरीरीं आत्मा नाहीं हें भाषणच मिथ्या होय. कारण ज्या आत्म्याच्या अस्तित्वामुळें तूं व्यवहार करितोस त्यास नाहीं ह्मणणें लज्जास्पद होय. नाहीं ह्मणशील तर पूर्वोक्त **जिव्हामेस्ति नवेत्युक्तिः**, ह्याप्रमाणें व्याघात् प्राप्ती होते. म्हणून तुझा प्रश्नच व्यर्थ होय. तथापि तुला आत्मस्वरूप लक्षण सांगतों. नारदपुराण **श्लो०॥ अस्ति भाति प्रियत्वंच सच्चिदानंद लक्षणं ॥ आत्मनोपि तदैवाह याज्ञवल्क्यो मुनीन् प्रती ॥ १ ॥ अर्थ**--पूर्वीं याज्ञवल्क्यऋषी मुनीला बोध करीत असतां त्यांनीं असें सांगितलें कीं सच्चिदानंदरूप जो आत्मा त्याच्या अस्तिभाति प्रियत्वाचा अनुभव प्राणिमात्रास नित्यशः येत असतां त्या आत्म्यास कोणी ही जाणत नाहींत.

**ज्ञानदेव**.--तो अनुभव कसा येतो.

**निवृत्तिः**--तो अनुभव अस्ति भाति प्रियत्व लक्षणानें येतो. आतां प्रथम अस्तित्व लक्षण सांगतों--प्राणिमात्रास **मानभूवांह भूयसं** ह्मणजे मी नसावें, मी नाहीं असें कधीं ही वाटत नाहीं. मी निरंतर आहें, हें सर्वांच्या अनुभवास येतें. यावरून आत्म्याचें अस्तित्व सिद्ध आहें.

दुसरे भाति लक्षण प्रतिपादन करितों. आत्मा संवित् रूप स्वप्रकाश आहे. असें **सैषास्वयं प्रभासंवित्** श्रुतीनें सांगितलें आहे. तो आत्मा या ब्रम्हांडांतील घटादि सर्व पदार्थांचा भासक होतो. परंतु त्याचा भासक कोणी नाहीं. प्राणिमात्राच्या शरीरांत ज्या जागृति स्वप्न, आणि सुषुप्ती, अशा तीन अवस्था आहेत, त्या तीन अवस्थेंत ज्ञानभेदाते न पावतां एक रूपच असते. हें आत्म्याचें भाति लक्षण होय. आतां प्रियत्व लक्षण कथन करितों. सर्वत्रांस आत्म्याहून दुसरे या जगतांत कोणी नाहीं. अत्म्यास परप्रेमास्पदत्व आहें. आत्म्याचे ठायीं धिक् अशा द्वेषाच्या उपलभ्य मानत्वानें परप्रेमास्पदत्व असिद्ध झालें, अशी शंका घेशील तर आपण धिक् झालो असा जो द्वेष तो दुःख संबंध निमित्येकरून होतो. परंतु आत्म्याचें परप्रेमास्पदत्व अनुभव सिद्ध नाहीं असें नाहीं. पुत्रादिकाचें ठायीं आपणाहून अतिरिक्त जें प्रेम तें आपणाकारणें त्याचें ठायीं प्रेम आहें. असाच आत्मनिमित्येंकरून अन्यत्राचे ठायीं ही प्रेमा आहे. ह्याविषयीं श्रुति प्रमाण आहे. **श्लो० ॥ बोधयामास मैत्रेयीं याज्ञवल्क्यो निजप्रियां ॥ नवा अरे पत्युरर्थे पतीप्रिय इतीरयन् ॥** १ ॥ **अर्थ**-पूर्वी याज्ञवल्क्य नांवाचा ऋषी मैत्रेयी नामक आपल्या प्रियपत्नीप्रत सांगता झाला कीं हे मैत्रेयी ! स्त्रीला पति प्रिय होतो, तो कांहीं पतीकरितां नव्हे. तर तिच्या स्वतःच्या इच्छे करिता, असेच पत्नी, पुत्र, द्रव्य, बंधु, इत्यादि संपूर्ण भोग्यजात भोक्त्याच्याच संबंधानें प्रिय आहेत. ते स्वतः स्वरूपानें नाहींत. ज्या कालीं पत्नीस पतीविषयीं इच्छा उत्पन्न होतें त्या कालीं ती पत्नी पतीचें ठायीं स्नेह करते. पती करितां करीत नाहीं. कारण, स्त्री इच्छा संबधानें पतीवर प्रीत करीत असतां ही तिचा पति जर क्षुधा, तृषा, रोग, इत्यादिकांनीं पीडित असला तर तो तिजप्रत इछित नाहीं. ह्मणून जायेनें केलेली प्रीति पतीकरितां नव्हे, तर ती केवल आपल्या स्वार्था करितांच करिते. तसेंच पतीस जाया प्रिय होते ती तिच्या करितां नव्हे, तर पतीच्याच इच्छे करितां जाया प्रिय होते. याचप्रमाणें संपूर्ण प्रिय वस्तू आत्मकामाकरिताच प्रिय होतात. दृष्टांत, पंचदशी. **श्लो० ॥ श्मश्रु कंटकवेधेन बालोरुदातितात्पिता ॥ चुंबत्येव न सा**

**प्रीतिर्बालार्थे स्वार्थएव सा** ॥ १ ॥ **अर्थ**--पित्यानें केलेलें पुत्र मुखाचें चुंबन पुत्र प्रीतिकरितां नव्हे, तर केवल आपल्याच संतोषा करितां, कारण पुत्र प्रीतीकरितां जर ह्मणावे तर हा चुंबन करीत असतां याच्या दाढी मिशाचे केस ( खुंट ) पुत्राच्या कोमल मुखास रुतून त्या वेधानें तो रडतो, अर्थात ही पुत्र प्रीति नव्हे. आतां अचेतना विषयींही तसेंच आहें. वित्ताकरितां वित्त प्रिय होत नाहीं, तर आपल्या इच्छे करितां प्रिय होतें, ह्मणूनच मनुष्य त्या वित्ताचें मोठ्या प्रयत्नानें संरक्षण करितात. असेच सर्व दृश्य पदार्थ होय. असो, तार्तम्यानें प्रीतीचा अनुभव स्पष्ट करितों. पंचदशी **श्लो०** ॥ **वित्तात्पुत्रप्रियः पुत्रात्पिंडः पिंडात्तथेंद्रियं ॥ इंद्रियाच्चप्रियः प्राणः प्राणादात्मापरप्रियः** ॥ १ ॥ **अर्थ**—वित्ताहून पुत्र, पुत्रांहून पिंड ( अन्नमयदेह ) देहाहून इंद्रिय, इंद्रियाहून प्राण आणि सर्वांहून आत्मा अति प्रीय आहे. संपूर्ण प्राणी पुत्रादिकाकरितां द्रव्य नाश करितात. देह रक्षणाकरितां पुत्रादिकांचा त्याग करितात इंद्रियरक्षणाकरितां देह पीडा करितात आणि प्राण रक्षणा करितां इंद्रियवैकल्य ही करितात. अर्थात एकाहून दुसरे अधिक प्रिय हें सर्वानुभव सिद्ध, आणि आत्म्याचें निरतिशय प्रेमास्पदत्व विद्वानाच्या अनुभवानें सिद्ध आहें. ह्याप्रमाणें **नवाअरेपत्युःकामाय पतिः प्रियोभवति** येथून **आत्मनस्तुकामायसर्वंप्रियंभवति** येथपर्यंत श्रुतिपर्यालोचनानें आत्म्याचें प्रियतमत्व वर्णून आतां तें युक्तिद्वारा दाखवितों. सुख साधन अशी जीं स्त्रीपुत्रादिकें त्या सर्वांवर प्रीति आत्म्याकरितांच असल्यामुळें सर्वांहून आत्मा अतिप्रीय आहे हें सिद्ध आहें. जसें, पुत्राकरितां ज्यावर प्रीति करावयाची अशा पुत्र मित्रापेक्षां पुत्र अधिक प्रिय असतो, तसेंच आत्म्याकरितां ज्या स्त्री पुत्रादिकांवर प्रीति करावयाची त्या स्त्रीपुत्रादिकापेक्षां आत्मा अधिक प्रीय आहे, असें युक्तीनें ही सिद्ध होतें. ह्मणून आत्म्याचें परप्रेमास्पदत्व शास्त्रानें व युक्तीनें सिद्ध आहें. असा आत्म्याचा अस्ति भाति प्रियत्वाचा अनुभव असतांही आत्मा नाहीं हें भाषण लज्जास्पद होय. आतां अवस्थासप्तक कथन करितों. अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकानिवृत्ति, आणि तृप्ति यांना अवस्था सप्तक ह्मणतात.

याचें अनुक्रमें वर्णन करितों—हा चिदाभास विषय संपादनादिकांचे ठायीं असक्तचित्त होत्साता श्रुति विचारापूर्वी कधींही आपलें निज स्वरूप जो स्वयंप्रकाश कूटस्थ ( प्रत्यगात्मा ) त्याप्रत जाणत नाहीं. यास अज्ञान ह्मणावें. शास्त्रोक्त प्रकार उल्लंघून केवल स्वतर्केंकरून विचारानंतर कूटस्थ आत्मा नाहीं व तो भासत नाहीं, असा जो विपरीत व्यवहार तेंच अज्ञानकृत् आवरण ह्मणावें. आत्मा नाहीं असें कल्पून कर्ता भोक्ता मीच आहें, असेंही ह्मणतो याचें कारण स्थूल सूक्ष्माख्य शरीरद्वयसहित जो चिदाभास त्यासच विक्षेप ह्मणतात. वेदशास्त्र पुराणें यांनीं सांगितलें कीं कूटस्थ आहें, त्या वार्तेनें जें जाणिलें हें परोक्ष ज्ञान; आणि स्वतः श्रवणादि परिपाक वशेकरून (विचारेंकरून) कूटस्थ स्वयं प्रकाश जो आत्मा तो मीच आहें असें जाणतो हें अपरोक्षज्ञान ह्मणावें. मी कूटस्थ असंग आत्मा आहें अशा आत्मज्ञाना नंतर कर्तृत्वादि संसृति संबंधी शोकाचा त्याग करितो यास शोक निवृत्ति ह्मणतात. सर्व संसार निवृत्त झाला असतां नित्य मुक्तत्व भासत. आणि पुनः शोकाचा उद्भव नसल्यामुळें निरंकुश तृप्ति होते, ह्मणून तृप्ति असें ह्मणतात. दृष्टांत—श्लो० पं० ॥ **नवसंख्याहृतज्ञानो दशमो विभ्रमात्तदा ॥ नवेत्तिदशमोस्मीति वीक्ष्यमाणोपि नान्नव** ॥ १ ॥ अर्थ ॥ कोणी प्रवासी दहा पुरुष मार्गीं प्राप्त झालेली जी नदी तिचें उल्लंघन करून पैलतीरीं गेल्यावर आपली संख्या मोजीत असतां मोजणारा आपल्यावांचून भ्रमानें इतर नवासच मोजतो, येथें त्याला सर्वांची माहिती असते व त्यांच्याकडे पहातही असतो, तथापि इतर नऊ व दहावा मी हें भ्रांतीनें जाणत नाहीं. हें अज्ञान कार्य होय. स्वतः दशम आपण असतां दशम दिसत नाहीं आणि नाहीं असें मानून जें बोलणें तें अज्ञानकृत आवरण त्याचें ठायीं प्राप्त झालें. दशम नाहीं असा वृत्तीनें निश्चय करून तो नदीचें ठायीं मेला असा शोक करून रोदन करितात या रोदनाप्रत ज्ञाते लोक अज्ञानकृत विक्षेप असें ह्मणतात. दशम मेला नाहीं तो जिवंत आहे असें आप्तमुखांतील वचन श्रवणकरून परोक्षत्वानें दशमाप्रत जाणतो. जसें स्वर्गादि लोक आहेत असें ऐकणें तें परोक्षज्ञान होय. आणि दशम पुरुषाकडून नऊ पुरुषांची गणना करवून तूं स्वतः दहावा, असें जेव्हां

मोजून दाखविलें तेव्हां बरोबर मीच दहावा असें अपरोक्ष ज्ञान पावून शोक रहित झाले. अर्थात् त्या योगानें तृप्तिही प्राप्त झाली. आतां या सप्तकांचें ठायीं बंधमोक्ष आहेत त्यापैकीं अज्ञान, आवरण, आणि विक्षेप या तीन अवस्था बंधकारी आहेत. अर्थात् बाकीच्या मोक्षकारी. असें बंधहेतुअवस्थात्रय सांगून बाकीच्या अवस्थांतून पूर्वोक्त अज्ञान आवरण यांचे निवृत्तिद्वारा मुक्तिहेतु अशा अवस्थाप्रत सांगतों. परोक्ष आणि अपरोक्ष या ज्ञानद्वयेंकरून अज्ञान आणि तत्कृत् आवरण नाशाप्रत पावतें. अज्ञान आणि आवरण यांची निवृत्ति झाली असतां भ्रांतीकरून प्रतीयमान जीवत्वाची हानी होते, यामुळें तन्निमित्तक कर्तृत्वादि लक्षण संसार संज्ञक शोक सर्व निवृत्त होतो. अशी शोक निवृत्ति झाल्यावर निरंकुश तृप्ति प्राप्त होते. ह्याप्रमाणें चिदाभासाचे ठायीं जें अवस्थासप्तक त्याचें वर्णन केलें. आतां पंचकोशाचा निरास कसा करावा तो कथन करितों.—प्रत्यगात्मा अन्नमयादि पंच कोशासी तादात्म्याभिमानें करून तन्मय होता ( कोशमय होतो ) त्या आत्म्याचें वैलक्षण्य अन्वयव्यतिरेकांच्या योगानें स्पष्ट कळतें. स्वप्नावस्थेचे ठायीं स्थूलदेहाचें अभान ( अप्रतीति ) झालें असतां तेथें आत्म्याचें स्वप्न साक्षित्वेकरून जें स्फुरण आहे, तो आत्म्याचा अन्वय, आणि त्याच अवस्थेचे ठायीं जी स्थूलदेहाची अप्रतीति हा व्यतिरेक होय. या प्रकर्णीं अन्वय व्यतिरेकशब्दांनीं अनुवृत्ति आणि व्यावृत्ति बोलिजेली. स्थूलदेह स्वप्न अवस्थेचे ठायीं भासत नाहीं, या कारणास्तव अनात्मबोधकता दाखविली, इला व्यावृत्ति ह्मणतात. आणि स्थूलदेहीं जें आत्मस्फुरण तेंच स्वप्न अवस्थेचे ठायीं स्फुरण आहे ही अनुवृत्ति ( आत्मबोधकता ) दाखविली. तसेंच सुप्तावस्थेचे ठायीं लिंगदेहाची अप्रतीति झाली असतां आत्म्याचें जें भान [ सुषुप्ति अवस्थेच्या साक्षित्वे करून स्फुरण ] तोच अत्म्याचा अन्वय होय. आणि आत्म्याचें स्फुरण झालें असतां लिंग देहाचें जें अभान तो व्यतिरेक होय. त्या लिंग देहाच्या विवेचनानें प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय एतन्नामक कोश आत्म्यापासून वेगळे केलेलें होत. तसेंच समाधी अवस्थेचे ठायीं सुषुप्ति शद्ब करून उपलक्षित जें ( ओळखलें जाते ते ) कारण देह रूप अज्ञान त्याची अप्रतीति आणि आ-

त्म्याचें जें भान ( स्फुरण ) आहे, हा आत्म्याचा अन्वय होय. आणि त्या अवस्थेचे ठायीं सुषुप्ति उपलक्षित अज्ञान याची जी अप्रतीति आणि आत्म्याचें भान याचें नांव व्यतिरेक होय. प्रत्यगात्मा अन्नमयादि कोशापासून वेगळा केला, तो कोशभेदाते पावत नाहीं. कोश अवस्थापरस्परें निवर्ततात. जसें पुष्पमाळेचे ठायीं सूत्र खंडन पावत् नाहीं तसें आत्मस्वरूप कोश भेदाते पावत नाहीं. ह्याप्रमाणें तुला पंचकोशाचा अन्वय व्यतिरेक निवेदन केला.

**ज्ञानदेव**--अन्नमयादि पंचकोशास आत्मा कां ह्मणूनये.

**निवृत्ति**-- ( **सत्यंज्ञानमनंतंब्रम्ह, योवेदनिहितं गुहायां परमे व्योमन्** ) या श्रुतिमध्यें अन्नमयादि आनंदमयपर्यंत कोशाची जी परंपरा तीच गुहा शद्बानें बोलिजेली. तें सत्य ज्ञानानंत स्वरूप जें ब्रह्म तें या गुहेंमध्यें स्थित पुरूष गुहा होत नाहीं आणि गुहा पुरुष रूप होत नाहीं तसा आत्मा पंचकोश गुहामय नाहीं व पंचकोश गुहा आत्मामय नाहीं हें सिद्ध आहें. अन्नमयादि कोशास आत्मा ह्मणावें तर तेथें आत्मलक्षण संभवत नाहीं. पहा, **पं० श्लोक ॥ पितृभुक्तान्नजाद्वीर्या ज्जातोन्नेनैववर्धते ॥ देहस्सान्नमयोनात्मा प्राकचोर्ध्वतद भावतः ॥ १ ॥ अर्थ ॥** मातापित्यांनीं भक्षिलेल्या यववृह्यादि अन्नापासून जें वीर्य झालें त्यापासून देह निर्माण झाला. जो जन्मानंतर क्षीरादि अन्नेंकरून वाढतो तो देह अन्नमय आत्मा होत नाहीं; कारण जन्माहून पूर्वीं आणि मरणानंतर या देहाचा अभाव आहे, ह्मणन देह आत्मा नव्हे. जसा घट मृत्तिकेचें कार्य तसा देह अन्नादिकांचें कार्य आहे. या देहास दुःख, व्याधी, मरण, जन्म, पाश. इत्यादिक आहेत, आणि आत्मा अविनाशी आहे. ह्याविषयीं **तदव्ययं** असें श्रुति प्रमाण आहें. व **गीता** श्लो० ॥ **नजायतेम्रीयतेवाकदाचिन्नायं भूत्वा भवितावानभूयः ॥ अजोनित्यःशाश्वतोयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे** ॥ १ ॥ श्लो० भा० **नात्मा जजान न मरिष्यति नैधतेसौ न क्षीयतेसवनवित् व्यभिचारिणांहि ॥ रामगीता** श्लो० ॥ **कदाचिदात्मा न मृतो न जायतेनक्षीयतेनापि विवर्धतेनवः** ॥ अशीं बहुत प्रमाणें आहेत. आत्मा उत्पन्न होत नाहीं. त्यास मरण नाहीं. व वृद्धीही नाहीं. तो

झाला नाहीं व होत नाहीं. तो अजन्मा, नित्य, पुरातन, शाश्वत आहे; ह्मणून नाशाप्रत पावत नाहीं. व अन्नमय देह नाश पावतो. तस्मात् त्यास आत्मत्व संभवत नाहीं. आतां प्राणमय कोशास आत्मा ह्मणावें तर श्लो० पं० ॥ पूर्णोदेहेबलंयच्छन्नक्षाणांयःप्रवर्तकः॥ वायुः प्राणमयो नासा वात्माचैतन्य वर्जनात् ॥१॥ अर्थ ॥ जो वायु देहाचे ठायीं अपाद मस्तकापर्यंत व्याप्त असून व्यान रूपानें सामर्थ्य प्रेरितो. चक्षुरादि इंद्रियांचा प्रवर्तक होतो. अशा प्राणमय कोशास आत्मत्वयुक्त नव्हे. कारण हा चैतन्यरूप नव्हे. जसा घट जड तसा प्राण ही जड आहे. यास ज्ञान नाहीं. मत्स्येंद्रसंहिता श्लो० सुप्तौ जागर्त्यसौ प्राणश्चोरादीन्न निवारयेत् ॥ अतोज्ञस्य जडस्यास्य ह्यात्मवं नैवसंभवेत् ॥ १ ॥ अर्थ—प्राणी निद्रिस्त झाला असतां त्याच्या शरीरांतर्गतीं श्वासोच्छ्वासादि प्राणादि वायूचा संचार असतो. त्याविळेस चोर वस्त्रभूषणें नेत असतां तो प्राण त्या चोरांचें निवारण करीत नाहीं. व अन्नादिकांवाचून प्राण फार व्याकूळ होतो, असा सर्वांस अनुभव आहे. तस्मात् प्राण जड व अज्ञान आहे. त्यास आत्मत्व संभवत नाहीं. आतां मनोमय कोशास आत्मा ह्मणावें तर पं० श्लो० ॥ अहंतांममतांदेहेगेहादौचकरोतियः ॥ कामाद्यवस्थया भ्रांतोनासावात्मामनोमयः ॥ १ ॥ अर्थ० ॥ देह मी असा अभिमान देहाचे ठायीं आणि हें माझें अशी ममता गृहादिकांचे ठायीं धरितो तो मनोमय कोश आत्मा नव्हे. कारण कामक्रोधादि वृत्तिमत्वानें अपरमित स्वभावामुळें विकारित्वानें देहासारिखाच आहे. त्यास चंचलत्व आहे. व संकल्प विकल्पानें सुख दुःखाप्रत प्राप्त होतो. ह्मणून मनोमय कोशास आत्मत्व संभवत नाहीं. आतां विज्ञानमय कोशास आत्मा ह्मणावें तर, पं० श्लो० ॥ लीनासुप्तौवपुर्बोधं व्याप्नुयादानखाग्रगा ॥ चिच्छायोपेतधीर्नात्माविज्ञानमयशब्दभाक् ॥ १ ॥ अर्थ० ॥ जी चिदाभास सहित बुद्धि सुषुप्ति अवस्थेचे ठायीं लीन झाली असतां आणि जागृतकालीं आनखाग्रपर्यंत वर्तमान असतां शरीरास व्यापून असते. अशा विज्ञानमय कोशास घटादिकाप्रमाणें विलय अवस्था आहे, ह्मणून हा कोश आत्मा नव्हे. कारण बुद्धि विषयप्राप्तीच्या योगानें व अप्राप्तीच्या योगानें सुख

दुःखाप्रत पावते, ह्मणून तो विज्ञानमय कोश आत्मा नव्हे. आतां आनंदमय कोशास आत्मा ह्मणावें तर--श्लो० पं० ॥ कादाचित्कत्वतोनात्मास्यादानंदमयोप्ययं ॥ बिंबभूतोयआनंदआत्मासौ सर्वदास्थितः ॥ १ ॥ अर्थ ॥ हा आनंदमय कोश कदाचित् अन्नादि पदार्थांप्रमाणें सत्यरूप भासतो, पण तो आत्मा नव्हे. विद्यमान आनंदमयादि सर्व कोशांच्या आत्मत्वनिरासानें नैरात्म्य येऊं पहातें. अशी शंका घेशील तर बुध्यादिकांचे ठायीं प्रतिबिंबत्वानें रहाणारा क्रियादि शद्ववाच्य जो आनंदमय कोश त्याचा बिंबभूत ( कारणभूत ) जो आनंद तो नित्यत्वामुळें आत्मा होतो. विवादाध्यासित आनंद नित्यत्वानें आत्मा होण्यास योग्य आहे. जो आत्मा होत नाहीं तो नित्य नव्हे. जसें देहादीक गगनादिकांच्या उत्पत्तिमत्वानें अनित्य आहेत, ह्मणूनच आत्मत्वास योग्य नाहींत, असें पंचकोशाच्या विवरणाविषयीं तैतर्य श्रुति प्रमाण आहे. पं० श्लो० ॥ भृगुःपुत्रःपितुःश्रुत्वा वरुणा ब्रम्हलक्षणं ॥ अन्नप्राणमनोबुद्धीस्त्यक्त्वानंदं विजज्ञिवान् ॥ १ ॥ अर्थ० ॥ पूर्वीं भृगू या नांवाचा ऋषी आपल्या वरुणाख्य पित्या पासून. यतोवाइमानि भूतानिजायंते, येनजातानि जीवंति, यत्प्रयंत्यभिसंविशंति॥ असें ब्रह्मलक्षण ऐकून,—"अन्नं ब्रम्हेति व्यजानात्, सएवाएषपुरुषोन्नरसमयः, स तपस्तप्त्वा अन्नादेवखल्विमानिभूतानि जायंते, इत्यादि—"एतस्माद्वा तस्मात् अन्नमयात्प्राणमयो आत्मा अन्योंतरः, प्राणब्रम्हेतिव्यजानात् प्राणादेव खल्विमानि भूतानि जायंते इत्यादि—सतपस्तप्त्वा तस्माद्वाएतस्मात् प्राणमयात् अन्योंतर आत्मा मनोमयः मनो ब्रम्हेतिव्यजानात्, मनसोखल्विमानिभूतानि, इत्यादि. स तपस्तप्त्वा, तस्माद्वाएतस्मात् मनोमयात् अन्योंतर आत्मा विज्ञानमयः, विज्ञानंब्रम्हेति व्यजानात्, विज्ञानादेव, इत्यादि—स तपस्तप्त्वा, तस्माद्वाएतस्मात् विज्ञानमयात् अन्योंतर तमः आत्मानंदमयः इत्यादि प्रकारें करून ब्रह्मस्वरूप समजून घेऊन अन्नमयादि चार कोशाचे ठायीं ब्रह्म लक्षण नसल्यामुळें त्यांस ब्रम्हत्व नाहीं असा निश्चयकरून आनंदमय कोशांचे

ठायीं पंचावयवत्वानें " **ब्रम्हपुच्छंप्रतिष्ठा** " असा ऐकलेला जो बिंबभूतानंद त्याप्रत ब्रम्हत्वानें जाणता झाला. आनंदास ब्रम्हत्व कसें योजिता झाला, असें ह्मणशील तर "**आनंदादेव खल्विमानि भूतानि जायंते**" इत्यादि उपनिषद् वाक्याचा अर्थ प्रतिपादन करितों. ग्राम्यधर्म निमित्तकरूप आनंदापासून प्राणी उत्पन्न होतात. विषयभोग निमित्तकरूप आनंदानें त्यांचें जीवन होतें, आणि सुषुप्तिकालीन स्वस्वरूप भूत अशा त्या आनंदाचेठायीं त्यांचा लय होतो. सुप्त अवस्थेचेठायीं आनंदावाचून दुसरा कोणताच अनुभव नाहीं. म्हणून सर्वानुभवसिद्ध आनंद हेंच ब्रह्म होय, असें च्छांदग्योपनिषदामध्येंही सांगितलं आहे. असो, ह्याप्रमाणें तुला पंच कोशाचा निरास संक्षेपानें कथन केला. आतां तुला योगमार्गाचें प्रतिपादन करितों. योगाचें प्रकार अष्ट आहेत. परंतु योग म्हणजे निराकार अव्यय ब्रम्हाचा जो संयोग त्याला योग असें म्हणतात. कोणी मनाचे संकल्प विकल्प मावळून त्याची जी तादात्म्य अवस्था त्यास योग म्हणतात. " **योगश्चित्तवृत्तिनिरोधः** " असें पतंजलीचें सूत्र आहे. व " **अंतर्लक्षो बहिर्दृष्टिस्थिरचित्तः सुसंयत** " अशी योगशास्त्रांत उक्ति आहे. ह्मणून चित्तवृतीनें व्यापार रहित होऊन ब्रह्म चिंतन करणें यासच पतंजलीप्रभृति योग असें म्हणतात. अशा योग अवस्थेची प्राप्ती व्हावी म्हणून प्रथम भगवद्गीता, श्लोक० ॥ **शुचौदेशेप्रतिष्ठाप्यास्थिरमासनमात्मनः ॥ नात्युच्छ्रितंनातिनीचंचैलाजिनकुशोत्तरं** ॥ १ ॥ **अर्थ**—शुचिर्भूत प्रदेश पहावा. ज्या प्रदेशाचे ठायीं बहुत साधु वृंदांनीं तप केलें असेल ज्या स्थळाला अवलोकन केलें असतां विषयी व प्रपंचदक्ष लोकांस आनंद उत्पन्न होऊन सर्वदा येथेंच वास करावा असें वाटतें, जेथें भ्रमरादि मयूरांचा कामोत्पादक शब्द फारसा होत नाहीं, ज्या स्थलीं व्याघ्रादिक घातुक प्राणी संचार करीत नाहींत, व अल्प निर्झर प्रवाह चालले आहेत, जेथें गगनचुंबित फलित वृक्षांची गर्दी फारसी नाहीं, अशा प्रदेशांत जाऊन तेथें शिवालय किंवा सिद्धाश्रम असावा, नंतर स्नान संध्यादि ब्रह्मकर्म समाप्त करून भूमीवर कुशांकुर घालून त्यावर मृगाजिन आणि त्याच्यावर धौतवस्त्र असें आसन करावें. तें आसन फार उंच जर होईल तर सर्व अंग डोलेल,

त्या योगानें योगसिद्धि व्हावयाची नाहीं. व तें नीच जर होईल तर भूमिदोषाची प्राप्ती होईल, म्हणून मध्यम प्रकारचें आसन घालून हृदयीं इष्टदेवतेचें व सद्गुरूचें स्मरण करून त्यावर बसावें.-गीता श्लोक० ॥ **तत्रैकाग्रंमनकृत्वायतचित्तेंद्रियक्रियः** ॥ **उपविश्यासनेयुंज्यात् योगमात्मविशुद्धये** ॥ १ ॥ भागवत श्लोक०॥ **समआसनआसीनः ॥ समकायों यथासुखं ॥ हस्तावुत्संगआधायस्वनासाग्रकृनेक्षणः** ॥ १ ॥ **अर्थ** ०॥ तेथें एकाग्र मन करून सर्व चित्तादि इंद्रिय क्रियेचा उपरम करावा. योगसिद्धीकरितां त्या आसनावर बसून एक पाद भूमीवर ठेवावा. दुसऱ्या पायाची टांच मोठ्या जोरानें गुदद्वारीं द्यावी. त्यायोगानें वृषणाच्या अधोभागीच्या शिवणीस पिडा व्हावी, आणि द्वार बंद झाल्याकारणानें अपान वायूची गती ऊर्ध्व व्हावी. यास "**वज्रासन**" असें ह्मणतात. "**पद्मासन**" "**कुक्कुटासन.**" अशीं आसनें योग प्रकर्णांत बहुत वर्णिलीं आहेत. दोन हस्त उत्संगावर देऊन स्तब्ध बसावें. श्लोक० गीता० ॥ **समंकायशिरोग्रीवं धारयन्नचलंस्थिरः** ॥ **संप्रेक्ष्य नासिकाग्रंस्वंदिशश्चानवलोकयन्** ॥ १ ॥ अर्थ शरीर मस्तक आणि ग्रीवा सम धारण करून चलन व दिशेचें अवलोकन न करितां नेत्राची वरची पाती न ढळू देतां अधोभागीची नेत्रपातीमात्र पुंजाळते; अशी अर्धोन्मीलित दृष्टी नासिकाग्री ठेवावी. गीता० श्लोक० ॥ **प्रशांतात्माविगतभीः ब्रम्हचारिव्रतेस्थितः** ॥ **मनः संयम्यमच्चित्तोयुक्तआसीतमत्परः** ॥ १ ॥ अर्थ० ॥ शांत चित्त करून निर्भय होऊन ब्रह्मचारी व्रत स्थित होत्साता ब्रह्म तत्पर होण्यासाठीं योग करण्यास आरंभ करावा. पूरक, कुंभक आणि रेचक या तिहींच्या विपर्ययानें प्राणमार्गाचा शोध करावा.

**ज्ञानदेवः**—पूरक, कुंभक आणि रेचक ह्मणजे काय ?

**निवृत्तिः**—बाह्य वायूचें जें अंतःप्रवेश त्यास "**पूरक**" असें ह्मणतात. प्रवेशित वायूचें जें धारण त्यास "कुंभक असें ह्मणतात. आणि धृतवायूचें जें निःसारण त्यास "**रेचक**" असें म्हणतात. विपर्ययानें प्राणापान सम करून वायूची गती उर्ध्व करावी, शरीर अंतर्गत् षड्चक्रें आहेत त्यांचें उल्लंघन करावें. तीं कोणचीं असें ह्मण-

शील तर, प्रथम गुदस्थानीं आधारचक्र चतुर्दलात्मक आहे, त्याचें गणपती हें दैवत होय. वं शं षं सं ह्या त्या चक्राच्या मात्रा आहेत. पुढें लिंगस्थानीं स्वाधिष्ठानचक्र षड्दलात्मक आहे. त्याचें ब्रह्मासावित्री हें दैवत होय. बं भं मं यं रं लं अशा त्याच्या सहा मात्रा आहेत. पुढें नाभिस्थानीं मणिपूरचक्र दशदलात्मक आहे, त्याचें विष्णुकमलजा हें दैवत होय. डं ढं णं तं थं दं धं नं पं फं अशा दहा मात्रा आहेत. पुढें हृदयस्थानीं अनुहत चक्र द्वादशदलात्मक आहे त्याचें उमाशंकर हें दैवत होय त्याच्या कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं अशा द्वादशमात्रा आहेत. पुढें कंठस्थानीं विशुद्ध चक्र शोडष्दलात्मक आहे त्याचे चंद्रमा हें दैवत होय. त्याच्या अं आं इं ईं उंऊं ऋंॠं ऌंॡं एंऐं ओंऔं अंअः अशा शोडष् मात्रा आहेत. पुढें नासिकाग्रीं अग्निचक्र द्विदलात्मक आहे. तेथें इडा, पिंगला, आणि सुषुम्ना अशा तीन नाड्या वास्तव्य करितात. त्याचें आत्मा हें दैवत होय. हं सं त्याच्या अशा दोन मात्रा आहेत. ह्याप्रमाणें पिंडीची षड् चक्रें निवेदन केली. ह्या चक्रस्थ गणेशादि दैवतांचा जप २१६०० एकवीस सहस्त्र सहा शतें करावा लागतो, असें मंत्रशास्त्रोक्त ऋषभप्रयोगात सांगितलें आहे. व स्वासोश्वास तत्प्रयुक्त हंसरूपानें शिवशक्तीची उपासना करावी असें शंकरकृत स्वरोदयांत सांगितलें आहे. आतां ब्रह्मांडांतील षड्चक्रें कथन करितों. **त्रिकुट, गोल्हाट, औठपीठ, भ्रमरगुंफा, ब्रम्हरंध्र** आणि **सहस्त्रदल**, ह्याप्रमाणें द्वादश चक्राचें उल्लंघन करून पंचवायू सहस्त्रदलीं आल्यानंतर तेथेंच योगी ब्रह्योपासना करितात. असें श्रुति प्रमाण आहे. हा योग. **श्लो०गीता—नात्यश्नतस्तुयोगोस्ति नचैकांत मनश्नतः ॥ नचातिस्वप्नशीलस्य जागृतोनैवचार्जुन ॥ १ ॥ युक्ताहार विहारस्य युक्त चेष्टस्य कर्मसु ॥ युक्तस्वप्नावबोधस्य योगोभवतिदुःखहा ॥ १ ॥** अर्थ० ॥ अत्यशन करणाराला व निराहार करणाराला किंवा अति निद्रालुला व अति जागृताला योग होत नाहीं तर अहार, विहार, चेष्टा, स्वप्न आणि जागृती इतके जो पुरुष युक्त ठेवील त्यास हा योग सुखकारक होईल ह्या योगाप्रमाणें ब्रह्म प्राप्तीचें साधन कोणचेच नाहीं. इंद्रियांचे सर्व विकार मावळून चित्तवृत्ती—श्लो० ॥ गीता०—**यथादीपो निवात-**

स्थोनेंगते सोपमास्मृता ॥ अर्थ० जसा निवातस्थदीप चंचल होत नाहीं तशी वृत्तीही चंचल होत नाहीं. योगी यास परमलाभ असें ह्मणतात. गीता श्लो० ॥ यंलब्ध्वाचापरंलाभंमन्यतेनाधिकंततः ॥ यस्मिंस्थितोनदुःखेन गुरुणापिविचाल्यते ॥ १ ॥ अर्थ० ॥ ह्या योगाप्रत प्राप्त होऊन याहून दुसरा कोणचाच लाभ नाहीं असें योगी मानितात. कारण योग स्थिताच्या देहाला अति दुःख जरी प्राप्त झालें तरी त्याची चित्तवृत्ती चंचल कधींहीं होत नाहीं. असें योग सुख अतींद्रिय बुद्धिग्राह्य आहे. असो, हा योग मार्ग पतंजली ग्रथित तुला सांगितला. ह्याप्रमाणें पूर्वोक्त अन्वय व्यतिरेकांनीं पंचकोशाचा निरास करून योग मार्गानें ब्रह्मोपासना करावी. आतां द्वैतमत्त कथन करितों. गदाधराचार्यादि असें ह्मणतात कीं पृथ्व्यादि चतुष्टयांचे परमाणु, आकाश, जीव, आणि ईश्वर हे नित्य पदार्थ आहेत. ईश्वराच्या इच्छेनें दोन परमाणूंचा संयोग होऊन द्व्यणुक् पदार्थ आणि त्र्यणुक् पदार्थ असें उत्पन्न झालें, ह्याप्रमाणें महा पृथ्वी, महदुदक, महत्तेज, आणि महावायु, अशी महाभूतांची सृष्टी झाला. जीवांच्या भोगाकरितां शरीर उत्पन्न झालें. जीव अदृष्ट वशानें त्या त्या शरीराचा आश्रय करून स्वादृष्टोत्पन्न भोग भोगूं लागला. त्याचा नियामक ईश्वर आहे. जीवास पदार्थ ज्ञानेकरून मुक्ति होते असें नैयायिकांचें मत आहे. त्यांच्या मतांत प्रकृति मुळींच नाहीं. ते श्रुतिपेक्षां अनुमानास विशेष प्रामाण्य मानितात. आतां श्लो० वेदांतचिंतामणी ॥ माध्वाचार्या इह प्राहुर्जगत्कर्ता कुलालवत् ॥ भिन्नोनिमित्तमेवेशो विकारात्समवाइनः ॥१॥ प्रकृतिस्याद्रुपादानं तत्तंत्रास्य जडस्यतु ॥ प्रकृतिर्ह्यस्योपादानमितिभागवतोक्तितः ॥ १ ॥ ब्रम्हणो जडजीवानां द्वैतमेवास्तिवास्तवं ॥ जीवब्रम्हाभिदांवक्ती द्वासुपर्णाश्रुतियतः ॥१॥ अर्थ ॥ मध्वाचार्य असें ह्मणतात कीं जगत्कर्ता जो ईश्वर तो कुलालाप्रमाणें जगतास निमित्त कारण आहे, आणि प्रकृति उपादान कारण आहे, ईश्वरास उपादान कारण मानिलें असतां विकारात्मत्व येतें बरें. विकारात्मत्वस्वीकृत केलें असतां निष्कलं निष्क्रियं, शांतं निरवद्यं निरंजनं, इत्यादि श्रुतीस बाध प्राप्त होतो. ह्मणून प्रकृतीसच उ-

पादान कारण मानितात. ह्याविषयीं श्लो० प्रकृतिर्ह्यस्यापादोन-
माधारःपुरुषःपरः ॥ सतोभिव्यंजकः कालोब्रम्हतत्रितयं
त्वहं ॥ १ ॥ अशी भागवतोक्ति आहे. ह्मणून प्रकृतीस उपादान
कारण आणि ब्रह्मास निमित्तकारण मानितात. जीव ईश्वराचा भि-
न्नांश आहे, जीव ब्रह्माचा वास्तविक् भेद आहे. ह्याविषयीं—
"द्वासूपर्णा सयुजा सखाया समानंवृक्षं परिषस्व जाते
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्नन्यो अभिचा-
कशीति ॥ श्रुतिप्रमाण आहे. भागवत० श्लो० ॥ सूपर्णावेतौस-
दृशौ सखायौ यदृच्छयैतौकृतनीडौच वृक्षे ॥ एकस्तयोः
खादतिपिप्पलान्न मन्योनिरन्नोपि बलेन भूयान् ॥ १ ॥
अर्थ—देहरूप वृक्षावर जीव आणि ईश्वर असें सदृश पक्षी बसले
आहेत. ते चिद्रुपत्वाच्या योगानें सखे आहेत. त्यांपैकीं एक जीव-
रूप पक्षी पिप्पलान्नाप्रत ( कर्मफलाप्रत ) भक्षण करितो, दुसरा ईश्वर-
रूप पक्षी अभोक्ता होत्साता निजानंदानें तृप्त आणि ज्ञानादिशक्ती-
करून अधिक आहे. यांत जीवेश्वराचें द्वैत सिद्ध होतें. असें द्वैतत्व
गीतेमध्यें कृष्णानेंही सांगितलें आहे—श्लो० ॥ द्वाविमौ पुरुषौ
लोके क्षरश्चाक्षर एवच ॥ क्षरः सर्वाणि भूतानि कुटस्था-
क्षर उच्यते ॥ १ ॥ असो जीव ईश्वराचा भिन्नांश आहे ह्या विषयीं
" पादोस्य विश्वाभूतानि त्रिपादस्यामृतंदिवी " ॥ अशी श्रुति
प्रमाण आहे. श्लो० गी० ॥ ममैवांशो जीवलोके जीव भूतः
सनातनः ॥ मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृस्थानि कर्षति ॥ १ ॥
या योगानें जीवास ईश्वराचें भिन्नांशत्व सिद्ध होतें. त्या जीवास अज्ञान नि-
वृत्त झाल्यावर सायुज्यतादि चतुर्विध मुक्ति प्राप्त होते. नंतर जीवे-
श्वराचें ऐक्य न होता तेथेंही सेव्य सेवक भाव रहातो, असें माध्व-
मत आहें. आतां निंबार्क, भास्कराचार्य जीवेश्वराचा भेदाभेद मानि-
तात. त्यामध्यें निंबार्काचे माध्वा प्रमाणेंच मत आहें. अभेद प्रति-
पादक श्रुति चैतन्य साधर्म्य घेऊन आल्हादकगुणानें मुखचंद्राच्या
अभेदाप्रमाणें जीव ब्रह्माचा अभेद प्रतिपादन करितो. भास्कराचार्य
औपाधिक भेद मानून ज्ञानकालीं जीवेश्वराचा अभेद मानितात. आतां
विशिष्टाद्वैत वादी जे रामानुजाचार्य आहेत ते पदार्थत्रय नित्य आहेत

असें मानितात. ते पदार्थ त्रय असें कीं चित् शरीर, अचित् शरीर आणि ब्रह्म ही चिदचित् ब्रह्माची सूक्ष्म शरीरें आहेत. ही प्रत्येक सृष्टीला कारण आहेत. सूक्ष्मचित् शरीरापासून चित्कार्य (जीव) निर्माण होतो. सूक्ष्म अचित् शरीरापासून जड कार्य (पृथ्व्यादि) निर्माण होतात. आणि ब्रह्मापासून ईश्वर उत्पन्न होतो. असें जगगदुत्पन्न होतें. याचप्रमाणें लय ही होतो. चित् शरीराच्याठायीं चित्कार्याचा लय होतो. अचित् शरीराचेठायीं अचित्कार्याचा लय होतो. आणि ब्रह्माचे ठायीं अंतर्यामी जो ईश्वर त्याचा लय होतो. विशिष्टाचें अद्वैत होतें तें परस्पर अद्वैत होत नाहीं. सारांश सूक्ष्म चिदचित् विशिष्टासी स्थूल चिदचित् विशिष्टाचें अद्वैत अशी रामानुजाचार्य ग्रथित ग्रंथांत **अशरीरं शरीरेषु अनवस्थेष्ववस्थितं ॥ महांतं विभुमात्मान मत्वाधीरो न शोचति ॥ १ ॥** उक्ति आहे. याविषयीं **"यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्यां अंतरोयं पृथिवी न वेद यस्य पृथ्वी शरीरं यः पृथ्वीमंतरोयमयत्येषत् आत्मांतरयाम्यं मृत इति,"** यजुर्वेदांतर्गत बृहदरण्यकामध्यें प्रतिपादन केलें आहे. आतां शुद्ध अद्वैतमत कथन करितों. वल्लभाचार्य असें ह्मणतात कीं प्रपंच हा अधिष्ठान् ब्रह्माचें कार्य होय म्हणून प्रपंच ही ब्रम्हरूपच आहे. जसा ब्रह्माचा त्रिकालीं बाध होत नाहीं, तसा प्रपंचाचाही होत नाहीं. याविषयीं **"पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते पूर्णस्यपूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते" ॥ "सर्वं खल्विदं ब्रम्ह नेह नानास्ति किंचन"** गीता० श्लो० **वासुदेवः सर्वमिति समहात्मा सुदुर्लभः॥** भागवत—श्लो० **॥ त्वय्यग्र आसीत् त्वयि मध्य आसीत् त्वय्यंत आसीदिदमात्म तंत्रे ॥ त्वमादिरंतो जगतोस्यमध्यं घटस्य मृत्स्नेवपरः परस्तात् ॥ १ ॥** विष्णुपुराण ॥ श्लो० **॥ तदेतदक्षयं नित्यं जगन्मुनिवराखिलं ॥ आविर्भावतिरोभाव जन्मनाश विकल्पवत् ॥ १ ॥ भूतानिविष्णुर्भुवनानि विष्णुर्गिरयोदिशश्च ॥** आत्मपुराण० श्लो० **॥ यत्र येन यतो यस्य यस्मै यद्यत् यथा यदा ॥ स्यादिदं भगवान् साक्षात्प्रधान पुरुषेश्वरः ॥ १ ॥** इत्यादि श्रुति स्मृति पुराण प्रामाण्ये करून

प्रपंच हा ब्रह्मासी अभिन्न आहे. ह्मणून प्रपंच ब्रह्मरूप होय.

**ज्ञानदेवः**—ब्रह्म षड्विकार शून्य आणि प्रपंच षड्विकार सहीत असें असतां उभयतांची अभिन्नता कशी ?

**निवृत्तिः**—"**एकोहं बहुस्यां प्रजायेय**" ह्या श्रुतीवरून सृष्टीच्या पूर्वीं एकच ब्रह्म होतें. त्या ब्रह्माला प्राथमिक स्वप्रकर्ष पूर्वक बहु भवनेच्छा झाली तेंच ब्रह्म नानारूपांनीं परिणामाला पावलें; आणि कार्य मात्राचे ठिकाणीं स्वधर्माचा तिरोभाव केला. ब्रह्म सच्चिदानंदरूप आहें, त्यापासून जड जीव आणि अंतर्यामी ईश्वर अशीं कार्यें उत्पन्न झालीं. त्या मध्यें एकएका कार्यावर कांहीं धर्मांचा अविर्भाव आणि कांहीं धर्मांचा तिरोभाव वैचित्र्याकारितां केला आहे. तो असा कीं वेदांतचिंतामणी—श्लो० ॥ **जडे सदंशःप्रकटश्चिदानंदौतिरोहितौ ॥ जीवेच सच्चितावंत र्यामिण्येतत् त्रयंस्फुटं ॥ १ ॥ अर्थ**—जडावर सदंश प्रकट आहे. चिदानंद तिरोहित आहेत. जीवावर सदंश व चिदंश प्रकट आहेत. आनंदांश तिरोहित आहे. चिदंश अंतर्यामी वर सदंश आणि आनंदांश असें अंश त्रय प्रकट असून अंतर्यमन शक्ति ही आहे. ह्यणून ब्रह्माहून प्रपंच्याचे ठिकाणीं वैलक्षण्य भासतें. तेंच धर्म ईश्वरेच्छेनें प्रकट झालें असतां सर्व प्रपंच ब्रह्मासीं अभिन्नच आहे, ह्मणून प्रपंच ब्रह्मरूप आहे.

**ज्ञानदेवः**—ब्रह्म धर्म तिरोभावामुळें प्रपंचाचे ठायीं षड् विकार भासतात; आणि वैलक्षण्यही दिसतें, असें म्हणण्यास कांहीं युक्ति पाहिजे.

**निवृत्तिः**—जसें अंकूर, वृक्ष आणि पाषाण ही पृथ्वीची कार्यें असून पृथ्वीचे सर्व गुण एक सारखे सर्वांवर रहात नाहींत. वृक्षाला अंकूर फुटतात. अंकुरावर विशेष मृदुत्व असून वृक्षाचे ठायीं किंचित् मृदुत्व आणि काठिण्य असतें. पाषाणाचे ठायीं मृदुत्व व अंकुरत्व मुळींच नाहीं, तसें कोणी अज्ञानी मायेनें मोहीत आहेत. व ज्ञानी माया मोह रहित आहेत. याप्रमाणें ब्रम्ह धर्माच्या अविर्भाव तिरोभावामुळें परस्पर भेद दिसतो. वृक्षांकुर पाषाण हीं मृत्तिकाच आहे. तसें प्रपंच ब्रम्हरूपच आहे.

ज्ञानदेवः—प्रपंचाचेठायीं ब्रम्ह धर्माचें आविर्भाव तिरोभाव हो-ण्याचें कारण काय ?

निवृत्तिः—"बहुस्यांप्रजायेय" ही प्राथमिक स्वप्रकर्षपूर्वक बहु भवनरूप ब्रम्हाची इच्छाच कारण आहे. सर्व मतवाद्यांनीं असेंच म्हटलें पाहिजे. यास दुसरें उत्तर नाहीं.

ज्ञानदेवः—ब्रम्ह आप्तकाम असून ब्रम्हास इच्छा उत्पन्न झाली असें श्रुति वर्णन करितें हें कसें ?

निवृत्तिः—याचें समाधान व्यांसानेंच केलें आहे. व्यास सूत्र, लोकवत्तुलीलाकैवल्यं, जसा लौकिक बालक अनपेक्ष होत्साता क्रीडा करितो त्याप्रमाणेंच ब्रम्हही केवल क्रीडार्थ बहुप्रकारानें परिणा-माला पावलें आहे. असें श्लो० भागवत ॥ क्रीडार्थमात्मनइदं त्रिजगत्कृतंते स्वाम्यंतु तत्र कुधियः पर ईश कुर्युः ॥ विष्णु पुराण श्लो० ॥ क्रीडा भांडमिदं विश्वं त्रिजगत्त कृतं यतः ॥ इत्यादि प्रमाणें श्रीमच्छंकराचार्यांनीं हीं मानिलीं आहेत.

ज्ञानदेवः—ब्रम्ह निर्गुण निर्विकार असून त्या पासून सगुण स-विकार जगत् कसें उत्पन्न झालें ?

निवृत्तिः—जगतांचे ठायीं साविकारत्व व सगुणत्व मायेच्या गुणां-नीं भासतें. त्या मायेची शक्ति ब्रम्हावर चालत नाहीं. असें श्लो० ॥ एकस्यैवममांशस्य जीवस्यैव महामते ॥ बंधोस्याविद्ययाना दि विद्ययाच तथेतरः ॥ १ ॥ श्रीशुकाचार्यांनीं भागवतीं सांगितलें आहे. या वरून ब्रम्ह धर्म तिरोभावमूलक प्रपंचावर सगुणत्व व स विकारत्व दिसतें. आविर्भाव झाल्यानंतर तोच प्रपंच निर्गुण निर्वि-कारत्वाप्रत पावतो.

ज्ञानदेवः—निर्विकार ब्रम्ह प्रपंचास उपादान कारण मानिलें अ-सतां पुनः विकारित्व प्राप्त होतें.

निवृत्तिः—अविकृत परिणाम स्वीकृत केला असतां दोष येत नाहीं. अविकृत परिणाम मानण्यास प्रमाण काय ? असें ह्मणशील तर, भागवत• श्लो० यथाहिरंण्यं बहुधा समीयते नृभिः क्रि-याभिः व्यवहारवर्त्मसु ॥ एवं वचोभिर्भगवानधोक्षजोव्या-ख्यायतेवैदिकलौकिकैर्जनैः ॥ १ ॥ व्याससूत्र—आत्मकृतेः

परिणामात् योनिश्चहिगीयते ॥ भगवद्गीता० श्लो० ममयोनि-र्महद्ब्रम्हतस्मिन्गर्भं दधाम्यहं ॥ संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ १ ॥ तदात्मानं स्वयमकुरुत कर्तारमीशं पुरुषं ब्रम्हयोनिंयत्भूतयोनिं परिपश्यंतिधीराः इत्यादि श्रुति स्मृति पुराणादिकांनींहीं अविकृताभिन्ननिमित्तोपादान कारणत्व ब्रह्मास प्रतिपादिलें आहे. तस्मात् प्रपंच ब्रह्मरूप सत्य आहे. त्या प्रपंचास मिथ्यात्व स्वीकृत केलें असतां ब्रह्मासी मिथ्यात्वस्वीकार करण्याचा प्रसंग येईल. तसें केलें असतां असन्नेव सभवति असत्ब्रम्हेतिवेदचेत् अस्ति ब्रम्हेतिचेत् वेद संतमेनं सतोविदुः या श्रुतीनें ब्रह्मास मिथ्यात्व मानणाराची निंदा केली आहे. आणि सत्यत्व मानणाराची स्तुति केली आहे. याकरितां प्रपंच व ब्रह्म दोन्हींही सत्य आहेत. जीवास ज्ञान झाल्यावर भक्ति होऊन मुक्ति प्राप्त होते असें शुद्धाद्वैतवल्लभ मत आहें. हें मत शांकरमतासी फार विरुद्ध आहें. अशीं शांकर, माध्व, रामानुज, निंबार्क, भास्कर आणि वल्लभ इत्यादि बहुत मतें आहेत.

ज्ञानदेवः—मतवादी लोक तत्वमसी या महावाक्याचा अर्थ कसा करितात.

निवृत्तः—तत्वमसी या वाक्यांत तत् पद त्वंपद आणि असि पद अशीं तीन पदें आहेत. त्यापैकीं पं० श्लो० एकमेवाद्वितीयंसन्नामरूपविवर्जितं ॥ सृष्टेःपुराधुनाप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ॥ १ ॥ अर्थ—सदेवसौम्येदमग्रआसीत् एकमेवाद्वितीयं, या श्रुति वाक्यानें सृष्टीपूर्वी स्वगतादि भेद शून्य नामरूप रहित जी वस्तु प्रतिपादिली आहे, तीच सद्वस्तु वर्तमान सृष्टि उत्तरकालींही तशीच आहे अशा विचार दृष्टच्या तसीच वस्तु जी ती तत् पदें करून जाणिजेते. आतां त्वंपदाचा आणि असिपदाचा अर्थ निवेदन करितों. श्लोक० श्रोतुर्देहेंद्रियातीतं वस्त्वत्रत्वंपदेरितं ॥ एकताग्राह्यतेसोतितदैक्यमनुभूयतां ॥ १ ॥ अर्थ. श्रवणादि अधिष्ठानानें वाक्यार्थाप्रत पावणाऱ्या श्रोत्यास देहेंद्रियातीत स्थूलादि शरीरत्रय साक्षितेनें त्याहून विलक्षण ( पृथकरूप ) जी वस्तु ती सद्वस्तु असें त्वं पदेरितं या वाक्यांतील त्वं पदानें उपलक्षिलें. आणि

या वाक्यांतील **असि** या पदानें तत्वं पद सामानाधिकरण्य मिळालें. यासाठीं पदार्थ द्वयाचें ऐक्याप्रत शिष्याच्या प्रत्ययाकरितां सांगतात कीं तत्वंपदार्थाचें ऐक्य प्रमाण सिद्ध आहें. मुमूक्षूनीं ऐक्याप्रत अनुभवावें. तत्वमसी महावाक्याचे वाच्यार्थ, वाक्यार्थ, आणि लक्ष्यार्थ, जहद्जहल्लक्षणा व भाग त्याग लक्षणाकरून जाणावें. येथें लक्षणानुवृत्ती कसी होते अशी शंका घेश्मिल तर श्लोक० **सोयमित्यादिवाक्येषुविरोधात्तदिदंतयोः॥ त्यागेनभागयोरेक आश्रयोलक्ष्यतेयथा ॥ १ ॥ मायाविद्येविहायैवमुपाधीपरजीवयोः॥ अखंडं सच्चिदानंदं परं ब्रम्हैवलक्ष्यते ॥ १ ॥** अर्थ० तोहा देवदत्त इत्यादि वाक्याचेठायीं तें हें त्यां त्यां देशकालांचें मुख्यत्वरूप जे धर्म त्यांच्या विरोधामुळें विरुद्धांशाच्या त्यागानें या विरुद्धांश भागाचा आश्रय जो देवदत्त त्याचें स्वरूप ज्याप्रमाणें एक असेंच जाणलें जातें. सोयं देवदत्तः इत्यादि वाक्यामध्यें जसें सांगितलें तद्वत पर ( परमात्माईश्वर ) आणि जीव यांच्या पूर्वोक्त उपाधी ( माया आणि अविद्या ) त्यांजप्रत टाकून अखंड ह्मणजे उपाधीवर्जित सच्चिदानंदरूप जें ब्रह्म त्यास तत्वमसि ( तें तूं आहेस ) या वाक्यानें जाणावें, असा श्रीमच्छंकराचार्यकृत महा वाक्याचा अर्थ होय. द्वैतवादी तत्वमसि या वाक्यांत तत्वं आणि असि अशी दोन पदें करितात. त्यापैकीं तत्वं या पदाचा विग्रह तस्य त्वं तत्वं असा करून त्या पूर्ण ब्रम्ह ईश्वराचा तूं सेवक आहेस असा अर्थ मध्वाचार्यकृत होय. याचप्रमाणें रामानुजांचेंही मत आहें. शुद्धाद्वैतवादी तत्वं आणि असि अशीं दोनच पदें करितात परंतु तत्वं या पदाचा विग्रह तस्य भावः तत्वं असा करून त्या अधिष्ठान ब्रम्हाचा तूं अंश आहेस असा अर्थ वल्लभकृत होय. मध्व, रामानुज, आणि वल्लभ हें असि या पदानें तूं या अध्यारत शब्दाचा लाभ होतो, असें म्हणतात.

**निवृत्तिः**—ज्ञानदेवा श्लोक० ॥ **नानाचित्रविचित्रवेषरचनानानामतभ्रामकाः ॥ नानातीर्थनिषेवकाजपपरामौनस्थितानित्यशः॥ सर्वेचोदरतत्परास्त्वभिमतेवादेविवादेस्थिता॥ ज्ञानान्मोक्षपदंवदंतिमुनयोतत्प्रापकादुर्लभाः ॥ १ ॥** अर्थ—कोणी भस्म रुद्राक्षमाला धारण करून शिवपूजन करितात. कोणी गोपीचं-

दन तुलसीकाष्टमाला धारण करून विष्णुपूजन करितात. कोणी कुंकु-माचें गंध लावून रामाचें किंवा गोपालकृष्णाचें पूजन करितात. कोणी काळीच वस्त्रें अंगावर परिधान करितात. कोणी कपाळीं शेंदूर लावून गणपतीचें किंवा मारुतीचें पूर्ण भक्तच बनले आहेत. कोणी मद्याची बाटली घेऊन शक्तीची उपासना करितात. अशीं चित्रविचित्र वेष रचना करून आपआपल्या मतानें जनास भ्रम करणारे लोक बहुत आहेत. कोणी स्कंदावर कावड घेऊन काशीचे कापडीच बनले आहेत. कोणी डोळे झांकून मोठ्या झोकान गोमुखीच हालवितात. कोणी सर्व काल मौनच धारण केलें आहे. असें सर्व उदर तत्पर होत्साता आपल्या मतोत्तेजनाकरितां परस्पर वादविवाद करितात परंतु ज्ञान संपादन करून ब्रह्म प्राप्तीरूप मोक्षपदवीप्रत प्राप्त झालेले पुरुष फार दुलर्भ आहेत. असेंच गीता श्लोक० ॥मनुष्याणांसहस्रेषुकश्चित्यततिसिद्धये ॥ यततामपिसिद्धानांकश्चिन्मांवेत्तितत्वतः ॥ १ ॥ श्रीकृष्णानें गीतेमध्यें सांगितलें आहे. याकरितां श्लोक० ॥ तस्मान्मुमुक्षुभिर्नैवमतिर्जीवेशवादयोः ॥ कार्यांकितुब्रम्हतत्वंविचार्यंबुध्यतांचतत् ॥ १ ॥ अर्थ मुमुक्षूनीं जीवेश्वर वादाच्या युक्तीचा अभाव असल्यामुळें जीवेश्वर वादाविषयीं फारसा विचार करूं नये. कारण मतवादी लोकांच्या नादी लागून आयुष्य व्यर्थ मात्र जाते. याशिवाय अन्य लाभ कोणताच होत नाहीं. तर मुमुक्षूनीं ब्रह्मतत्वाचा विचार करून व त्याप्रत जाणून ब्रह्मोपासनाकरावी, हें त्याचें कर्तव्यकर्म होय.

**ज्ञानदेवः**—सद्गुरू **निवृत्ति** ! आपण बहुत मतें कथन केलीं. परंतु तुम्ही आपलें मत कथन केलें नाहीं तर कृपा करून तुम्ही स्वतःचें मत निवेदन करा, ही माझी सलगीची विनय पूर्वक प्रार्थना आहे.

**निवृत्तिः**—**ज्ञानदेवा** सर्व मतांचा सारांश दोन प्रकारचा आहे, तो असा कीं—श्लो० **ब्रम्ह सत्यं जगन्मिथ्या सत्यं सत्यंतुचोभयं ॥ इत्थंमतवादिनां वादो नित्यः खलु प्रवर्तते** ॥ १ ॥ **अर्थ**—कोणी ब्रम्ह सत्य आहे आणि जगत् मिथ्या आहे असें म्हणतात. कोणी ब्रम्ह सत्य आहे आणि जगत ही सत्य आहे असें म्हणतात. असा उभयतांचा वाद अनादि सिद्ध नित्य चालला आहे.

आतां ब्रम्हाच्या सत्यत्वाविषयीं सर्वांचें मत निर्विवाद आहे. परंतु जगताच्या सत्यत्वाविषयीं मिथ्यात्वाविषयीं मात्र वाद होत आहे. त्याचे श्लो० **सत्यत्वं स्वीकृतंनेह नाना श्रुति विरोधतः ॥ मिथ्यात्वं स्वीकृतं चेत्तु श्रुति युक्ति विरोधतः ॥ १ ॥ नसत्यत्वं न मिथ्यात्वं क्षणिकं दृश्यमेवच ॥ नित्यं ब्रम्ह इतिप्राहुः तत्वज्ञानार्थदर्शिनः ॥ २ ॥ व्यवहार द्वैत सत्यं परमार्थे द्वैतमेवच ॥ अद्वयानंद प्राप्त्यर्थं भक्तिःकार्या मुमुक्षुभिः ॥ ३ ॥ अर्थ** जगताचें सत्यत्व स्वीकृत केलें असतां **नेह नानास्ति किंचन सर्वं खल्विदंब्रम्ह एकमेवा द्वितीयं** इत्यादि श्रुतीस बाध प्राप्त होतो. मिथ्यात्व स्वीकृत केलें असतां श्रुति—**पूर्णमदः पूर्णमिदं तदेतदक्षयं त्वय्यग्र आसीत्" "त्वयि मध्य आसीत्" "त्वय्यंत आसीत्"** इत्यादि श्रुतीस बाध येतो. व प्रत्यक्ष दृष्टिगोचर असतां मिथ्यात्व कसें म्हणावें असा युक्तीनेंही विरोध येतो. म्हणून जगत् सत्य ही म्हणू नये आणि मिथ्याही म्हणू नये, तर जगत् क्षणिक सत्य आहे; आणि ब्रह्म सच्चिदानंदरूप नित्य आहे. व्यवहाराचेठायीं द्वैत सत्य आहे; आणि परमार्थाचेठायीं अद्वैत सत्य आहे. म्हणून मुमुक्षूंनीं अद्वयानंद प्राप्त्यर्थ परमात्म्याची भक्ति करावी.

**ज्ञानदेवः**—विष्णु, शंकर, चंडी, सूर्य, आणि गणेश आदिकरून देव बहुत आहेत, म्हणून कोणच्या देवाची उपासना करावी. व ती कशी करावी ?

**निवृत्तिः**—**" यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसासः यद्वाचा नानुमते यन्मनसा नानुमते तदेवोपासनीयं नेदं "** इत्यादि श्रुतिवाक्यावरून जें वाणीला व मनाला अगोचर, ज्या पासून वाणी व मन परावृत्त होतें, असें जें निराकार ब्रह्म त्याची उपासना करावी, नेदं या वाक्यानीं आकार विशिष्टाचा निरास केला आहे. दुसरे निराकारोपासनेविषयीं याज्ञवल्क्य ऋषीनीं **प्रियमात्मानुपासीत्** असें सांगितलें.—पंचदशी—श्लो० **उत्तरस्मिं स्तापनीये शैब्य प्रश्नेथ काठके ॥ मांडुक्यादौच सर्वत्र निर्गुणोपास्तिरीरिता ॥ १ ॥ अर्थः**—उत्तरतापनीयोपनिषदाचे ठायीं **तावत् तदेवाह प्रजापतिः** इत्यादि शैब्य प्रश्नोपनिषदीं **यः पुनरेतं त्रिमात्रेण**

इत्यादि कठ् उपनिषदीं **सर्वे वेदा** इत्यादिपासून **एतध्येवाक्षरं** इत्यादपर्यंत मांडुक्यामध्यें **ओमित्ये तदक्षरमिदं** इत्यादि याच-प्रमाणें तैत्तिरीय मडुकादि उपनिषद वाक्यें स्पष्टपणें निराकार निर्गुण ब्रम्होपासनेस संमत आहेत.

**ज्ञानदेव**:—निराकार ब्रह्म वाणीला व मनाला गोचर नसल्यामुळें त्याची उपासना कशी घडेल.

**निवृत्ति श्लो० ॥ अवाङ् मनसगम्यं तन्नोपास्य मितिचेत् तदा ॥ अवाङ् मनसगम्यस्य वेदनं नच संभवेत् ॥१॥ अर्थ**—वाणीला व मनाला अगम्य अशा ब्रम्हाची उपासना जर होत नाहीं म्हणावें तर वाणी मनाला अगम्य, ब्रम्हाचें ज्ञान तरी कसें होईल? बरें ब्रम्हाचें ज्ञान होत नाहीं असें म्हणशील तर तूं नास्तिक आहेस. जशा रूपानें ब्रह्म वाणी मनाला अगोचर असून जाणता येतें तशाच रूपानें त्याची उपासना कां करितां येणार नाहीं ?

**ज्ञानदेवः**—उपासना करितांना **दीनंमामवलोकय, कृपांकुरु, धावय, मोचय**, इत्यादि वाक्या वरून निराकार ब्रम्हास साकारत्व येऊं पहातें.

**निवृत्तिः**—तुझ्या मनाच्या भावनेनें धावय, मोचय, इत्यादि वाक्याचा जरी तूं उच्चार केलास तरी ब्रह्मास साकारत्व येत नाहीं. कारण ब्रह्म अनादि सिद्ध निराकारच आहें, जसें सूर्यास तमोमय म्हणणें व्यर्थ होय, तसें निराकारास साकारत्व बोलणें व्यर्थ होय. असें वाशिष्ट प्रयोगांत सांगितलें आहे. अहो तुमचा ब्रम्होपासनेविषयीं इतका आग्रह कां ? असें जर कदाचित् म्हणशील तर तुझा द्वेष तरी कां ? तें सांग.

**ज्ञानदेवः**—संपूर्ण जन साकार मूर्तीचीच उपासना करितात, निराकाराची करीत नाहींत.

**निवृत्तिः**—**श्लो० ॥ नानु तिष्ठति कोप्येत दितिचेन्मानुतिष्ठतु ॥ पुरुषस्यापराधेन किमुपास्तिः प्रदुष्यति ॥१॥ अर्थ**—निराकाराची उपासना कोणी करीत नाहीं असें म्हणतोस तर न करीत, त्यापासून न्यूनाधिक्य काय आहे ? उंच मोलाचा हिरा एका बाजारांत विकला गेला नाहीं म्हणून हिरा कमी मोलाचा असें म्हणतां येईल

काय ? तसेच पुरुषाच्या हातून निराकाराची उपासना होत नाहीं यांत उपासनेकडे काय कमीपणा आला.

ज्ञानदेवः—तर साकार उपासना करूं नये असें म्हणा.

निवृत्तिः—साकार उपासना ही अज्ञ लोकांच्या चित्तवृत्ति तादात्म्याकरितां स्मृतिकारांनीं कथन केली आहे. स्कांदे. श्लो०-शैलीदारुमयीत्यादी मूर्तिंकृत्वा विधानतः ॥ पूजयेदज्ञश्चित्तस्य वृत्तितादात्म्य सिद्धये ॥ १ ॥ अर्थ०-वृत्तीला पारमार्थिक ज्ञानसंस्कार नसल्यामुळें विषयावृतत्वानें मलिन झालेली, तिला तादात्म्य प्राप्तीकरितां शैली दारुमयी इत्यादि मूर्ति करून अज्ञलोकांनीं तिचें यथा विधीनें पूजन करावें. कारण त्यास अव्यक्तोपासना दुःखतरास्पद होय. श्लो० येत्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तंपर्युपासते ॥ सर्वत्रगमचित्यंचकूटस्थमचलंध्रुवं ॥ १ ॥ संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्रसमबुद्धयः ॥ ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहितेरताः ॥ १ ॥ क्लेशोधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसां ॥ अव्यक्ताहिगतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ १ ॥ असें श्रीकृष्णानें गीतेमध्यें सांगितलें आहे. अग्नि, सूर्य, इंद्र, विष्णु, आणि शंकर इत्यादि देवांची उपासना करावी असें गौतमानेंही सांगितलें आहे. परंतु साकारोपासकास श्लो० ॥ अर्चायामेवहरयेपूजांयःश्रद्धयेहते ॥ नतद्भक्तेषुचान्येषु सभक्तःप्राकृतस्मृतः ॥ १ ॥ मूर्तीचेठायीं एकनिष्ठ भावना करणाऱ्यास प्राकृत भक्त ह्मणावें अशी भागवतीं नवसिद्धांची उक्ति आहे. श्रीमच्छंकराचार्यांचें मत असें आहे कीं, आत्मपुराण. श्लो०॥ विश्वाकारस्य देवस्य पूजनं कुरुसर्वदा ॥ पुजनंकिं दया शांती निर्वैरं समदर्शनं ॥ १ ॥ "सहस्त्र शीर्षा पुरुषः सहस्त्राक्षःसहस्त्रपात् सभूमीं विश्वतोवृत्वात्यतिष्ठद्दशांगुलं" इत्यादि विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात् संबाहुभ्यांधमति संपतत्रैर्द्यावाभूमीजनयन्देव एकः गीता—श्लो० ॥ सर्वतःपाणिपादंतत् सर्वतोक्षिशिरोमुखं ॥ सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १ ॥ इत्यादि श्रुति स्मृतींनीं निराकार ब्रह्मास विश्वाकारत्व वर्णन केलें, असा जो विश्वाकृती देव त्याचें पूजन करून उपासना करावी. असेंच श्रीकृष्णानें-

श्लो० गीता० ईश्वरःसर्वभूतानां हृद्देशेर्जुनातिष्ठति ॥ भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढाणिमायया ॥ १ ॥ तमेव शरणंगच्छ सर्वभावेन भारत ॥ तत्प्रसादात्परांशांतिस्थानं प्राप्स्यसिशाश्वतं ॥ १ ॥ अर्जुनास सांगितलें आहे.

ज्ञानदेवः—विश्वाकृति देवाचें पूजन कसें करावें?

निवृत्तिः—नृ, पशू, पक्षादिकांचे ठायीं दया, क्षमा, शांति, निवैर, समदर्शन, इत्यादिक करणें हें त्या विश्वाकृति देवाचें पूजन होय. व अक्षर ब्रह्माची उपासना करावी. श्लो० गी० ॥ सर्व द्वाराणि संयम्य मनो हृदिनिरुध्यच ॥ मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणां ॥ १ ॥ ओमित्येकाक्षरंब्रम्हव्याहरन् मामनुस्मरन् ॥ यः प्रयाति त्यजन् देहं सयाति परमांगतिं ॥ १ ॥ अर्थ सर्व इंद्रियद्वाराचा निरोधकरून मस्तकाचे ठायीं प्राणाचें स्थापन करून ओमित्येकाक्षर ब्रह्म इत्यादि अक्षर ब्रह्माचें नामस्मरण जो करितो त्यास परमगती प्राप्त होते. अशी कृष्णोक्ति आहे. " ओमित्येतदक्षरमिदं " इत्यादि शरीररूप रथाला नवेंद्रियरूप अश्व लाविले आहेत. त्या अश्वांचा नियामक मनरूप सारथी आहे. अशा रथावर आरूढ झालेला जो आत्मा त्यानें सविवेक ज्ञान धनुष्याला जीवरूप बाण लावूच त्रिमात्रक ओमित्येकाक्षर ब्रह्म त्यास लक्ष्य करून शरसंधान करावें असें मांडुक्योपनिषदांत सांगितलें आहे. अक्षरोपासनाही निराकारोपासनाच होय. असो, उपासना करणें हें मनुष्याचें मुख्य कर्म आहें. भक्तीवांचून ईश्वरप्राप्ती व्हावयाची नाहीं. याविषयीं बहुत प्रमाणें आहेत. गीता श्लो० ॥ पुरुषःसपरःपार्थ भक्त्यालभ्यस्त्वनन्यया ॥ नाहंवेदैर्नतपसा न दानेनचेज्यया ॥ शक्य एवं विधोद्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥१॥ भक्त्यात्वनन्ययाशक्य अहमेवं विधोर्जुन ॥ ज्ञातुं द्रष्टुंच तत्वेन प्रवेष्टुंच परं तप ॥ १ ॥ भागवत० श्लो० नरोधयतिमां योगो न सांख्यं धर्म उद्धव ॥ न स्वाध्यायस्तपस्त्यागः यथाभक्तिर्ममोर्जिता ॥ १ ॥ विष्णुपुराण ॥ नदानं नतपोनेज्या न शौचं न व्रतानिच ॥ प्रीयतेमलयाभक्त्या हरिरन्यत् विडंबनं ॥ इत्यादि प्रमाणांनीं ईश्वर प्राप्तीविषयीं जशीं भक्ति प्रधान आहे तसें कर्म, ज्ञान, योग,

तप, वेदाध्ययन, दान, यज्ञ, इत्यादि प्रधान नाहींत.

**ज्ञानदेवः**—ज्ञान उपासना मार्गानंतर होतें, असें असतांना ज्ञानापेक्षां भक्तीचें प्राधान्य कसें?

**निवृत्तिः**—प्रथम स्कंधें श्लोक० ॥ **नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जित नशोभतेज्ञानमलं निरंजनं ॥ कुतःपुनःशाश्वदभद्रमीश्वरेन चार्पितं कर्मयदप्यकारणं ॥ १ ॥ ब्रम्हस्तुति** श्लोक० ॥ **श्रेयःश्रुतिं भक्तिमुदस्यतेविभो क्लिश्यंतियेकेवलबोधलब्धये॥तेशामसौक्लेशलयेवशिष्यतेनान्यद्यथास्थूल तुषावघातिनां** ॥ १ भाव वर्जित जें ज्ञान तें शोभेप्रत पावत नाहीं, कारण केवल ज्ञानानें अंतःशध्यादि होत नाहीं. तर भगवद्प्राप्ती कशी होईल? ह्मणून भक्तीवांचून केवल ज्ञान संपादन करणें क्लेशास कारण होय. याकरितां सर्वांमध्यें भक्ति श्रेष्ठ आहे. गीता० श्लोक० ॥ **तपस्विभ्योधिकोयोगी ज्ञानिभ्योपिमतोधिकः ॥ कर्मिभ्यश्चाधिकोयोगी तस्मात्योगीभवार्जुन ॥ १ ॥ योगीनामापि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ॥ श्रद्धावान्भजतेयोमांसमेयुक्ततमोमतः ॥ १ ॥** अर्थ० तपस्वी, ज्ञानी, आणि कर्मी, यां सर्वांमध्यें योगी श्रेष्ठ होय. सर्व योगामध्येंही जो श्रद्धेच्या योगानें जगदीश्वराची उपासना करितो तो सर्वांत श्रेष्ठ होय. असें तला भक्तिमाहात्म्य निवेदन केलें. आतां भक्ति कशी करावी तें सांगतों. पुरूषात्तमाचेठायीं जी अत्यंत प्रीति धारण करणें ती भक्ति ह्मणावी असें नारदीय पंचरात्रामध्यें सांगितलें आहे. श्लोक० ॥ **सदानिष्कामन स्नेहोभक्तिराथर्वणेस्मृता** ॥ जगदीश्वराचेठायीं निष्कामत्वानें जो स्नेह त्यास भक्ति ह्मणावी असें अथर्वणवेदीं कथन केलें आहे. कोणी जगदीश्वराचे कायिक, वाचिक, आणि मानसिक जें भजन ( सेवन ) त्यालाच भक्ति असें ह्मणतात. श्लोक० ॥ **अंकोलं निजबीज संततिरयस्कांतोपलंसूचिका ॥ साध्वीनैजधवं लताक्षितिरुहं सिंधुःसरिद्वल्लभं ॥ व्याप्नोतीह्ययथातथारघुपतेःपादारविंदद्वयं चेतोवृत्तिरुपेत्यातिष्ठतिसदासाभक्तिरित्युच्यते ॥ १ ॥** अर्थ० ॥ निजबीजसंतती अंकोल वृक्षाप्रत जसी व्याप्त करिते, किंवा सूचिका अयस्कांतोपलाप्रत ( लोहचुंबकाप्रत ) जसी व्याप्त करिते, अथवा साध्वीस्त्री पतीप्रत जसी व्याप्त करिते, किंवा ल-

ता वृक्षाप्रत जशी व्याप्त करिते, अथवा गंगा समुद्राप्रत जशी व्याप्त करिते, तशी ज्याची चित्तवृत्ति रघुपतिचरणारविंदाप्रत प्राप्त होऊन सार्वकाल तेथेंच वास करिते ती भक्ति ह्मणावी, असें श्रीमच्छंकराचार्यांचें मत आहे. कपिलगी० देवानां गुणलिंगानामानुश्रविककर्मणां ॥ सत्वएवैकमनसोवृत्तिस्वाभाविकीतुया ॥ १ ॥ अर्थ० ॥ ज्यांच्यायोगानें विषय जाणले जातात, आणि वेदोक्तकर्म कर्तृत्वाची ज्यांना शक्ति आहे, अशी जी पदार्थ द्योतक इंद्रियें त्यांची आणि मनाची जी स्वाभाविक वृत्ति ह्मणजे सहज व्यापार ते सर्व ज्यांनीं ईश्वरार्पणच केले आहेत, त्यालाच भक्ति ह्मणावी, असें सांख्यमत आहे. श्लोक० ॥ अनिमित्ताभागवती भक्तिःसिद्धेर्गरीयसी ॥ जरयत्याशुयाकोशं निगीर्णमनलोयथा ॥ १ ॥ अर्थ० ॥ पूर्वोक्त जी भगवंताची भक्ति ती अनिमित्ता ( फलसंगरहिता ) असावी, अशी भक्ति आणिमादिसिद्धीपेक्षांही श्रेष्ठ होय–ती जसें भुक्त केलेलें अन्न जठराग्नी भस्म करितो तसें वासनात्मकलिंगदेह कोशातें नाश करिते. अशी भक्तिएक निष्ठ अव्यभिचारिणी पाहिजे असें—गीता० श्लो०॥ मयिचानन्ययोगेनभक्तिरव्यभिचारणी ॥ श्रीकृष्णानें सांगितलें आहे. कायेचे व मनाचे व बुद्धीचे व्यापार ईश्वर परायणच झाले आहेत. वाणी ईश गुणानुवाद कथन करिते. श्रवण ईश्वर कीर्तनातें श्रवण करितात. नेत्र ईश्वरातें अवलोकन करितात. मनाचे संकल्प सर्वदा ईश्वरप्राप्तीविषयींच होत आहेत. मुखानें ईशनाम स्मरणकरितांना हृदयीं ईश्वराचें ध्यान करून, जगदीश्वरा ! मी दीन आहे, मला दुष्टवासना देऊं नको. सर्वदा सुबुद्धि दे असें ह्मणून रोदन करावें अंगावर रोमांच उत्थित होऊन चित्त द्रवत असावें. असें श्लोक० ॥ एवंव्रतस्वप्रियनामकीर्त्या जातानुरागोद्रुतचित्तउच्चैः ॥ हसत्यथोरोदितिरौतिगायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ॥ १ ॥ क्वचित्रुदंत्यच्युतचिंतया क्वचित् हसंति नंदंति वदंत्यलौकिकाः ॥ नृत्यंति गायंन्त्यनुशीलयन्त्यजं भवंति तूष्णींपरमेत्यनिर्वृताः ॥ १ ॥ भागवतीं कथन केलें आहे. श्लोक० ॥ याप्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी ॥ त्वामनुस्मरतःसामे हृदयान्मापसर्पतु ॥ १ ॥ अर्थ. असें अविवेकी पुरुषाचें प्रेम विषयाचेठायीं अनस्यूत असतें तसें ज-

गदीश्वराचेठायीं अकृत्रिम प्रेम लक्षण ठेवणें हीच भक्ति अशी शांडिल्य सूत्रांत उक्ति आहे. असा भक्ति करणारा पुरूष ज्ञानाची व ज्ञानापासून होणाऱ्या मोक्षाची इच्छा करीत नाहीं. याविषयीं श्लोक० ॥ **नैकात्मतां मेस्पृहयंतिकेचित् मत्पादसेवाभिरताः मदीहाः ॥ येन्योन्यतो भागवता प्रसज्य सभा जयंते ममपौरुषाणि ॥ १ ॥ मत्सेवया प्रतीतंच सालोक्यादि चतुष्टयं ॥ नेच्छंतिसेवयापूर्णा कुतोन्यत्काल विद्रुतं ॥ १ ॥** असें भागवतीं प्रमाण आहे. " मोक्षाची जर इच्छा करीत नाहीं तर इंद्रपदाची व सार्वभौमत्वाची क्षणिक सुखेच्छा कशी करील. त्याला या जगतांत भक्तीवाचून दुसरें कोणतेंच प्रिय नाहीं. भक्ति करणें हेंच संसृतिबंधापासून मुक्त होण्याचें व ब्रह्म प्राप्तीचें मुख्य साधन होय. आतां कर्म मीमांसा कथन करितों. रामगीता० श्लो० **॥ आदौ स्ववर्णाश्रमनिर्मिता क्रियाः कृत्वा समासादित शुद्धमानसः ॥ समाप्य तत्पूर्वमुपात्त साधनः समाश्रये त्सद्गुरुमात्म लब्धये ॥ १ ॥** अर्थ—प्रथम मनुष्यानीं स्ववर्णाश्रम निर्मित क्रिया करून त्या योगानें शुद्धमनस्क होऊन नंतर आत्म प्राप्ती करितां सद्गुरूचा आश्रय करावा.

**ज्ञानदेवः**—स्ववर्णाश्रम निर्मित कर्म कोणचें ?

**निवृत्तिः**—गीता—श्लो० **॥ शमो दमस्तपः शौचं क्षांति रार्जवमेवच ॥ ज्ञानं विज्ञान मास्तिक्यं ब्रम्हकर्म स्वभावजं ॥ १ ॥** **अर्थ**—शम, दम, तप, शौच, क्षमा, आर्जव, ज्ञान, विज्ञान, आणि आस्तिक्य हें स्वभाविक ब्रह्म कर्म होय. श्लो० **॥ शौर्यं तेजो धृति र्दाक्ष्यं युद्धेचाप्य पलायनं ॥ दानमीश्वर भावश्च क्षात्रं कर्म स्वभावजं ॥ १ ॥ अर्थ**—शौर्य, तेज धैर्य, कौशल्य, युद्धामध्यें अपलायन, दान, आणि ईश्वरभाव हें स्वाभाविक क्षात्रकर्म होय. श्लो० ॥ **कृषि गोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ॥ परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजं ॥ १ ॥ अर्थ**—कृषी, गोरक्ष ( पशूपालन ) वाणिज्य, हें वैश्यकर्म होय; आणि तीन वर्णाची सेवा करणें हें शूद्राचें स्वाभाविक कर्म होय. आतां बाह्यकर्माचें यज्ञ दान आणि तप असे तीन प्रकार आहेत. एतत् कर्माचा विकल्प अनुवाद करितों. श्लो० **त्याज्यं दोषवदित्येके कर्मप्राहुर्मनीषिणः ॥ यज्ञदान तपः कर्म न**

**त्याज्य मितिचापरे** ॥ १ ॥ अर्थ—अग्निहोत्र जोतिष्टोमादि यज्ञामध्यें पश्वादिकांची हिंसा होते, आणि "**नाहिंस्यात्सर्वभूतानि**" असा श्रुतीचा निषेध आहे. ह्मणून कर्म सर्वथैव त्याज्य करावें, असें सांख्याचें मत आहे. अग्निहोत्र जोतिष्टोमामध्यें जी हिंसा होते ती ईश्वरोद्देशानें होते स्वतः कारितां नव्हे. ह्मणून त्यापासून पापभीति मुळींच नाहीं. तर वेदविहितकर्म त्याग करणें हें युक्त नव्हे. तें केलेंच पाहिजे, असें मीमांसकाचें मत आहे. श्लो० ॥ **यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेवतत् ॥ यज्ञोदानं तपश्चैव पावनानि मनीषिणां** ॥ १ ॥ अर्थ—यज्ञ, दान, आणि तप हें कर्म मनुष्यमात्राच्या चित्तशुद्धीस कारण आहें. ह्मणून तें कर्म त्याज्य नव्हें, असें श्रीकृष्णाचें मत आहें. श्लो० ॥ **नहि देहं भृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः** ॥ अर्थ—देहधारी पुरूष अशेष कर्मत्याग करण्याविषयीं समर्थ नाहीं. कारण, संध्यादि नित्य नैमित्तिक कर्मांचा जरी त्याग केला तरी प्रकृतिजन्यइंद्रियांच्या स्वाभाविक क्रिया होतीलच. श्लो० ॥ **नहि कश्चित् क्षणमपि जातु तिष्टत्यकर्मकृत्** ॥ **कार्यतेह्यवशःकर्म सर्व प्रकृतिजैर्गुणैः** ॥ १ ॥ अर्थ—नेत्राचें पहाणें, कर्णाचें श्रवण करणें, जिव्हेचें कटु तिक्त रस जाणणें, नासिकेचें अवघ्राण घेणें, इत्यादि प्रकृतिजन्यइंद्रिय कर्मांचा त्याग कधींही होत नाहीं असें जर आहें, तर बाह्यवेद विहितकर्मांचा त्याग तरी कां करावा. श्लो० ॥ **कर्मणैवहि संसिद्धिमास्थिता जनकादयः** ॥ अर्थ—कर्माच्याच योगानें जनकादिक मोक्ष सिद्धीप्रत प्राप्त झालें. ह्मणून मनुष्यांनीं स्वकर्म केलें पाहिजें.

**ज्ञानदेवः**—यज्ञ ह्मणजे काय ? दान ह्मणजे काय आणि तप ह्मणजे काय ?

**निवृत्तिः**—यज्ञ ह्मणजे अंतर्यामी जो सर्वेश्वर त्याचें यजन करणें. जोतिष्टोमादिकास यज्ञ संज्ञा आहे असें मीमांसक ह्मणतात. दान ह्मणजे अध्यात्मज्ञानदानादिक, आणि तप ह्मणजे आत्मानात्म विचारादिक. या यज्ञदान तपरूप कर्मांचें सात्वीक, राजस आणि तामस असे तीन प्रकार आहेत. प्रथम. श्लो० ॥ **अफलाकांक्षिभिर्यज्ञोविधिदृष्टोय इज्यते** ॥ **यष्टव्यमेवेतिमनः समाधाय स सात्विकः** ॥ १ ॥ अर्थ०

पुरुषानीं फलाकांक्षारहित होत्साता वेदविधीनें दृष्ट, एकाग्र अंतःकरण करून यष्टव्य ह्मणून जें यजन करणें त्यास सात्विकयज्ञ असें ह्मणावें. श्लो० ॥ **अभिसंधायतुफलं दंभार्थमपि चैव यत् ॥ इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धिराजसं** ॥ १ ॥ अर्थ० फलाशेचा उद्देशधरून जगतामध्यें माझ्या महत्वाची ख्याती व्हावी ह्मणून जें यजन करणें त्यास राजस यज्ञ ह्मणावें. श्लो० **विधिहीन मसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणं॥ श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षत**॥१॥अर्थ०॥वेदविधिरहित असृष्ट-अन्न(ब्राह्मणापासून न निष्पादित अन्न)वेद मंत्रहीन, दक्षिणारहित, आणि श्रद्धाशून्य असें होत्साता जें यजन करणें त्यास तामसयज्ञ असें ह्मणावें. आतां दानाचें त्रैविध्य कथन करितों. श्लो० ॥ **दातव्यमितियद्दानं दियतेऽनुपकारिणे ॥ देशेकालेच पात्रेच तद्दानं सात्विकं स्मृतं** ॥१॥ अर्थ० ॥ कुरुक्षेत्रादि तीर्थांचे ठायीं सप्तमी, द्वादशी इत्यादि पर्वकाल पाहून वेदशास्त्रार्थज्ञ प्रत्युपकारा समर्थ अशा वैष्णव ब्राह्मणास दातव्य ह्मणून जें दान करणें त्यास सात्विकदान ह्मणावें. श्लो० ॥ **यत्तुप्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्यवापुनः ॥ दीयतेच परिक्लिष्टं तद्राजस मुदाहृतं** ॥ १ ॥ अर्थ० ॥ हा कालांतरानीं दिलेल्या दानाचा प्रत्युपकार लवकरच करील असें मनांत आणून आणि स्वर्गादिक फलाची इच्छा धरून चित्तक्लेशयुक्त जें दान करणें त्यास राजसदान असें ह्मणावें. श्लो० ॥ **अदेशकाले यद्दानमपात्रे भ्यश्चदीयते ॥ असत्कृतमवज्ञातं तत्तामसमदाहृतं** ॥ १ ॥ अर्थ० ॥ देशकाल रहित होत्साता नटनर्तकादिकाप्रत जें दान करणें, प्रसंगवशात् द्वारीं ब्राम्हण प्राप्त झाला असतां तिरस्कारयुक्त होऊन त्यास जें देणें तें तामसदान ह्मणावें. आतां तपाचें कायिक वाचिक मानसिक भेद सांगून त्रैगुण्य वर्णन करितों. श्लो० ॥ **देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवं ॥ ब्रम्हचर्य महिंसाच शारीरं तप उच्यते** ॥ १ ॥ अर्थ० देव, द्विज, गुरू आणि प्राज्ञ यांचें पूजन, शुचित्व, आर्जव, ब्रम्हचर्य, अहिंसा, इत्यादिकास शारीरतप असें म्हणतात. श्लो० ॥ **अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रिय हितंचयत् स्वाध्यायाभ्यसन चैव वाङ्मयं तपउच्यते** ॥ १ ॥ अर्थ—दुसऱ्याच्या अंतःकरणास न उद्वेग करणारे, सत्य श्रोत्यास प्रिय, आणि परिणामी सुखकर, असें वाक्य

जें बोलणें आणि नित्यशः वेदशास्त्राचा जो अभ्यास करणें यास वाङ्मयतप असें म्हणतात. श्लो० ॥ **मन प्रसादःसौम्यत्वं मौनमात्म विनिग्रहः ॥ भावसंशुद्धिरित्येत तपोमानस मुच्यते** ॥ १ ॥ अर्थ० ॥ मनाची प्रसन्नता, सौम्यत्व, स्वरूपाचें मनन, आत्म्याचा विनिग्रह ( विषयनिवृत्ति ) आणि शुद्धभावना, यास मानसिक तप असें म्हणतात. श्लो० ॥ **श्रद्धयापरयातप्तं तपस्तत्त्रिविधंनरैः ॥ अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते** ॥ १ ॥ अर्थ० उत्कृष्ट श्रद्धेच्या योगानें कायिक, वाचिक, मानसिक, अशा त्रिविध तपाचें फलाशा संगरहित होत्साता जें अचरण करणें त्यास सात्विक तप असें म्हणावें. श्लो० ॥ **सत्कार मान पूजार्थ तपोदंभेनचैव यत्** ॥ **क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवं** ॥ १ ॥ लोकांमध्यें सत्कार, मान, पूजा व्हावी ह्मणून दंभाच्या योगानें जें तप करणें त्यास राजस तप असें म्हणावें. श्लो० **मूढग्राहेणात्मनोयत्पीडया क्रियते तपः** ॥ **परस्योत्सादनार्थंवा तत्तामसमुदाहृतं** ॥ १ ॥ अर्थ० ॥ मूढ दुराग्रह धारणकरून दुसऱ्याचा नाश व्हावा म्हणून आत्म्याला पीडा देऊन जें तप करणें त्यास तामस तप असें म्हणावें

ज्ञानदेवः—ज्ञानी यज्ञदान आणि तप इत्यादिक कर्में मुळींच करीत नाहींत.

निवृत्तिः—योगवासिष्ठ ॥ श्लो० ॥ **नकर्माणि त्यजेद्योगी कर्मभिस्त्यज्यते ह्यसौ ॥ कर्मणोमूल भूतस्य संकल्पस्यैव नाशतः**॥१॥ अर्थ० ॥ योगी कर्मत्याग करीत नाहीं. कर्मेंच त्याचा त्याग करितात. कारण, कर्माला मूल भूत जो संकल्प त्याचा नाश झाला म्हणून त्यास कर्में स्पर्श करीत नाहींत. तो ज्ञानी यज्ञमयच आहे. याविषयीं श्रुति " **तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धापत्नी शरीर मिध्ममुरोवेदिर्लोमानि बर्हिर्वेदःशिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युःपशुस्तपोग्निःदमःशमयिता दक्षिणा वाग्घोता प्राण उद्गता चक्षुरध्वर्यू मनो ब्रम्हा श्रोत्र मग्नि द्यावाद्धयते सादीक्षा** " इत्यादि त्या ज्ञानी लोकांचा जो आत्मा तो या यज्ञाचा यजमान ( यजनकर्ता ) त्याची श्रद्धा ती यजमान पत्नी, त्याचें शरीर हें इध्म, त्याचे ऊर ही वेदी, त्याचे रोम ते दर्भ, त्याचा वेद ती शिखा, त्याचें

हृदय तो यूप, त्याचा काम तें घृत, त्याचा मन्यू तो पशू, त्याचें तप तो अग्नि. त्याचा दम तो शमयिता, त्याची जी वाणी ती दक्षिणा त्याचा जो प्राण तो होता ( हवनकर्ता ), त्याचे जे चक्षू तो उद्गाता, त्याचें जें मन तो अध्वर्यू, त्याचे श्रोत्र तो ब्रह्मा, यावत् त्याचें जीवन तावत् यज्ञदीक्षा, तो जें भक्षण करितो तें हवी, तो जें पान करितो तें सोम-पान, इत्यादि श्रुत्यर्थां वरून तो ज्ञानी यज्ञमयच आहे असें सिद्ध होतें. अशा सिद्धाला बाह्य यज्ञ करावयास नको. मनुष्यांनीं त्यांचें सामानाधिकरण्य ग्रहण करितां युक्त नव्हें. जीवांनीं यज्ञ दान आणि तप अशीं जीं नित्य नैमित्तिक कर्में तीं अवश्य केलीं पाहिजेत. आतां गीता. श्लो० **कर्मण्य कर्मयः पश्येदकर्मणिच कर्मयः ॥ स बुद्धिमान् मनुष्येषु सयुक्त कृत्स्न कर्मकृत्** ॥ १ ॥ अर्थ—कर्मा-मध्यें अकर्म आणि अकर्मामध्यें कर्म याचा सर्वकाल विचार करणारा जो पुरूष तो सर्वांमध्यें बुद्धिमान् जाणावा असें कृष्णाचें मत आहे. बरें, त्या कर्मकर्तृत्वाचा अभिमान न धारण करितां तें सर्व कर्म ब्रह्मा-र्पण केलें पाहिजे. याविषयीं नमम नमम असें वेदामध्यें बहुत प्रयोग आहेत. गीता० **ब्रम्हार्पणं ब्रम्ह हविर्ब्रम्हाग्नौ ब्रम्हणाहुतं ब्रम्हैव तेन गंतव्यं ब्रम्हकर्मसमाधिना** ॥ १ ॥ **यत्करोषियदश्नासि यज्जुहोषिददासियत्** ॥ **यत्तपस्यासि कौंतेय तत्कुरुष्वमदर्पणं** ॥ १ ॥ भागवत श्लोक० ॥ **इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मन प्रियं ॥ दारान् सुतान् गृहान् प्राणान् यत्परस्मै निवेदनं** ॥ १ ॥ अर्थ० जें करशील, जें भक्षण करशील, जें होमित करशील, जें दान करशील, जें तप करशील, जो जप करशील, किंबहुना तुझ्या आत्म्याला प्रिय जें जें करशील तत्तत्कर्तृत्वाचा अहंकार न धरितां तें तें सर्व ब्रह्मार्पण कर. ह्मणजे गीता० ॥ **शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्म बंधनैः ॥ सन्यास योग युक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि** ॥ १ ॥ अर्थ० त्या त्या कर्मापासून उत्पन्न होणारीं जीं शुभाशुभ फलें तद्रूप बंधनापासून मुक्त होऊन संन्यास योग युक्त होत्साता ब्रह्म पदवीप्रत प्राप्त होशील अशी गीतेमध्यें अर्जुनाप्रत श्रीकृष्णोक्ति आहे. याच कारणास्तव कर्म मीमांसकांनीं सर्व कर्माच्या अंतीं " **ओं तत्सत् ब्रम्हार्पणमस्तु** ", असा प्रयोग केला आहे. ओंकार, तत्कार आणि सत्कार हें तीन ब्र-

ह्म निर्देश आहेत. या वांचून सव कर्में व्यर्थ होतात. असें जें सज्ञान कर्म तेंच चित्तशुद्धीला कारण होतें. अज्ञानी लोक केवल कर्माचरण करून कर्मठपणाचा अभिमान मात्र धरितात. त्यायोगानें ते ज्ञानहीन केवल कर्म करून संसृति बंधाप्रत प्राप्त होतात. आत्मपुराण श्लोक० **अज्ञाश्चकेवलं कर्मचित्तशुद्धेस्तु कारणं ॥ मत्वा कुर्वंति ते मूढः प्रज्ञाहीनाः पतंत्यधः** ॥ १ ॥ जे लोक केवल कर्म चित्तशुद्धीस कारण होतें असें मानून कर्म करण्याविषयीं प्रवृत्त होतात. ते मूर्ख अधः पाताप्रत पावतात.

**ज्ञानदेवः**—कर्मानेंच चित्तशुद्धी होतें असा आम्हास प्रत्यय येतो.

**निवृत्तिः**—शिवपुराण॥**उष्णोदकं दहत्येव इतिलोकैस्तुगीयते** ॥ **दहनं तत्र वन्हेश्च सलिलस्य नवैगुणः** ॥ १ ॥ अर्थ० ॥ उष्णोदकानीं माझा पाय पोळला अशी लोकांमध्यें उक्ति आहे परंतु दहन करणें हीं उदकाची शक्ति नव्हे कारण **शैत्यंहि यत्सा प्रकृतिर्जलस्य** या न्यायानें पाहिलें असतां शीतत्व ही जलाची प्रकृति होय. त्यापासून दहन क्रिया कधींही व्हावयाची नाहीं. उदकानीं पाय पोळलेला असा प्रयोग मात्र आहे. परंतु तथ्य पाहिलें असतां अग्नि जलद्वारा दहन करितो. जसें तसें कर्म जड आहें तें चित्त शुद्धीस कारण कधींही होत नाहीं. ज्ञान हेंच कर्मद्वारा चित्त शुद्धीस कारण होतें. केवल कर्म होत नाहीं. "**नयुक्तमज्ञकर्मारंभः**" असा श्रुतीनेंही अन्य कर्माचा निषेध केला आहे. असें असून केवल कर्माविषयीं प्रवृत्त होणारे जे लोक त्यास श्रीमच्छंकराचार्य प्रभृति कर्म पाखांडी असें म्हणतात. याप्रमाणें कर्म, उपासना, आणि ज्ञान असें कथन केलें. असो, कर्म, उपासना, ज्ञान, आणि मंत्रतंत्रादिकांच्या सिद्धी करितां व ब्रह्मप्राप्ती करितां श्रीगुरूस शरण गेलें पाहिजे. मंडुकोपनिषदीं "**तद्विज्ञानार्थं सगुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रम्हनिष्ठम्**" भगवद्गिता श्लो० ॥ **तद्विद्धिप्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया** ॥ **उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः** ॥ १ ॥ भागवत—श्लो० ॥ **तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुःश्रेयउत्तमं** ॥ अशीं सद्गुरूस शरण जाण्याविषयीं वेदशास्त्रादिकांची बहुत प्रमाणें आहेत. मुमुक्षूनीं प्रथम सद्गुरू सेवा

हृदय तो यूप, त्याचा काम तें घृत, त्याचा मन्यू तो पशू, त्याचें तप तो अग्नि, त्याचा दम तो शमयिता, त्याची जी वाणी ती दक्षिणा त्याचा जो प्राण तो होता ( हवनकर्ता ), त्याचे जे चक्षू तो उद्गाता, त्याचें जें मन तो अध्वर्यू, त्याचे श्रोत्र तो ब्रह्मा, यावत् त्याचें जीवन तावत् यज्ञदीक्षा, तो जें भक्षण करितो तें हवी, तो जें पान करितो तें सोमपान, इत्यादि श्रुत्यर्थावरून तो ज्ञानी यज्ञमयच आहे असें सिद्ध होतें. अशा सिद्धाला बाह्य यज्ञ करावयास नको. मनुष्यांनीं त्यांचें सामानाधिकरण्य ग्रहण करितां युक्त नव्हें. जीवांनीं यज्ञ दान आणि तप अशीं जीं नित्य नैमित्तिक कर्मे तीं अवश्य केलीं पाहिजेत. आतां गीता. श्लो० **कर्मण्य कर्मयः पश्येदकर्मणिच कर्मयः ॥ स बुद्धिमान् मनुष्येषु सयुक्त कृत्स्न कर्मकृत्** ॥ १ ॥ अर्थ—कर्मामध्यें अकर्म आणि अकर्मामध्यें कर्म याचा सर्वकाल विचार करणारा जो पुरूष तो सर्वांमध्यें बुद्धिमान् जाणावा असें कृष्णाचें मत आहें. वरें, त्या कर्मकर्तृत्वाचा अभिमान न धारण करितां तें सर्व कर्म ब्रह्मार्पण केलें पाहिजे. याविषयीं नमम नमम असें वेदामध्यें बहुत प्रयोग आहेत. गीता० **ब्रम्हार्पणं ब्रम्ह हविर्ब्रम्हाग्नौ ब्रम्हणाहुतं ब्रम्हैव तेन गंतव्यं ब्रम्हकर्मसमाधिना** ॥ १ ॥ **यत्करोषियदश्नासी यज्जुहोषिददासियत् ॥ यत्तपस्यासि कौंतेय तत्कुरुष्वमदर्पणं** ॥ १ ॥ भागवत श्लोक० ॥ **इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मन** प्रियं ॥ **दारान् सुतान् गृहान् प्राणान् यत्परस्मै निवेदनं** ॥ १ ॥ अर्थ० जें करशील, जें भक्षण करशील, जें होमित करशील, जें दान करशील, जें तप करशील, जो जप करशील, किंबहुना तुझ्या आत्म्याला प्रिय जें जें करशील तत्तत्कर्तृत्वाचा अहंकार न धरितां तें तें सर्व ब्रह्मार्पण कर. ह्मणजे गीता० ॥ **शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्म बंधनैः ॥ सन्यास योग युक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यासि** ॥ १ ॥ अर्थ० त्या त्या कर्मांपासून उत्पन्न होणारीं जीं शुभाशुभ फलें तद्रूप बंधनापासून मुक्त होऊन संन्यास योग युक्त होत्साता ब्रह्म पदवीप्रत प्राप्त होशील अशी गीतेमध्यें अर्जुनाप्रत श्रीकृष्णोक्ति आहे. याच कारणास्तव कर्म मीमांसकांनीं सर्व कर्मांच्या अंतीं “ **ओं तत्सत् ब्रम्हार्पणमस्तु** ” असा प्रयोग केला आहे. ओंकार, तत्कार आणि सत्कार हें तीन ब्र-

ह्म निर्देश आहेत. या वांचून सव कर्मे व्यर्थ होतात. असें जें सज्ञान कर्म तेंच चित्तशुद्धीला कारण होतें. अज्ञानी लोक केवल कर्माचरण करून कर्मठपणाचा अभिमान मात्र धरितात. त्यायोगानें ते ज्ञानहीन केवल कर्म करून संसृति बंधाप्रत प्राप्त होतात. आत्मपुराण श्लोक० **अज्ञाश्चकेवलं कर्मचित्तशुद्धेस्तु कारणं ॥ मत्वा कुर्वंति ते मूढः प्रज्ञाहीनाः पतंत्यधः ॥ १ ॥** जे लोक केवल कर्म चित्तशुद्धीस कारण होतें असें मानून कर्म करण्याविषयीं प्रवृत्त होतात. ते मूर्ख अधः पाताप्रत पावतात.

**ज्ञानदेवः**—कर्मानेंच चित्तशुद्धी होतें असा आम्हास प्रत्यय येतो.

**निवृत्तिः**—शिवपुराण॥**उष्णोदकं दहत्येव इतिलोकैस्तुगीयते ॥ दहनं तत्र वन्हेश्च सलिलस्य नवैगुणः ॥ १ ॥** अर्थ० ॥ उष्णोदकानीं माझा पाय पोळला अशी लोकांमध्यें उक्ति आहे परंतु दहन करणें हीं उदकाची शक्ति नव्हे कारण **शैत्यंहि यत्सा प्रकृतिर्जलस्य** या न्यायानें पाहिलें असतां शीतत्व ही जलाची प्रकृति होय. त्यापासून दहन क्रिया कधींही व्हावयाची नाहीं. उदकानीं पाय पोळलेला असा प्रयोग मात्र आहे. परंतु तथ्य पाहिलें असतां अग्नि जलद्वारा दहन करितो. जसें तसें कर्म जड आहें तें चित्त शुद्धीस कारण कधींही होत नाहीं. ज्ञान हेंच कर्मद्वारा चित्त शुद्धीस कारण होतें. केवल कर्म होत नाहीं. "**नयुक्तमज्ञकर्मारंभः**" असा श्रुतीनेंही अन्य कर्माचा निषेध केला आहे. असें असून केवल कर्माविषयीं प्रवृत्त होणारे जे लोक त्यास श्रीमच्छंकराचार्य प्रभृति कर्म पाखांडी असें म्हणतात. याप्रमाणें कर्म, उपासना, आणि ज्ञान असें कथन केलें. असो, कर्म, उपासना, ज्ञान, आणे मंत्रतंत्रादिकांच्या सिद्धी करितां व ब्रह्मप्राप्ती करितां श्रीगुरूस शरण गेलें पाहिजे. मंडुकोपनिषदीं "**तद्विज्ञानार्थं सगुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रम्हनिष्ठम्**" भगवद्गिता श्लो० ॥ **तद्विद्धिप्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ॥ उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः** ॥ १ ॥ भागवत—श्लो० ॥ **तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुःश्रेयउत्तमं** ॥ अशीं सद्गुरूस शरण जाण्याविषयीं वेदशास्त्रादिकांचीं बहुत प्रमाणें आहेत. मुमुक्षूनीं प्रथम सद्गुरू सेवा

करून गुर्वाज्ञेनुरूप साधनास आरंभ करावा. असें करणारास उत्तम श्रेय प्राप्त होईल. श्लो० ॥ **यस्यदेवपराभक्तिर्यथादेवे तथागुरौ ॥ तस्यैतेकथिताह्यर्था प्रकाशंते महात्मनः** ॥ १ ॥ अर्थ० जशी देवाचे ठायीं भक्ति तशीच गुरूचे ठायीं केली असतां त्यास सर्व अर्थ प्राप्त होतील, असें श्वेताश्वतरामध्यें सांगितलें आहे. सद्गुरूवांचून द्वैतभय निवृत्ति होणार नाहीं. भागवत—श्लो० **भयं द्वितीयाभिनिवेशतःस्यादीशादपेतस्य विपर्ययोस्मृतिः ॥ तन्माययातो बुध आभजेत भक्त्यैकयेशं गुरुदेवतात्मा** ॥ १ ॥ अर्थ ॥ द्वैताच्या अभिनिवेशानें व महा मायेच्या योगानें जगदीश्वराच्या विस्मृतीमुळें उत्पन्न झालेलें जें भय त्याचा निरास करण्याकरितां गुरु देवतात्मा होऊन एकविध भक्तीनें ईश्वराचें भजन करावें, असें नवसिद्ध प्रसंगांत कथन केलें आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं, उपासना ही गुरुपदिष्ट केली पाहिजे. असो ज्याच्या योगानें अधिष्ठान निराकार निरंजन ब्रह्म जाणिलें जातें, तस्मात् सर्व देवापेक्षां सद्गुरू हा श्रेष्ठ होय. श्लो०॥ **गुरावतुष्टे तुष्टा स्युः सर्वे देवाद्विजोत्तमाः ॥ तुष्टे तुष्टायतस्तस्मात् सर्व देवमयो गुरुः** ॥ १ ॥ अर्थ० सद्गुरूचा असंतोष झाला असतां सर्व देव असंतुष्ट होतात. आणि सद्गुरू तुष्ट झाला असतां सर्व देव संतोषित होतात. ह्मणून सर्व देवमय सद्गुरू होय. याविषयीं श्लो० **गुरु ब्रंम्हा गुरु विष्णू गुरु देवो महेश्वराः ॥ गुरुःसाक्षात् परंब्रम्ह तस्मैश्रीगुरुवेनमः** ॥ १ ॥ स्मृतिप्रमाण आहे. तर श्लो० ॥ **श्रेयोर्थी यदि गुर्वाज्ञां मनसापि न लंघयेत् ॥ गुर्वाज्ञापालकोयस्मात् ज्ञान संपत्ति मश्नुते** ॥ १ ॥ अर्थ० मुमुक्षूनीं अत्यंत श्रेय प्राप्तीकरितां सद्गुरूची आज्ञा मनाच्या योगानेंही उल्लंघन करूं नये. उल्लंघन करील तर अधःपातास जाईल. आणि गुर्वाज्ञा पालन करील तर ज्ञान संपत्तीचा उपभोग करील, असें परशरमाधवीय ग्रंथांत सांगितलें आहे. शिष्यांनीं सद्गुरु प्रसाद व्हावा ह्मणून गुरु सेवेविषयीं अत्यंत तत्पर राहिलें पाहिजे. त्यांना क्रोधयुक्त करितां कामा नये. अदित्यपुराण. श्लो० ॥ **पाद्मे रुष्टे हरस्त्राता हरे रुष्टे हरि स्तथा ॥ हरौ रुष्टे गुरु स्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन** ॥ अर्थ० ॥ ब्रह्मदेव रुष्ट झाले असतां त्यापासून शंकर संरक्षण कारितात. शंकर रुष्ट झाले

असतां त्यापासून विष्णू संरक्षण करितात. विष्णू रुष्ट झाले असतां त्यापासून सद्गुरू संरक्षण करितात. सद्गुरू रुष्ट झाले असतां मग मात्र कोणीही संरक्षण करावयाचे नाहीं. तस्मात् सद्गुरूस क्रुद्ध न करितां सेवेच्या योगानें त्यांस संतुष्ट करणें हें शिष्याचें कर्म होय.

ज्ञानदेवः--सद्गुरू कसा असावा. कारण-श्लो० ॥ **गुरवो बहवःसंति शिष्यवित्ताप हारकाः गुरवो विरलाः संति शिष्य हृत्ताप हारकाः** ॥ १ ॥ अर्थ० माळा मुद्रा घालून शिष्याचें द्रव्य उपटणारे गुरु बहुत आहेत. परंतु शिष्याचा हृत्ताप हरण करणारे गुरू विरल असतात.

निवृत्तिः--सद्गुरू सत्पुरूष असावा.

ज्ञानदेवः--सत्पुरूष कोणास ह्मणावें हेंच कळत नाहीं.

निवृत्तिः--सत्पुरुषांचीं लक्षणें कथन करितों. गीता--श्लो० ॥ **अद्वेष्टा सर्व भूतानां मैत्रः करुण एवच ॥ निर्ममो निरहंकारः समदुःख सुख क्षमी** ॥ १ ॥ श्लो० ॥ **संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढ निश्चयः ॥ मर्यापितमनो बुद्धिर्योमद्भक्तः समेप्रियः**॥२॥ **अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ॥ सर्वारंभपरित्यागी योमद्भक्तः समेप्रियः** ॥ ३ ॥ **यो न हृष्यति न द्वेष्टी न शोचति न कांक्षति ॥ शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् यः समेप्रियः** ॥४॥ **समःशत्रौचमित्रे च तथा मानापमानयोः ॥ शीतोष्ण सुखदुःखेषु समः संग विवर्जितः** ॥ ५ ॥ **तुल्यनिंदा स्तुतिमौनी संतुष्टो येन केनचित् ॥ अनिकेत स्थिरमति भक्तिमान् मे प्रियो नरः** ॥ ६ ॥ अर्थ--जो सर्व भूताचे ठायीं अद्वेष्टा ज्याचें मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत मित्रत्व, ज्याची सर्वावर दया, ज्याचेठायीं ममत्व आणि अहंकार हें मुळींच वास करीत नाहींत, जो सुखदुःखास सम आणि क्षमावान्--ज्याची वृत्ति सार्वकाल आनंदमय राहते, जो अंतःकरण चतुष्टयादी इंद्रियें आणि चक्षुरादि बहिरिंद्रियें आपल्या स्वाधीन ठेवितो--ज्यानीं आपले बुद्धी आणि मन जगदीश्वराचे ठायीं अर्पण केलें आहे.--जसें समुद्राच्या भरतीनें जळचरास भय उत्पन्न होत नाहीं तसें ज्याच्या पासून प्राणीमात्रास उद्वेग होत नाहीं--हार्षामर्ष, प्रियाप्रिय, भय, उद्वेग इत्यादिकांनीं ज्याचा त्याग केला आहे--जो जगदीश्वाराच्या भक्तीवाचून

अन्य मोक्षादि पदार्थाची इच्छा करीत नाहीं, गंगाजळास लाजिवणारें असें ज्याचें अंतर्बाह्य शुचित्व आहे जो परमार्थाविषयीं दक्ष आणि प्रपंचाविषयीं उदासीन असतो—ज्याच्या अंतःकरणांत कर्म कर्तृत्वाचा अहंकार मुळींच राहिला नाहीं, स्वरूप प्राप्तीमुळें जो विषयप्राप्तीनें आनंद पावत नाहीं, जो पदार्थ नष्ट झाला त्याचा शोक करीत नाहीं, व त्याच्या प्राप्तीविषयीं इच्छाही करीत नाहीं, ज्याच्या अंतःकरणांत शत्रु आणि मित्र, मान आणि अपमान, सुख आणि दुःख, शीत आणि ऊष्ण, निंदा आणि स्तुती इत्यादि द्वैत मुळींच राहिलें नाहीं व ह्यापासून ज्याचें अंतःकरण सविकृत होत नाहीं, इत्यादि चिन्हें ज्या पुरुषाचे ठायीं वास करतील त्यास सत्पुरुष ह्मणावें.

**ज्ञानदेवः**—आपण निरोपित केलेलीं चिन्हें हीं सत्पुरुषाचे ठायींच वास करितात असें नाहीं तर पित्त क्षोभानें पिशाच्चाप्रमाणें वर्तन करणारे जे लोक त्यांचेठायीं ही पूर्वोक्त लक्षणें कांहीं वास करितात. किंवा दोन वर्षांचे अज्ञान मुलाचेठायीं हीं वास करितात, तर यांना सत्पुरुष ह्मणावें कीं काय?

**निवृत्तिः**—पिशाच्चाप्रमाणें वर्तन करणाऱ्या पुरुषाचे ठायीं व अज्ञान मुलाचे ठायीं पूर्वोक्त कांहीं चिन्हें जरी वास करितात; तरी मी जीं वक्ष्यमाण चिन्हें कथन करणार तीं मात्र वास करीत नाहींत. तीं कोणचीं तीं सांगतों:—

श्लो० ॥ **शाब्दे परेच निष्णातं ब्रम्हण्युपश्रमाश्रयं** ॥ भाष्य, श्लो० ॥ **परिपक्वमलोपेता उत्सादन हेतु शक्तिपातेन** ॥ **योजयाति परेतत्वे सदीक्षयाचार्य मूर्तिस्थः** ॥ १ ॥ " **वेदार्थ प्रत्ययवान् आचार्यः** ॥ " अर्थ० जे सत्पुरूष अध्यात्मादि शाद्ब ब्रह्मांत निष्णात असून अनुभव ब्रह्मांतही निष्णात आहेत, ज्याची वृत्ति सदा ब्रह्ममय झाली आहे, शरण आलेल्या महा पातकी जीवांच्या उद्धाराविषयीं व पापनिर्दलनाविषयीं ज्यांच्या अंगीं शक्ति आहे, त्या पुरुषास सत्पुरूष ह्मणावें, असें तैतिरीय शाखेंत सांगितलें आहे. व त्यासच गुरू ह्मणावें. याविषयीं वेदार्थ प्रत्ययवान् जो तोच आचार्य असें उपनिषदीं प्रमाण आहे.

**ज्ञानदेवः**—त्यांना गुरु असें कां ह्मणावें ?

निवृत्तिः—गुशब्दस्त्वंधकारस्यात् रुशब्दस्तन्निवर्तकः॥ तयोरैक्यं परंब्रम्ह गुरुरित्यभिधीयते ॥ १ ॥ अर्थ० गुशब्द अज्ञान अंधकारवाचक आहे, आणि रुशब्द तन्निवर्तक आहे. व " रंबीजमग्नेः " रेफ हें दाहकत्वाचें बीज आहे, अशी मंत्रशास्त्रांत उक्ति आहे. सारांश—शिष्याचा अज्ञान अंधःकार जो दूर करितो त्यास गुरू ह्मणावें. आतां शिष्य ही श्रद्धावंत आत्मानात्म विचारादि साधन चतुष्टय संपन्न गुर्वाज्ञापालक, अवंचक, गुरूसेवा तत्पर असा असावा. अशा सद्गुरू सत्शिष्याची भेटी झाली असतां त्यांचें जें उपदेशपर भाषण तेंच अन्य जीवांच्या कल्याणार्थ होतें. योगवाशिष्ट, श्लो० ॥ तत्ज्ञानं सचशास्त्रार्थः तद्विज्ञानमखंडितं ॥ सत्शिष्याय विरक्ताय ज्ञानी यदुपदिश्यति ॥ १ ॥ अर्थ० ॥ तें सद्गुरू सत्शिष्याचें जें उपदेशिक भाषण तेंच ज्ञान, तोच शास्त्रार्थ, तेंच अखंडित विज्ञान, त्या भाषणानींच जीवास मुक्ति प्राप्त होते. त्या सद्गुरू सत्शिष्य भाषणरूप एक यज्ञच होय. श्लो० ॥ आचार्योरणिराद्यस्यादं तेवास्युत्तरारणिः ॥ तत्संधानं प्रवचनं विद्यासंधिः सुखावहः ॥ १ ॥

ज्ञानदेवः—तो यज्ञ कसा ?

निवृत्तिः—" आचार्यः पूर्वरूपं अंते वा स्युत्तररूपं तत्संधानं प्रवचनं विद्यासंधिः इत्युपनिषदः " ॥ या यज्ञांतील सद्गुरू हा दक्षिणारणी होय अंतेवासी ( शिष्य ) हा उत्तरारणी होय. सद्गुरू सत्शिष्यांचीं जीं प्रश्नोत्तर रूप भाषणें तेंच आरणीचें घर्षण होय. त्यापासून उत्पन्न झालेलें अत्यंत श्रेयस्क जें तत्वज्ञान तोच अग्नि होय. याप्रमाणें सद्गुरू माहात्म्य वर्णन केलें. आतां अज्ञ लोकांच्या उद्धारार्थ सर्व साधनामध्यें जगदीश्वर नाम संकीर्तन करणें हें मुख्य साधन होय. श्लो० ॥ नाम्नश्च यावती शक्तिः पापनिर्दलने क्षमा ॥ तावत्कर्तुं न शक्नोति पातकं पातकीजनः ॥ १ ॥ अर्थ—नाम संकीर्तनाचे ठायीं इतकी पापनिर्दलन करण्याविषयीं शक्ति आहे कीं पातकी लोक तदनरूप पापेंच करण्याविषयीं समर्थ नाहींत. श्लो० ॥ कलौ नास्त्यैव नास्त्यैव नास्त्यैवगतिरन्यथा ॥ अर्थ—कलियुगाचेठायीं अज्ञ जीवास नामस्मरणा वांचून अन्य गतीच नाहीं. मत्स्येंद्र

संहिता० श्लो—-**सर्व साधन हीनोपि विषये लुब्ध मानसः ॥ स्मरेदाश सर्वै मुक्तो विरक्तो याग वित्तमः ॥ १ ॥** अर्थ—पुरूष यज्ञादि सर्व साधन हीन व विषयाचे ठायीं लुब्ध मन जरी असला तरी जगदीश्वराचें नाम स्मरण करील तर सर्व पातका पासून मुक्त होऊन विरक्त होत्साता तत्व ज्ञानवेत्ता होईल. याविषयीं गीता श्लो० ॥ **अपिचेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥ साधुरेव स-मंतव्यः सम्यग् व्यवसितोहि सः ॥ १ ॥ मांहिपार्थव्यपाश्रि-त्य येपि स्युः पापयोनयः ॥ स्त्रियो वैश्याः तथा शूद्राः तेपि-यांति परांगतिं ॥ २ ॥** अर्थ—पंचमहा पातकी पापयोनी स्त्रिया, वैश्य, आणि शुद्र इत्यादिक् जर जगदीश्वराचें अनन्यभावानें भजन करतील तर ते जगदीश्वराच्या उत्कृष्ठ गतीप्रत प्राप्त होतील, अशी श्रीकृष्णोक्ति आहे. पद्मपुराण श्लो० ॥ **विधि नियम वैगुण्यैः क्षुभ्यंते मंत्रदेवताःहरेराममहामंत्रः सर्वावस्थासु सिद्धिद ॥१॥** अर्थ—अन्य मंत्र वेद विधी नियमास वैगुण्य आलें असतां त्या मंत्रदेवता क्रुद्ध होऊन अनिष्ट करितात आणि हरेराम हा महामंत्र कोणच्याही अवस्थेच्या ठायीं कोणच्याही वेळेस जप केला असतां सकल मनोरथ पूर्ण करणारा होतो. असा वेदाविधि निषेध रहित व काल नियम रहित दुसरा कोणाचाच मंत्र नाहीं. ह्मणून जगदीश्वराचें नाम संकीर्तन हें मुख्य साधन होय. पहा ऋग्वेदादि चतुर्वेद हरिः ओं या नामाचा उच्चार झाल्या-वांचून निष्फल होतात, असें ब्रह्मसूत्रामध्यें सांगितलें आहे. व वेदाध्ययन करण्याच्या प्रारंभीं हरिः ओं ह्मणण्याचा सांप्रदाय अद्या-पिही आहे. असो सर्व क्रिया नामस्मरण केल्यावांचून पूर्णतेप्रत पावत नाहींत. याविषयीं श्लो० **यस्यस्मृत्याच नामोक्त्या तपो यज्ञक्रियादिषु ॥ न्यूनं संपूर्णतां याति सद्योवंदेतमच्युतं ॥१॥** अर्थ० ज्याच्या नामस्मरणाच्या योगानें तपोयज्ञादि क्रियामध्यें जें न्यून असेल तें पूर्णतेप्रत पावतें, असें स्मृति प्रमाण आहे. यावरून नामसंकीर्तन हें साधन श्रेष्ट आहे.

नंतर **निवृत्तीनींओंनमोभगवतेवासुदेवाय** यामंत्राचा उपदेश केला. शाबरीमंत्राच्यायोगानें नरसी,कालिका,झोषासूर,महंमद,झोटिंग,वीरभद्र,वे-ताळ,मारुती,सूर्य,कुमारी,विमळा, चंडा, चांमुडा, रंडा, महालंडा,अप्सरा,

योगिनी, भैरव, कालभैरव, सिद्धभैरव, रुद्रभैरव, गणभैरव इत्यादि अष्टभैरव, शांखिनी, यक्षिणी आणिमामहिमादि अष्टमहासिद्धि इत्यादि बावन्न बिराची प्राप्ती होते असें जें शाबरीमंत्र त्याचा उपदेश केला व गोरख किमयाही कथन केली. याप्रमाणें ज्ञानदेवाप्रत **श्री निवृत्तीनीं** श्री आदिनाथ शंकरोपदिष्ट तत्वज्ञान निवेदन केलें. **ज्ञानदेवानें** असा सप्तदिनपर्यंत ज्ञानोपदेश श्रवणकरून श्रीगुरू **निवृत्तीस** साष्टांग नमस्कार केला आणि ह्मणाले कीं, श्लो० ॥ **धन्योस्मि कृत कृत्योस्मि कृतकार्योस्मि चानघ ॥ त्वत्तोपदिष्ट ज्ञानेन त्वज्ञानं नाशितं ध्रुवं** ॥ १ ॥ तुमच्या उपदेशाच्या योगानें माझें अज्ञान नष्ट होऊन मी कृत्यकृत्य झालों असें त्यांचें उपदेषात्मक भाषण झालें.

॥ सप्तमोल्लासः ॥

श्री वि ठ्ठ ल

# ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

**ग्रंथैरभंगैरुपदिश्यचत्मनो। ह्यद्वैततत्वंतुसभक्तिकंजनान् ॥ सर्वार्थदोयंजयतिस्मसद्गुरुः। श्रीज्ञानदेवंतमिमंनतोस्म्यहं॥१॥**

सत्पुरुषांची वाणी सर्व बोधपरच असते; आणि अज्ञान जीवांच्या कल्याणास्पद ही होते. पहा, **श्रीज्ञानेश्वरानीं** ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पासष्टी, आणि योग वाशिष्ठ, इत्यादीक जे जे ग्रंथ केले आहेत त्या त्या ग्रंथांचा सर्वांस पारमार्थिक अवर्णनीय उपयोग होतो. तो इतका कीं उदाहरणार्थ श्रीमद्भगवद्गीता, या गीतेवर श्रीधरी, मधुसूदनी, विजयध्वज, शांकर आणि माध्व अशा बहुत टीका आहेत. त्यामध्यें श्रीमच्छंकराचार्य कृत जी टीका आहे ती निर्विवाद व फारच उत्तम आहे. परंतु लोकांमध्यें अज्ञान, मौढ्य, व अविचार असल्या कारणानें ती टीका दुर्बोध आहे; आणि भगवद्गीते सारिखा वेदार्थ प्रमेयाचा ग्रंथ सर्व पुराणामध्यें नाहींच असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ती भगवद्गीता प्राकृत अज्ञान जीवास कळावी ह्मणून **श्रीज्ञानदेवानीं** ज्ञानेश्वरी यानामे महाराष्ट्र भाषेंत तिची टीका केली आहे. श्रीभगवद्गीता रूप एक नदी होय; आणि त्यामध्यें वेदार्थ प्रमेयाचें उदक **अनस्फत** वहात आहे. त्यां भगवद्गीतारूप नदीला वेदार्थ प्रमेयरूप उदक प्राशन करण्याकरितां **शांकर मध्व** प्रभृतींनीं द्वैताद्वैत टीकेंचे तट बांधिले आहेत; परंतु ते तट गहन व फार उंच असल्यामुळें जीवांच्या हातांत गीतानदींचें वेदार्थ प्रमेयरूप जल येत नाहीं. तें पाहून दीनवत्सल **श्रीज्ञानेश्वरानीं** बुद्धिमंजुषेतील ज्ञानद्रव्याचा व्यय करून त्या तीरास मराठी शद्बरूप सोपान ( पायऱ्या ) बांधिल्या. त्या योगानें ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्व जा-

तीस गीतारूप नदींतील वेदार्थ प्रमेयरूप जल उपयोगी पडूं लागलें. याविषयीं ज्ञानेश्वरींतील उक्ति ओ० ॥ **तीरें संस्कृताची गहनें ॥ तोडोनि मऱ्हाठीया शब्द सोपानें ॥ रचिली धर्म निधानें ॥ श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥ म्हणोनि भलतेनी येथें सद्भावें नाहावें ॥ प्रयाग माधवी विश्वरूपपहावें ॥ येतुलेनी संसाराशीं द्यावें तिळोदक ॥ १० ॥** अध्याय ११ ॥ भगवद्गीता ह्मणजे सर्व वेदार्थांचें सार होय; आणि त्या गीतेचा अर्थ आमच्या सारख्या अज्ञानी जीवास कळावा ह्मणून जर ज्ञानेश्वरी ग्रंथ केला आहे तर त्याचा किती उपयोग सांगावा ! **श्रीज्ञानेश्वरानीं** हा एक जगतावर मोठा उपकारच केला आहे. असो. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ सर्व प्राकृत ग्रंथामध्येंही श्रेष्ट होय. यामध्यें **श्रीज्ञानेश्वरानीं** दृष्टांत देण्याची उपमा उपमेय सादृश्याची व रूपक करण्याचा फार कमालच केली आहे. जे जे पारमार्थिक दुर्बोध विषय आहेत तें तें दृष्टांताच्यायोगानें व रूपकाच्यायोगानें समजल जाऊन चित्तास फार अत्यानंद देतात. **श्रीज्ञानेश्वराची** भाषा फार जुनी अध्यात्म निरूपणाची व संस्कृत अपभ्रंशाची असल्या कारणानें अवघड वाटते. कोणी **ज्ञानेश्वर** यजुर्वेदी देशस्थ होते ह्मणून त्यांची अशी अशुद्ध भाषा आहे, असा अपेक्ष करतील तर हें ह्मणणें साहजाचे होय, कारण, पूर्वीं देशीय भाषाच तसी होती. प्रस्तूत त्या भाषेंतील कांहीं शद्बांचा लोप झाला आहे ह्मणून तसें वाटते; आणि खेर पूर्वींचें संस्कृत भाषेंतील अपभ्रंश पाहिले असतां आधुनीक भाषाच अशुद्ध आहे. उदाहरण संस्त्वतामध्यें **पानीय** शद्ब त्याचा अपभ्रंश **पा**नी हा शद्ब होय तेथें **न**त्वाचेठायीं **ण**त्व ह्मणजे पानी शब्द असतां पाणी, हें कसें झालें, यास प्रमाण काय ? व कोणच्या पाणिनीय सूत्राच्यायोगानें **न**त्वाचेठायीं **ण**त्व केलें आहे, असें विचारिलें असतां कांहीं उत्तर देता येणार नाहीं. तस्मात् तीच भाषा शुद्ध आहे. आणि **श्रीज्ञानेश्वर सदृश** सत्पुरुषावर शब्दाच्यासंबंधानें अशुद्धपणाचा आक्षेप करणें ह्मणजे जसे अक्षरशून्य पुरुषांनीं **प**तंजली भाष्यकाराच्या रचनेस दोष ठेवणें तसें होय. आतां ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ परमार्थामध्यें उपयुक्त असा फार थोडा आहे. ज्ञानेश्वरी ग्रंथामध्यें कर्म, उपासना आणि ज्ञान या कांडत्रयाचें विशेष वर्णन

आहे. आणि कोठे कोठे ब्रह्म निरूपण व नीतिही सांगितल्या आहेत. त्यापैकीं संक्षेपानें वर्णन करतों. तें प्रथम—कर्माचें अकरण, काम्य, निषिद्ध, नित्य आणि नैमित्तिक असे पांच प्रकार आहेत. त्यापैकीं, अकरण, काम्य आणि निषिद्धहीं तीन कर्में जीवास पुनर्जनन मरणरूप संसार भय उत्पन्न करणारी होत. ह्मणून सर्वांनीं यांचा त्यागच केला पाहिजे, ज्ञानेश्वरी, अध्याय १८ वा—जे **अकरणकाम्यनिषिद्ध॥ हेमार्ग तिन्ही प्रसिद्ध ॥ संसार भय सबाध ॥ जीवाया ॥ ९९ ॥** आतां नैमित्तिक दोन कर्में यांचा सत्यत्वे करून विचार केला असतां तीं दोनी मिळून एकच कर्म होय परंतु त्याचा इतकाच भेद आहे कीं, प्रति दिवशीं जें कर्म करावयाचें असतें तें नित्य आणि कांहीं निमित्तानें तेंच अधिक वाटतें तें नैमित्तिक-ज्ञानेश्वरी, अध्याय १८ वा—॥ **आणि सोम सूर्य ग्रहणें ॥ येऊन करिती पार्वणें ॥ कां माता पितरमरणें ॥ आंकित जे दिवस ॥ १०९ ॥ अथवा आतिथी हन्पावे ॥ ऐसैसेपडे जें करावे ॥ तें तें कर्म जाणावें ॥ नैमित्तिक ॥ ११० ॥ वार्षिया क्षोभे गगन ॥ वसंते दुणावे वन ॥ देहशृंगारी यौवन ॥ दशा जैसी ॥ १११ ॥ सोमकांतू सोमेपाल्हाळे ॥ सूर्यफांकती कमळे ॥ तेथें असें तेचिपळघे ॥ आन नयें ॥ ११२ ॥ तैसें नित्य जें कां कर्म ॥ तें निमित्ताचें ॥ लाहे नियम ॥ येथें उंचावे तेणें नाम ॥ नैमित्तिक होय ॥ ११३ ॥ आणि सायं प्रातर्माध्यानीं ॥ करणीय प्रतिदिनी ॥ परी दृष्टी जैसी लोचनीं ॥ आधिक नव्हे ॥ ११४॥ का नापादिसा गती ॥ चरणी जैसी अर्थी ॥ नातरी दीप्ती॥ दीपबिंबी ॥ ११५ ॥ वासु न देता जैसे ॥ चंदनी सौगंध असे ॥ अधिकाराचे तैसे ॥ रूपचि जे ॥ ११६ ॥ नित्यकर्म ऐसे जनी ॥ पार्था बोलिलें तें हें मानी ॥ एवं नित्य नैमित्तिक दोन्ही ॥ दाविले तुज ॥ ११७ ॥** अशी नित्य नैमित्तिक कर्में जीवांनीं केलीच पाहिजेत नाकरतील तर त्याला अकरणी प्रत्यवाच लागेल अध्याय ३ रा ओ० ॥ **हानिजधर्मसांडे॥आणि कुकर्मी रती वाढे॥तैचि बंधूपडे ससारीक ॥८२॥** असें नित्य कर्म करीत असतां त्याच्या फळाचा जर संग धरील तर

तेंच काम्य कर्म होऊन संसार बंधास कारण होईल. ह्मणन फलाशा-रहित होत्साता कर्तेपणाचा अभिमान मोडून ईश्वर प्रीत्यर्थच जें कर्म करणें तेंच उत्तम होय; व तेणेंकरूनच ईश्वराचा संतोष होतो. याप्र-माणें स्वकर्माचे ठिकाणीं रत असतां कांहीं दिवसांनीं जगदीश्वर प्रसा-दानें विषयांचे ठायीं वैराग्य उत्पन्न होऊन अद्वयानंद स्वरूप प्राप्ती होते. कर्म जन्य फलाचा त्याग कां करावा? अशी शंका घेशील तर ज्या कर्माच्या योगानें जगदीश्वर प्राप्ती होणार आणि तें कर्म करून जर तुच्छ नैश्वर्य फलाची इछा करील तर तो पुरुष तें नैश्वर्यफल पा-वून जन्ममृत्यूच्या संसारांत पडतो. त कर्म यज्ञदान तपादिक जरी असेल तरी तें उपयुक्त नव्हे. कारण यज्ञादि कर्म जन्य फलाचें अ-धिष्ठान ईश्वरच आहे. त्या जगदीश्वराचा अपमान करून जर स्वर्ग फलाची इच्छा करील तर तो स्वर्गफल पाऊन क्षीण पुण्य झाला अ-सतां पुनरपि मृत्यु लोकीं जन्म घेईल. ज्ञानेश्वरी, अध्याय ९ ओ०—

**देख पागा कीरीटी ॥ आश्रमधर्मांचिया राहाटी ॥ जेविधि-मार्गा कसवटी ॥ आपणच होती ॥ ३०७ ॥ यजन करितां कौतुकें ॥ तिन्हीवेदांचामाथातुके ॥ क्रियाफळेसी उभी ठाके ॥ पुढाजयाच्या ॥ ३०८ ॥ ऐसेदीक्षीत जे सोमप ॥ आपणचियज्ञाचें रूप ॥ तेहीं तयापुण्याचें नांवें पाप ॥ जोडिलें देख ॥ ३०९ ॥ जे श्रुतित्रयाते जाणुनी ॥ शतवरी यज्ञकरूनी ॥ यजिलीयामाते चुकूनी ॥ स्वर्गू वरिती ॥ ३१० ॥ जैसे कल्पतरू तळवटीं ॥ बैसोनि झोळिये पाडी गाठी ॥ मग निदैव निघे किरीटी ॥ दैन्यचिकरू ॥ ३११ ॥ तैसे शतक्रतू यजिले मातें ॥ कीं इच्छिताती स्वर्ग सुखातें ॥ आतांपुण्यकीं हें निरूतें ॥ पापनोव्हे ॥ ३१२ ॥ म्हणोनी मज वीण पाविजे स्वर्गू ॥ तो अज्ञानाचापुण्यमार्गू ॥ ज्ञानि-ये तयातें उपसर्गू ॥ हानी म्हणती ॥ ३१३ ॥ येहवीं तरी नरकींचें दुःख ॥ पाहोनि स्वर्गनांवे कीं सूख ॥ वाचूनि नित्यानंद निर्दोष ॥ तें स्वरूप माझें ॥ ३१४ ॥ मज येता पैं सुभटा ॥ या द्विविधागा अव्हाटा ॥ स्वर्ग नरक या वाटा चोराचिया ॥ ३१५ ॥ स्वर्गा पुण्यात्मक पापे येईजे ॥**

पापात्मक पापें नरका जाइजे ॥ माते जेणें पाविजे तें शुद्ध पुण्य ॥ ३१६ ॥ आणिमजचिमाजी असतां ॥ जेणें मी दूरी होय पंडुसुता ॥ तें पुण्यऐसें म्हणता ॥ जीभनतुटे-कायी ॥ ३१७ ॥ परी असो हें प्रस्तूत ॥ यापरी ते दीक्षीत॥ यजूनमाते यांचीत ॥ स्वर्गभोग ॥ ३१८ ॥ मग मी नपाविजेऐसे ॥ जें पापरूपपुण्य असे ॥ तेणें लाधलेनिमौरसे ॥ स्वर्गाचिती ॥ ३१९ ॥ जेथें अमरत्व हें सिंहासन ॥ ऐरावता सारिखे वाहन ॥ राजधानी भुवन ॥ आमरावती ॥ ३२० ॥ जेथें म ाद्धाची भांडारें ॥ आमृताची कोठारें ॥ जियें गां ां खिल्लारें ॥ कामधेनुची ॥ ३२१ ॥ हें असो बहु ऐसे ॥ भोग इंद्रसुखा सरिसे ॥ तें भोगीजती नव असे ॥ पुण्य लेश ॥ ३२७ ॥ मग तया पुण्याची पाउटीं सरे ॥ सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे ॥ आणि येऊ लागती माघारे ॥ मृत्यु लोका ॥ ३२८ ॥ जैसा वेश्या भोगीं कवडावेचे ॥ मगदारही चेपूनये तियेचें ॥ तैसे लाजिरवाणे दिक्षिताचे ॥ काय सांगो ॥ ३२९ ॥असो, म्हणून कर्माच्या कर्तेपणाचा अभिमान न धरितां फलाशा विवर्जित होत्साता सर्व कर्मे ईश्वर प्रीत्यर्थच केलें पाहिजे. आणि हेंच कर्म श्रेष्ठ होय. ज्ञानेश्वरी अ० १८ वा, ओ०

तरीफळोद्देशेसांडिलिया ॥वाढती जेंवी सरळीया ॥ शाखा कां चंदनाचिया ॥ बावनया ॥ ६३१ ॥ कानफळताही सार्थका ॥ जैसिया नाग लतिका ॥ तैसिया करी नित्यादिका क्रिया जोगा ॥ ३३२ ॥ परीफळशून्यता ॥ नाहीं तया विफळता ॥ पै फळासीची पंडुसूता ॥ फळे काइसी ॥६३३॥ आणि आदरें करी बहुवसे ॥ परीमी कर्ता हे नुमसे॥वर्षाकाळीचे जैसे ॥ मेघवृंद ॥ ६३४ ॥ तेवींचिपरमात्मलिंगा ॥ समर्पावया जोगा ॥ कर्मकळापपैंगा ॥ निपजवितो ॥ ६३५ ॥ तया काळाते नुलंघने ॥ देशशुद्धिही साधणें ॥ कां शास्त्राच्या वाती पाहणें ॥ क्रियानिर्णय ॥ ६३६ ॥ वृत्तीकरणाएकवळा ॥ चित्तजावो न देणें फळा ॥ नियमाचिया साखळा ॥ वाहेसदा ॥ ६३७ ॥ म्हणोनि विषय सुरवाड तुटे ॥ जवदेह

बुद्धीआटे ॥तव आनंदु दुनवटे ॥ कर्मी जया ॥ ६४१ ॥ ऐसे नीं जो कर्म करी ॥ आणि कोणी एकया अवसरी ते टाके ऐसे पटी ॥ वाहे जरी ॥६४२॥ तरी कडाडी लोटे गांडा ॥ तो आपण या नमनी अवघडा ॥ तैसा ठाकलेनी ही थोडा मोहे जोका ॥ ६४३ ॥ नातरी आदरिले ॥ आव्यंग सिद्धी गेले ॥ तरी तेंही जितके मिरऊ नेणें ॥ ६४४ ॥ या खुणा कर्म करिता ॥ देखिजे जो पांडुसुता ॥ तयाते म्हणिपे तत्वता ॥ सात्विकू गा ॥ ६४५ ॥ असें कर्म केलें असतां तें कर्म ब्रह्मरूप होऊन जीवन्मुक्त दशा देईल. आतां उपासना मार्ग कथन करितों—उपासना ह्मणजे सर्वकाल कायीक, वाचीक आणि मानसीक व्यापारानीं निराकार, निरूपाधिक जगदीश्वराच्या संन्निध वास करणें ह्मणजे ज्याचें स्थूल सूक्ष्मादि शरीर जनित सर्व व्यापार ईश्वरोद्देशानेंच होत असणें. जगदीश्वरावांचून ज्याच्या व्यवहाराला दुसरा कोणचाच उद्देश नाहीं. ज्यानें सर्व भावानें आपल्या इंद्रियाचे व मनाचे सर्व व्यापार नारायणार्पणच केलें आहेत, ज्याला ईश्वरावांचून कांहींच प्रपंचादिक गोड लागत नाहींत, अशा पुरुषाचा प्रपंच तरी कसा चालेल? असें ह्मणशील तर जो अनन्य भावानें जगदीश्वराची उपासना करितो, त्याचा प्रपंच ईश्वरास चालविणें भाग पडते—ज्ञानेश्वरी, अ० ९ वा, ओ० ॥

पै सर्व भावेसी उखिते ॥ जें वोपिले मजचिते जैसा गर्भगोळ उद्यमातें ॥ कोण्याही नेणे ॥ ३३५ ॥ तैसा मी वाचूनि कांहीं ॥ आणिक गोमटेंचि नाहीं ॥ मजचिनाम पाही ॥ जिणया ठेविले ॥ ३३६ ॥ ऐसें अन्यय गतिके चित्त ॥ चिंति तसा ते माते ॥ जे उपासिती तयाते ॥ मी चिसेवी ॥३३७॥ते एकवटूनि जियेक्षणी ॥ अनुसरलेगा माझिये वाहणी॥तेव्हांचितयाची चिंतवणी॥मजची पडली॥३३८ मग तिहीं जें जें करावे ॥ ते मजचि पडले आघवे ॥ जैसी अजात पक्षाचेनिजिवे ॥ पाक्षिणी जिवे ॥ ३३९ ॥ आपुली ताहन भूक नेणे ॥ तान्हयानिके ते माउलीसीच करणें ॥ तैसे अनुसरले मज प्राणे ॥ तयाचे सर्व मी करी ॥ ३४० ॥

तया माझिया सायुज्याची चाड ॥ तरी तेचि पुरवी कोड ॥ कां सेवा म्हणती तरी आड ॥ प्रेमसुखे ॥ ३४१ ॥ ऐसा मनी जो जो धरिती भावो ॥ तो तो पुढापुढा लागे तया देवो ॥ आणि दिधलीयाचा निर्वाहो ॥ तोही मीचि करी ॥ ३४२ ॥ हा योगक्षेम अवघा ॥ तयाचा मजचि पडेगा पांडवा ॥ जयांचिया सर्व भावा ॥ अश्रयो मी ॥ ३४३ ॥

अशा उपासना करणाऱ्यास ब्रह्म प्राप्ती होते. किंबहुना तो ब्रह्मस्वरूपच होतो. कारण, कर्ममध्यें मी कर्ता, हें कर्म, आणि तो ईश्वर याप्रमाणें त्रिपुटी असते. ती त्रिपुटी उपासनेमध्यें मावळते. ती कशी? असें ह्मणशील तर जगदीश्वर सेव्य आणि मी सेवक असें उपासनेमध्यें द्वैतच राहतें. आतां अवशिष्ट राहिलेलें जें जगत् तें परमेश्वर सेव्यरूपच होतें. अशा उपासनेचा परिपाक झाला ह्मणजे सेव्य सेवकाचेही द्वैत मावळतें; आणि उपासक जगदीश्वराच्या तादात्म्यानें ब्रम्हरूपच होतो; जसें लोखंड अग्नीच्या तादात्म्यानें अग्निरूप होतें तद्वत् याविषयीं ज्ञानेश्वरी, अध्याय १८ वा, ओ० ॥

तरी बाह्य आणि अंतरा ॥ आपुलिया सर्व व्यापारा ॥ मज व्यापकाते वीरा ॥ विषय करी ॥ ५५ ॥ अथवा अंगी जैसा वायू मिळूनि आहे आकाशा ॥ तूं सर्व कर्मी तैसा ॥ मज सीच असे ॥ ५६ ॥ किंबहुना आपुलें मन ॥ करी माझे एकायतन ॥ माझेनिश्रवणें कान ॥ भरूनि घाली ॥ ५७ ॥ आत्मज्ञाने चोखडी ॥ संत जे माझी रूपडी ॥ तेथें दृष्टी पडो आवडी ॥ कामिनी जैसी ॥ ५८ ॥ मी सर्व वस्तांचे व सोटे ॥ माझी नामें जिये चोखटे ॥ तिये जियावया वाटे ॥ वाचेचिये लावी ॥ ५९ ॥ हाताचें करणें ॥ कां पायाचें चालणें ॥ तें होय मज कारणें ॥ तैसें करी ॥ ६० ॥ आपुला अथवा परावा ॥ ठायीं उपकार करसी पांडवा ॥ तेणें यज्ञें होई बरवा ॥ याज्ञिकू माझा ॥ ६१ ॥ हें एकैक शिकवूं काई ॥ पै सेवकै आपुलाठायीं ॥ उरऊनियेर सर्वही ॥ मी सेव्यच करी ॥ ६२ ॥ तेथें जाऊन भूतद्वेष ॥ सर्वत्रनमवै मीच एक ॥ ऐसेनि आश्रय अत्यंतिक ॥ लाहासी तूं मा-

झा ॥ ६३ ॥ मग भरलेया जगा आंत ॥ जाऊनि निजपाची मात ॥ होऊनी ठायील एकांत ॥ अम्हातुम्हा ॥ ६४ ॥ तेव्हां भलतिया अवस्थे ॥ मी तूंतें तूं मातें ॥ भोगिसी ऐसें आहे ते ॥ वाढेल सुख ॥ ६५ ॥ आणि तिजें अढळ कांतें निमालें अर्जुना जेथें ॥ ते मीचि म्हणौनी तूं मातें ॥ पावसी शेवटीं ॥ ६६ ॥ जैसी जळाची प्रांतता ॥ जळ नाशा विना ॥ येता गामागोमा ॥ कांहीं आहे ॥ ६७ ॥ पैपवन अंबरा ॥ कां कल्लोळ सागरा ॥ मिळता आडवारा ॥ कोणाचागा॥६८॥ म्हणोनी तूं आणि आम्ही ॥ हें दिसताहे देहधर्मीं ॥ मग ययाच्या विरामीं ॥ मीचि होसी॥६९॥यया बोला माझारी ॥ होय नव्हे झणी करी॥येथें आन आथी तरी॥तुझीच आण७०

असा उपासनेचा अधिकार आहे म्हणून कर्मी योगी, तपस्वी, व परोक्ष ज्ञानी इत्यादिकांहून उपासना श्रेष्ठ होय. प्रस्तूत ज्ञानमार्ग वर्णन करितों—ज्ञानाचे प्रकार तीन आहेत एक अधिष्ठान ब्रह्मज्ञानस्वरूपच आहे. दुसरा, ज्यावृत्तीनें परोक्ष किंवा अपरोक्षत्वाच्यायोगानें स्वरूप ओळखलें जातें त्यासही ज्ञान असें म्हणतात. तिसरा-घटपटादि विषय ज्यायोगानें जाणले जातात तें सामान्य व्यवहारिक ज्ञान असें म्हणतात. जसें तमाचें नाशन करणें प्रकाशाचें कार्य तसें स्वरूपाज्ञान नाशन करणें, ज्ञानाचें कारण होय. घटपटादि विषयक जें ज्ञान तें केवल व्यवहारांतच उपयुक्त असतें; त्याचा पारमार्थिक उपयोग होत नाहीं. किंबहुना त्याला ज्ञान ह्मणणें हेंही अज्ञान्यानीं ठेवलेलें नांव होय. असो पारमार्थिक ज्ञानाचा उपयोग स्वरूपप्राप्ती. पर्यंतच असतो. ज्या वेळेस याला स्वरूप अनुभव होतो त्यावेळेस जसा अग्नि तृणाला जाळून आपण आपल्या अधिष्ठानीं नाहींसा होतो तद्वत् वेदशास्त्रापासून व श्रीगुरूपासून संपादन केलेलें जें ज्ञान तें अज्ञानाचा नाश करून स्वरूपानुभव करवितें; आणि आपण अधिष्ठान ब्रह्माचे ठिकाणीं लयास पावतें. ज्ञानेश्वरी, अ० ७ ओ०

**मग ज्ञानाचेनिवेळे ॥ झांकती जाणिवेचे डोळे । जैसी तिरी नाव नढळे ॥ टेकली सांती ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथें नरिगे ॥ विचार मागुतापाउलीं निघे ॥तर्क आयणी नेघे ॥ अंगी जयाचा॥५॥**

अर्जुना तया नाव ज्ञान ॥ येर प्रपंच हें विज्ञान ॥ तेथ सत्यबुद्धी तें अज्ञान ॥ हेंही जाण ॥ ६ ॥ अ० ॥ १४ ॥ नातरी जाळूनी तृण ॥ वन्ही हो विझे आपण ॥ तैसे भेद नासुनी जाण ॥ ज्ञानमुर ॥ ३९५ ॥ तें ज्ञान कोणचें याविषयीं ज्ञा० अ० १८ ॥ तरी अर्जुना गा तें पुढें ॥ सात्विक ज्ञान चोखडें ॥ जयाचा उदयो ज्ञेय बुडे ॥ ज्ञातेनिसी ॥ ५२९॥ जैसा सूर्य न देखे आंधारें ॥ सरिता नेणजती सागरें ॥ कां कवाळलाया न धरे ॥ आत्म छाया ५३० तयापरी जया ज्ञाना ॥ शिवादि तृणावसाना ॥ इत्या भूतव्यक्ति भिन्ना ॥ नाकळती ॥ ५३१ ॥ जैसा हात चित्र पाहातां ॥ होय पाणिये मोठ धूता ॥ कां चेवोनि स्वप्ना यतां ॥ जैसें होये ॥५३२॥ तैसे ज्ञानें जेणें ॥ करितां ज्ञातव्यातें पाहाणें ॥ जाणतेनि जाणणें जाणावें हरे ॥ ५३३ ॥ पैं सोनें आटूनि लेणीं ॥ न काढिती आपुलिया आयणी ॥ कां तरंग न घेती पाणी ॥ गाळूनि जैसे ५३४ तैसी जया ज्ञानाचियाहाता ॥ न लगेचि दृश्यपथा ॥ तें ज्ञान जाण सर्वथा ॥ सात्विकगा ॥ ५३५ ॥ आरिसा पाहो जातां कोडें ॥ जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें ॥ तैसें ज्ञेय लोटोनि पडे ॥ ज्ञाताचि जें ॥ ५३६ ॥ पुढती तेंचि सात्विक ज्ञान जें मोक्ष लक्ष्मीचें भुवन ॥ हें असो एक चिन्ह राजसाचें ॥ ५३७ ॥ असें ज्ञान ज्यास झालें असेल त्यास अज्ञान मुळींच राहत नाहीं. ज्ञा० आ० १४ ॥ आपला आपण पया ॥ विसर जो धनंजया ॥ तेंचि रूपइया ॥ अज्ञानासी ॥ ७२ ॥ आणीकही एक असें ॥ जें विचारा वेगळे न दिसे ॥ वाती पाहातां जैसें ॥ आंधारे कां॥७३॥ हालविल्या जाय ॥ निश्चळी तरी होय ॥ दुधीं जैसी साय ॥ दुधाचि तें ॥ ७४ ॥ हा एक ज्ञानरूपी यज्ञच होय. अहो ! पण यज्ञामध्य मंडप—अग्नि, कुंड, यज्वा, घृत इत्यादिक पदार्थ असतात तें तुमच्या ज्ञान यज्ञांत आहेत ? असें ह्मणशील तर यज्ञांतील सर्व पदार्थ या ज्ञान यज्ञांत आहेत. ते कोणचे ? याविषयीं ज्ञा० अ० ९ ॥ तरि ज्ञानयज्ञ तो एवंरूप ॥ जेथ आदि संकल्प हा यूप ॥ महाभूतें मंडप ॥ भेद्रतो पशु ॥ २३९ ॥ मग पांचांचे जे विशेष गुण॥ अथवा इंद्रियें आणि प्राण ॥ हेचि यज्ञोपचार भरण ॥ अज्ञान

घृत ॥ २४० ॥ तेथमन बुद्धीचिया कुंडा ॥ आंत ज्ञानाग्नि धडफुडा ॥ साम्यतेचि सुहाडा ॥ वेदिका जाणें ॥ २४१ ॥ साविवेक मती पाटव ॥ तेंचि मंत्रविद्या गौरव ॥ शांति संपत्ति सुक्स्रव॥जोत्र यज्वा॥२४२॥तो प्रतीतीचेनिपात्रें॥विवेकमहामंत्रे॥ ज्ञानाग्निहोत्रें ॥ भेद नाशी ॥ २४३ ॥ तेथ अज्ञान सरोनि जाय ॥ आणि याजितां यजन हें ठाये ॥ आत्मसमरसीं न्हाये ॥ अवभृतां जेव्हां ॥२४४॥ तेव्हां भूतें विषय करणें ॥ हे वेगळालें कांहीं न म्हण ॥ आघवें एकाचि ऐसें जाणें ॥ आत्म बुद्धी ॥ २४५ ॥ जैसा चेइला तो अर्जुन ॥ म्हणे स्वप्नींचि हे विचित्र सेना ॥ मीचि जाहलों होतों ना ॥ निरावशें ॥ २४६ ॥ आतां सेना ते सेना नव्हे ॥ हें मीच एक आघवें॥ ऐसें एकत्वें मानावें ॥ विश्वतया ॥ २४७ ॥ मग तो जीव हे भाष सरे ॥ आब्रह्म परमात्म बोधें भरे ॥ ऐसे भजती ज्ञानाध्वरें एकत्वें येणें ॥ २४८॥ असें जें अज्ञान नाशक व सर्वाधिष्ठान स्वरूपदर्शक ज्ञान होण्याविषयीं बहुत लोक उपाय करतात; परंतु हें ज्ञान साध्य होणें फार कठीण आहे. कारण या ज्ञानाच्या अंगीं अज्ञानजन्य विकाराचें नाशन करण्याचें सामर्थ्य आहे. ह्मणून ज्ञानप्राप्तीस फार प्रयास लागतात. याविषयीं ज्ञा०अ०१३॥जया ज्ञानालागीं ॥ गगनगिळितातियोगी ॥ स्वर्गाची आडवंगी उमरडोनी ॥१६२॥ नधरितीरिद्धीची भीड ॥ नकरिती सिद्धीचीचाड ॥ योगाऐसे दुवाड ॥ हेळसिती ॥ १६३ ॥ तपोदुर्गेवोलांडीत ॥ क्रतुकोढिवोवांडित ॥ उलथूनि सांडित ॥ कर्मवल्ली ॥ १६४ ॥ नानाभजन मार्गीं ॥ धांवत उघडिया आंगीं ॥ एक रिघतांति सुरंगी ॥ सुषुम्नेचिये ॥ १६५ ॥ ऐसी जिये ज्ञानीं ॥ मुनीश्वरांची उतान्हो ॥ वेदतरूच्या पानोवानीं ॥ हिंडताती॥१६६॥ देईल गुरुसेवा ॥ इयाबुद्धी पांडवा ॥ जन्मशतांचा सांडोवा ॥ टाकीत जे ॥ १६७ ॥ जया ज्ञानाचीरिगवणी ॥ अविद्ये उणें आणी ॥ जीवात्मया बुझावणी ॥ मांडूनिदे ॥ १६८ ॥ जें इंद्रियांचीं द्वारें आडी ॥ प्रकृतीचे पायमोडी ॥ जे दैन्यचिफेडी ॥ मानसाच ॥ १६९ ॥ द्वैताचा दुकाळपाहे ॥ साम्याचे सुयाणें होये ॥ जया ज्ञानाची सोये ॥ ऐसें करी ॥ १७० ॥ मदाच

**ठावो चिपसी ॥ जें महामोहातें ग्रासी ॥ नेदी आपपर ऐसी ॥ भाष उरों ॥ १७१ ॥ जें संसारातें उन्मूळा ॥ संकल्प पंक प्रक्षाळी ॥ अनावरातें वेटाळी ॥ ज्ञेयातें जें ॥ १७२ ॥ जयाचे निव्यालेपणें ॥ पांगूळ होइजे प्राणें ॥ जयाचे नि बिदाणें ॥ जग हें चेष्टे ॥ १७३ ॥ जयाचे नि उजीळ ॥ उघडती बुद्धीचे डोळे ॥ जीव दोंदावरी लोळे ॥ आनंदाचिये ॥ १७४ ॥ ऐसें जें ज्ञान ॥ पवित्रैक निधान ॥ जेथ विटाळलेंमन ॥ चोखकीजे ॥ १७५ ॥ आत्मया जीवबुद्धी ॥ जे लागली होती क्षयव्याधी ॥ ते जयाचिया सन्निधी ॥ निरुजा कीजे ॥ १७६ ॥ ते अनिरूप्य कां निरूपिजे ॥ ऐकतां बुद्धी आणिजे ॥ वांचूनि डोळा दाखिजे ॥ ऐसें नाहीं ॥ १७७ ॥** याप्रमाणें कर्म, ज्ञान आणि उपासना व यांचे प्रतियोगी अकर्म, निरुपासना आणि अज्ञान इत्यादिकांचें ज्ञानेश्वरी ग्रंथांत बहुत वर्णन केलें आहे. त्यापैकीं कांहीं वेंचे संक्षेपानें घेऊन कांडत्रयाचें वर्णन केलें. आतां प्रत्येक अध्यायांतील प्रमेय काढिलें असतें परंतु ग्रंथ विस्ताराच्या भीतीनें किंवा भगवद्गीतेचे जे प्रमेय तेच ज्ञानेश्वरींतील होय, ते गीता वाचकाच्या लक्षांत सहजच असतात, ह्मणून प्रत्येक अध्यायांतील प्रमेय काढिलें नाहींत. तर सर्व ज्ञानेश्वरींतील कर्म, उपासना आणि ज्ञान या कांडत्रयांचाच सारांश काढिला आहे. असो, ज्ञानेश्वरी हा ग्रंथ व इतर अमृतानुभव, अभंग वगैरे श्रीक्षेत्र **पैठणां**तील **एकनाथ** या नांवाच्या सत्पुषानें विशेष प्रसिद्धीस आणिलें आहेत. याचें कारण असें आहे कीं **श्रीज्ञानेश्वर** समाधिस्थ झाल्या नंतर दोनशें अठ्यायंशी वर्षांनीं एकदा असा चमत्कार झाला कीं समाधीच्या वामभागीं एक अजान वृक्ष आहे. त्या वृक्षाच्या मुळीनें अंतरभागीं समाधीच्या प्रदेशांत प्रवेशकरून श्री ज्ञानेश्वराच्या कंठास फांसा प्रमाणें वेष्टण केलें. त्या योगानें श्री ज्ञानेश्वरास ब्रह्मरंध्रांतून वायु अधोभागीं आणण्याविषयीं आडचण पडूं लागली. इकडे एके दिवशीं एकनाथ निद्रिस्थ असतांना त्यास असें स्वप्न पडलें कीं, एक बावीस वर्षांचा सूर्यासारखा तेजस्वी मदनमूर्ती पुरुष कंठामध्यें तुलसी काष्टमाला व कपाळीं मुद्रांकित गोपीचंदन लावून मुखानें श्रीगुरूदत्त या नामाचा उच्चार करीत आला. हा कोणी तरी

साधु महासिद्ध आहे असें मनांत आणून एकनाथानें त्यास प्रणिपात केला आणि नम्र वाणीनें विचारिलें कीं, महाराज ! आपण कोण आहांत व आपलें नांव काय? व आपण इकडे कशाकारतां आला ? हें ऐकून स्वप्नांतील पुरुषानें उत्तर दिलें कीं मी यजुर्वेदी ब्राह्मण आहे ह्या देहास ज्ञानेश्वर असें ह्मणतात. मी आळंदीमध्यें समाधिस्थ होऊन बहुत वर्षे झाली प्रस्तुत माझ्या वामभागीं जो अजान वृक्ष आहे त्याच्यामुळीनें माझ्या कंठास फांसाप्रमाणें वेध केला आहे. तेणेंकरून ब्रह्मरंध्रांतून वायु खाली आणण्याविषयीं फार आडचण पडते तर तूं आळंदीमध्यें येऊन श्रीसिद्धेश्वराच्या अग्रभागीं जो नंदी आहे त्या नंदीच्या अधोभागींचा पाषाणाचा चिरा काढून तेथें एक विवर आहे त्यांत प्रवेश करावा आणि तेथूनच माझ्या समाधिकडे यावे. तेथें तूं येऊन माझ्या कंठास लागलेली जी अजान वृक्षाची मुळी ती काढून टाकावी हीं माझी अज्ञा आहे. असें बोलून स्वप्नांतील पुरूष निघन गेला. एकनाथही जागा होऊन विचार करितो कीं, काय हें आश्चर्य ! आज स्वप्नांत मला श्रीगुरू ज्ञानेश्वरांचें दर्शन झालें तर हा एक पूर्ण पुण्याचा उदयच समजला पाहिजे. अहो पण त्यांच्या कंठास मुळी लागली हें कसें ! बरें ती काढण्याकारितां आपणास आळंदीस गेलेच पाहिजे. कारण तें आपल्या श्रीगुरुदत्त संप्रदायानुवर्ती आहेत आणि ज्ञानेश्वर ह्मणजे साक्षात् परब्रम्हच आहेत यांत संशय नाहीं. असो; मी आळंदीस गेल्यावर मला ज्ञानेश्वरांचें दर्शन होईलना ? मग शाबास एकनाथा, तुझ्यासारखा धन्य या त्रैलोक्यांत कोणी नाहीं असें मनांत आणून दुसरे दिवशीं पैठणांतून निघाले ते पांच दिवसांनीं आळंदी येथें येऊन पोहचले. मग एकनाथानें कांहीं मजुरदार लोक बोलाऊन त्यांजकडून पूर्वोक्त नंदीच्या सव्य बाजूच्या पाषाणाचा चिरा काढिला आणि आंत अवलोकन करतात तों एक विवर पाहिले त्या विवरांत अत्यंत अंधःकार असल्यामुळें प्रवेश करण्याविषयीं कोणाचेंही धैर्य होईना. मग एकनाथानेंच मोठ्या धैर्यानें श्रीज्ञानेश्वराच्या नामाचें स्मरण करून विवरांत प्रवेश केला. पंचवीस पाउलें गेल्यानंतर त्यानें एकाएकी सूर्यासारखा प्रकाश अवलोन केला. पुढें येऊन पहातो तों दोन खणाचा एक पोकळीचा प्रदेश आहे, तेथें उत्तम प्रकारें रत्नदीप लाविलें

आहेत. तेणें करून तो प्रदेश प्रकाशित झाला आहे—अशा रमणीय प्रदेशामध्यें महातेजःपुंज सत्पुरूष श्रीज्ञानेश्वर पद्मासन घालून ध्यानस्थ बसले आहेत, त्यांच्या अग्रभागीं ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पासष्टी, हारपाठ, आणि अभंग, इत्यादि ग्रंथ आहेत—त्या योगानें तो प्रदेश इंद्रभुवनास ही तुच्छ करणारा असा दिसला. हें पाहून एकनाथास जो आनंद झाला त्याची तर गणनाच नाहीं. हेच माझे श्रीगुरू ज्ञानेश्वर ध्यानस्थ बसले आहेत असा विचार करून त्यानें श्रीज्ञानेश्वराच्या चरणावर मस्तक ठेविलें; आणि मुखाकडे अवलोकन करितो तों खरोखरीच महागजाच्या कंठास अजान वृक्षाच्या मुळानें वेध केला आहे. मग एकनाथानें हळूच हातानें कंठास, लागलेली मुळी काढली. त्या योगानें श्रीज्ञानेश्वराचा कंठ मोकळा झाला. इतक्यांत श्रीज्ञानेश्वरानीं ब्रह्मरध्रांतून वायूस अधोभागीं आणून नेत्र उघडिले. श्री ज्ञानेश्वर देहस्थितीला आलेले पाहून एकनाथानें पुनरपि त्यांस साष्टांग प्रणिपात केला. श्री ज्ञानेश्वर ह्मणाले कीं कोण एकनाथ? शाबास तूं धन्य आहेस. माझ्या कंटस्थ मुळीस काढिलेस हें फार बरें केलें, कारण त्यापासून मला फार त्रास होत असे. बरें, तुझें कुशल आहेना? एकनाथानें उत्तर दिलें कीं महाराज! आपले आशीर्वादेकरून कुशल आहे. माझ्या महत्भाग्योदयाच्या योगानें आज स्वामींचें दर्शन झालें. तेणेंकरून मी कृतार्थ झालों. मला श्रीगुरूच्या उपदेशाचें फळ आज मिळालें. मागें अनंतजन्मीं कर्म उपासना तप, योग, जप, अनुष्ठान आणि सत्सेवा इत्यादिकांचें पुण्य मला आज मूर्तिमंत दृष्टीस पडलें, यांत संशय नाहीं. ओं नमोश्रीज्ञानेश्वरा ॥ आदिनाथानिराकारा ॥ तुझियाकृपे संसारा ॥ तरलो यया ॥ १ ॥ तूं तत्वज्ञानवेत्ता ॥ तूं सकळयोगियासिद्धिदाता ॥ तूं मूर्तिमंतज्ञानतत्वता ॥ भूतहृदयीं ॥ २ ॥ अविद्येचे अविद्यापण गेलें ॥ आणि मायेचें मायिकत्व मावळलें ॥ दोन्ही विरोनिजेंठेलें ॥ तें तुंचि होसी ॥ ३ ॥ तूंचि भवसिंधूचें तारू ॥ तुझेनि नामस्मरणें साचारू ॥ देखती पैलपारू अज्ञानजीव ॥ ४ ॥ ज्ञानेश्वर ही चार अक्षरें । जो जपकरीनिर्धारें ॥ त्यासी ज्ञान होयसत्वरें ॥ सत्य सत्यात्रि-

वाचा ॥ ९ ॥ याप्रमाणें एकनाथानें १०८ ओंव्यांनीं श्रीज्ञानेश्वरांचें स्तवन केलें. तें ऐकून ज्ञानेश्वरानीं संतुष्ट होऊन त्यास शंकरोपादिष्ठ तत्वज्ञानाचा उपदेश केला. असें उभयतांचें मोठें प्रेमभरित भाषण होऊन शेवटीं ज्ञानेश्वरानीं इतकें सांगितलें कीं, एकनाथा। ज्ञानेश्वरी अमृतानुभव, पासष्टी, आणि कांहीं अंभग इत्यादिक ग्रंथ मी तुझ्या स्वाधीन करितों, तूं हे ग्रंथ जगांत प्रसिद्ध करून यायोगानें अज्ञान जीवांचा उद्धार करावा. माझ्या आशिर्वादें करून तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. एकनाथानें तथास्तु ह्मणून भाषण केलें कीं, महाराज! माझी एक विनंति आहे ती अशी कीं, या विवरांत पुनरपि कोणच्या वृक्षाच्या मुळीचा अपणास उपद्रव न व्हावा ह्मणून हें विवर पाषाणमय बांधिलें पाहिजे. हें ऐकून श्रीज्ञानेश्वरानीं सांगितलें कीं, तुझा मनोरथ जसा असेल त्याप्रमाणें कर. परंतु या विवरांत कोणासही येऊं देऊं नकोस, कारण त्यायोगानें अनवस्था होईल. तें वचन एकनाथानें मान्य करून तीं पुस्तकें बरोबर घेऊन विवराच्या बाहेर आले. स्वकष्टानें एक महिनापर्यंत तेथें वास्तव्य करून तें विवर पाषाणमय बांधिलें आणि पूर्ववत् नंदीच्या सव्यबाजूस पाषाणाचा चिरा बसऊन विवराचें द्वार बंद केले. पुढें पैठणांत आल्यानंतर ते ग्रंथ त्यानें सार्थ अवलोकन केलें. ज्ञानेश्वरीमध्यें कांहीं किमया वनस्पतीचे शोध, व मंत्रशास्त्र या विषयांवर जितक्या ओंव्या होत्या तितक्या काढून त्यां ऐवजी स्वकपोल कल्पित ओंव्या घातल्या. त्याची इतकीच खूण आहे कीं, जितक्या एकनाथाच्या ओंव्या तितक्या चार चरणाच्या आहेत आणि जितक्या श्रीज्ञानेश्वरांच्या ओंव्या तितक्या साडेतीन चरणी आहेत. त्या दिवसापासून एकनाथानें कीर्तनामध्यें व पुराणामध्यें श्रीज्ञानदेवांच्या ओंव्या ह्मणून जनास बोध करावा. शके १५०६ त एकनाथानें ज्ञानदेवांचें, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव वगैरे ग्रंथ गुप्त होते ते शोधून लोकांमध्यें प्रसिद्ध केले. या सांगितलेल्या गोष्टीविषयीं एकनाथानें १९ अभंग केलें आहेत त्यापैकीं एक्या अभंगाचा उल्लेख करितों—अभंग० **श्रीज्ञानदेवेंयेउनी स्वप्नांतः। सांगीतलीमात मजलागीं ॥ १ ॥ दिव्यतेजः पुंजमदनाचापुतळा। परब्रह्मकेवळ बोलतसे ॥ २ अजानवृक्षाचीमुळीकंठी लागली। येऊन आळंदी-**

**स्थळीं काढवेगी ॥ ३ ॥ ऐसें स्वप्नहोता आलो अलंकापुरीं । तव-नंदीमाझारा ॥ देखिलेंद्वार ॥ ४ ॥ एकाजनार्दनीपूर्वपुण्यफळलें ॥ श्रीगुरुभेटलेज्ञानेश्वर ॥ ५ ॥** असो अद्यापि तें विवराचें द्वार श्रीसिद्धेश्वराच्या नंदीच्या दाक्षिण बाजूस आहे. ग्रामस्थ लोकांस कांहीं उपद्रव झाला ह्मणजे ते विवरमुखीं बसविलेल्या पाषाणावरच अभिषेका-पूजन करितात. या एकनाथाच्या गोष्टीवरून असें स्पष्ट होतें कीं, श्रीज्ञानेश्वर समाधिस्थ झाल्यावर जेव्हां जेव्हां ब्रह्मरंध्रांतून वायू खालीं आणून देह स्थितीवर येत होते त्या त्या वेळेस त्यांनीं कांहीं अभंग केलें आहेत. त्याची इतकीच खूण आहे कीं, ज्या वेळेस ते जगांत असून उपदेश करीत असत, त्या वेळेस त्यांनीं जे अभंग केलें, त्या अभंगाच्या शेवटीं "ज्ञानदेव ह्मणे" अशी अक्षरें येतात; आणि समाधिस्थ झाल्यावर जें अभंग केले त्या अभंगाच्या शेवटीं बाप *रखुमादेवीवरू अशीं अक्षरें येतात. श्रीज्ञानेश्वरांचें श्रीमच्छंकराचार्याप्रमाणेंच सिधांतीं अद्वैत मत आहे, असें त्यांच्या अमृतानुभवादि ग्रंथावरून कळतें. श्रीज्ञानेश्वर लोकांस वैराग्य संपन्न होण्याविषयीं फार कथन करीत, कारण वैराग्यसंपन्न पुरुषासच कर्म उपासनादी करण्याचा अधिकार असतो. बहुधा ज्ञानीलोकांस वैराग्य असेल तरच त्याचें ज्ञान बहुत दिवस टिकेल नाहीं तर विषयांच्या प्रीतीनें तो त्या ज्ञानापासून भ्रष्ट होईल. असो तें वैराग्य सत्यत्वे करून पाहिजे. ढोंगी वैराग्य उपयोगी नाहीं. श्रीज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीमध्यें व कांहीं अभंगामध्यें खऱ्या वैराग्याचें बहुत प्रकारें वर्णन केलें आहे. ते असें कीं, वैराग्य ह्मणजे विरागता, दृश्य विषयाचेठायीं अंतःकरणांनीं ( मन, बुद्धि, चि-

---

* कित्येकांचें मत या मताचे उलट आहे. ज्ञानदेवाचें आईचें नांव रखुमाबाई व पित्याचें नांव विठल होतें हें वाचकांस विदितच आहे. ज्ञानदेव जगतावर असतांना आईबापांचे नांवांचा उल्लेख बापरखुमादेवीवरू असें करीत असे परंतु निवृत्तीनें ज्ञानदेवस असें सांगितलें कीं, ज्ञानदेवा, अभंगाचे शेवटीं स्वनामाचा निर्देशकेल्याशिवाय हे अभंग आमच्याचेच असे ओळखता येणार नाहींत कारण आपण चवघे भांवडे आहोंत व आपणा चवघांचेही अभंग आहेत याकरितां अभंगाचे शेवटीं आपल्या नांवाचा उल्लेख करावा यावरून ज्ञानेश्वर स्वनाम घालूं लागले.

त्तादिकांनीं ) अप्रीति ठेवणें याचें नांव वैराग्य. अहो, विषयाचेंठायीं अप्रीति कशास पाहिजे? अशी जर शंका घेशील तर विषयांच्या सेवनानें जगदीश्वराचें विस्मरण होऊन मनुष्यें पापकर्में करण्यास प्रवृत्त होतात आणि ज्याचे त्यास मी कोण आहें व माझें कर्तव्य काय आहें व कोणचें कर्म केलें असतां माझें कल्याण होइल, याचें स्मरणच राहत नाहीं. कारण स्वरूपाच्छादन करणें हीं विषयांची शक्ति होय. श्रीज्ञानेश्वरानीं यांचा इतका निषेध केला आहे कीं मनुष्य मनानें विषयांचें केवल ध्यान जर करील तर त्याचें हातून परमार्थ न होता त्यापासून कामक्रोधादिकांची वृद्धी होऊन परिणामीं नाश मात्र होईल. याविषयीं ज्ञानेश्वरी अ० २ रा, ओ० येऱ्हवी बाह्य विषय तरी नाहीं ॥ परी मानसीं होईल जरी कांहीं ॥ तरी साद्यंतचि पाही ॥ संसार असे ॥ ३१९ ॥ जैसा कां विषाचा लेश ॥ घेतलीया होय बहुवस ॥ मग निभ्रांत करी नाश ॥ जीवितासी ॥ ३२० ॥ तैसी विषयाची शंका ॥ मनीं वसती देखा ॥ घात करी अशेखा॥विवेकजाता॥३२१॥ जरी हृदयीं विषय स्मृती ॥ तरी निसंगाही आपजे संगती ॥ संगे प्रगटे मूर्ती ॥ अभिलाषाची ॥ ३२२ ॥ जेथ काम उपजला ॥ तेथ क्रोध अधीच आला ॥ क्रोधीं असें ठेविला ॥ संमोह जाणें ॥ ३२३ ॥ संमोहा झालिया व्यक्ती ॥ तरी नाश पावे स्मृती ॥चंडवाते ज्योती॥ हत जैसी॥३२४॥ कां अस्तमानी निशी ॥ जैसी सूर्य तेजातें ग्रासी ॥ तैसी ही दशा स्मृति भ्रंशी ॥ प्राणियासी ॥ ३२५ ॥ मग अज्ञानांध केवळ ॥ तेणें आछविजे सकळ ॥ तेथें बुद्धी होय व्याकूळ ॥ हृदया माजी ॥ ३२६ ॥ जैसे जात्यंधा पळणी पावे ॥ मग तं काकुलती सैरा धावे ॥ तैसे बुद्धीसी होती भवे ॥ धनुर्धरा ॥ ३२७ ॥ ऐसा स्मृति भ्रंश घडे ॥ मग सर्वथा बुद्धी अवघडे ॥ तेथ संमूळ हें उपडे ॥ ज्ञान जात ॥ ३२८ ॥ चैतन्याच्या भ्रंशी ॥ शरीरा दशा जैसी ॥ तैसे पुरुषा बुद्धिनाशीं ॥ होय देखे ॥ ३२९ ॥ म्हणोनी ऐके अर्जुना ॥ जैसा विस्फुलिंग लागे इंधना ॥ तो प्रौढ जा-

लिया त्रिभुवना ॥ पुरोशके ॥ २३० ॥ तैसे विषयांचें ध्यान ॥ जरी विषायें वाहे मन ॥ तरी येसणें हें पतन ॥ गिवसीत पावे ॥ २३१ ॥ शब्द स्पर्शादि सर्व विषयांमध्यें काम, क्रोध, लोभ, हे विषय फारच दुस्त्यज आहेत. आणि यांनीं तर मोठ्या मोठ्या ज्ञान्यास ही वंचिले आहे. विश्वामित्र, पराशर, नारद, अगस्ती, जैमिनी, प्रमुख ऋषींनें तप यांनींच भ्रष्ट केलें पहा, त्या बिचाऱ्या विश्वामित्रास साठ हजार वर्षांचें तपावर अवळ्या एव्हढें पूज्य ठेऊन शेवटीं मेनके बरोबर कामवशानें स्वर्गामध्यें कुत्रा होऊन जाणें भाग पडलें. किंबहुना ऋषी तर काय, परंतु ब्रह्मा, विष्णु, महेशादिकांस काम क्रोध प्रमुखांनीं फसविलें आहे मग इतर मनुष्यांची कथा काय ! ज्ञानेश्वरी, अ० ३ रा, ओंवी० तरी हे काम क्रोध पाहीं ॥ जयांतें कृपेची साठवण नाहीं ॥ हे कृतांताच्या ठायीं ॥ मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग ॥ विषयदरींचे वाघ ॥ भजनमार्गींचे मांग ॥ मारकने ॥ २४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंड ॥ इंद्रिय ग्रामींचे कोंड ॥ यांचे व्यामोहादिक बंड ॥ जगावरी ॥ २४२ ॥ हे रजोगुणमानसाचे ॥ समूळ असुरियेचे ॥ धायपण ययांचें ॥ अविद्या केलें ॥ २४३ ॥ हे रजाचे कीर जाहाले ॥ परी तमासी पढियंते भले ॥ तेणें निजपद यां दीधलें ॥ प्रमाद मोह ॥ २४४ ॥ हे मृत्युच्या नगरीं ॥ मानिजती निकियापरी ॥ जे जीविताचे वैरी ॥ म्हणऊनिया ॥ २४५ ॥ जयांसि भुकेलिया आमिषा ॥ हें विश्व नपुरेचिघांसा ॥ कुळवाडीयांचिया आशा ॥ चाळीत असे ॥ २४६ ॥ कौतुकें कवळितां मुठी ॥ जियेंचवदा भुवनें थेंकुटीं ॥ तिये भ्रांतिहीं धाकुटी ॥ वाल्ही दुल्ही ॥ २४७ ॥ जें लोक त्रयाचें भातुकें ॥ खेळतांचि खाय कवतिकें ॥ तिच्या दासीपणाचोनिबिकें ॥ तृष्णा जिये ॥ २४८ ॥ हें असो मोहें मानिजे ॥ यातें अहंकारें घेपें दीजे ॥ जेणें जग आपुलिया भोजें ॥ नाचवीत असे ॥ २४९ ॥ तेणें सत्याचा भोकसा काढिला ॥ मग असत्य तृण कुटा भरिला ॥ तो दंभरुढविला ॥ जगीं इहीं ॥ २५० ॥ साध्वी शांती नागविली ॥

मग मायामांगीण शृंगारिली ॥ तिये करवीं विटाळविलीं ॥ साधुवृंदें ॥ २५१ ॥ इहा विवेकाची त्राय फेडिली ॥ वैराग्याची साल काढिली ॥ जितया मान मोडिली ॥ उपशमाची ॥ २५२ ॥ इहीं संतोषवन खांडिलें ॥ धैर्यदुर्ग पाडिलें ॥ आनंदरोप सांडिलें ॥ उपडूनिया ॥ २५३ ॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिली ॥ सुखाची लीप ही पुसिली ॥ जिव्हारीं आंगीं सूदलीं ॥ तापत्रयाची ॥ २५४ ॥ हें अंगांत वघडले ॥ जीवींचि आथि जडलें ॥ परिनातुडती गिंवसिले ॥ ब्रम्हादिकां ॥ २५५ ॥ हे चैतन्याचे शेजारी ॥ वसती ज्ञानाचा एकाहारीं ॥ म्हणोनि प्रवर्तती ॥ महामारी॥ सांवरती ना ॥ २५६ ॥ हे जळेंविण बुडविती ॥ आगीविण जाळिती ॥ न बोलता कवळिती ॥ प्राणियांतें ॥ २५७ ॥ काम क्रोध आणि लोभ हीं तीन नरकाचीं द्वारेंच होत. आणि हें सर्वाधिष्ठान स्वरूप स्थितीचें नाशन करणारें आहेत. ह्मणून हे विषय अंतः करणांत जो कालपर्यंत जागृत आहेत तो कालपर्यंत जीवास ब्रह्म प्राप्ती व्हावयाची नाहीं. आणि जो झाली असें म्हणेल त्याचें वचन सर्वथैव खोटें मानावें. ज्ञानेश्वरी, अ० १६ वा, ओ० ॥ परी काम क्रोध लोभ ॥ या तिहींचेंचि थोंब ॥ थांबे तेथें अशुभ ॥ पिकलें जाण ॥ ४२५ ॥ सर्व दुःखा आपुलीया ॥ दर्शना धनंजया॥पाढाउ हे भलतया॥दधिले आहाती॥४२६ कां पापिया नरक भोगीं ॥ स्रुवावयालागीं जगीं ॥ पातकाची दाटुगी ॥ सभाचिहे ॥४२७॥ ते रौखगा तवंचि वरी॥ आइकीजती आपटांतरी ॥ जंव हे तिन्ही अंतरीं ॥ उठतीना ॥ ४२८ ॥ अपाय तिहीं आशलग ॥ यातना इहीं सवंग ॥ हाणी हाणि नोहे हे निध ॥ हेचि हाणि ॥४२९॥ काय बहु बोलुं सुभटा ॥ सांगितली या निकृष्टा ॥ नरकाचा दारवंटा ॥ त्रिधातुक ॥ ४३० ॥ जीव हा सच्चिदानंद स्वरूप कूटस्थ आत्मा असतांना मी माझे या अभिमानानें व काम क्रोधादि विषय संगतीनें शुकनलिका न्यायवत् संसृति बंधाप्रत पावला; आणि त्या योगानें आपला आपण वैरी होऊन अनेक दुःखें भोगूं लागला.

अभंग ॥ उपजोनि संसारीं आपुला आपण वैरी ॥ मी माझें शरीरीं घेउनि ठेले ॥ या देहातें म्हणे मी पुत्रदाराधन माझें ॥ परिकाळाचें हें खाजें ऐसें नेणतु गेला ॥ १ ॥ काम क्रोध मदमत्सराचे निगुणें ॥ बांधला आपण नेणे भ्रमितु जैसा ॥ मिथ्यामोह फांसा शुकनळिके जैसा ॥ मुक्त पार अपैसा पळों नेणें ॥ धृ० ॥ जळचर अमीषागिळी ॥ जैसा का लागलासें गळीं ॥ आपआपणा पें तळमळी सुटिका नाहीं ॥ तैसें आरंभी विषय सुख गोड वाटे इंद्रियां ॥ फळपाकीं पापिया दुःख भोगी ॥ २ ॥ राखोंडी फुंकितां दीप न लगे जयापरी ॥ तैसा शब्द ब्रम्हकुसरी ज्ञाननपवे ॥ व्रत तप दान वेचिलें पोटादंभाच्या खटपटासिणतु गेला ॥ ३ मृग जळाची नदी दुरुनि देखोनि ॥ धांवे परी गंगोदक नपवे तान्हेला जैसा ॥ तैसें विषयसुख नव्हेचि हित ॥ दुःख भोगितो बहुत ॥ परिसावधान नव्हे ॥ ४ ॥ परतोन न पाहे धांवतो सैरा ॥ करितो येरझारा संसारीच्या ॥ ज्ञानदेव म्हणे वहुतां जन्माचा अभ्यासु ॥ तरीच होय सौरसु परंब्रम्हीं ॥ ५ ॥ ह्मणून काम क्रोधादि विषयांचा मनुष्यांनीं त्याग च करावा ॥ ओ० ज्ञानेश्वरी–अ० १६ वा – म्हणोनि पुढतपुढती किरीटी ॥ हे कामादि दोष त्रिपुटी ॥ त्यजावीचिगा वाखटी ॥ अथवा विषयीं ॥ ४३२ ॥ हे तिन्ही जिवीं जव जागती ॥ तव वरी निकीयाची प्राप्ती ॥ हे माझें कान नायकती ॥ देव म्हणें ॥ ४३४ ॥ पोटी बांधोनि पाषाण ॥ समुद्री बाही अंगवण ॥ कां जियावया जेवण ॥ काळकूटाचे ॥ ४३६ ॥ इहीं काम क्रोधलोभेसी ॥ कार्य सिद्धी जाण तैसी ॥ म्हणोनि ठावोचि पुंसी ॥ यमाचागा ॥ ४३७ ॥ एकंदर सर्व विषयांचे ठायीं मनुष्यांनीं अप्रीति ठेवणें हें त्यांचें कर्तव्यकर्म होय. ती अप्रीति इतकी असावी कीं विषय शरीरास येऊन झगटले असतां जसें वमन केलेल्या अन्नाविषयीं पुनर्भक्षणाची वासनाच होत नाहीं तसे विषयांचे ठायीं ग्रहण करण्याची वासनाच उत्पन्न होऊं नये. अशा वैराग्य संपन्न पुरुषासच कर्म, उपासना, आणि ज्ञान यांची प्राप्ती होते.

ज्ञानेश्वरी, अ० १३ वा—ओ० ॥ आणि विषयां विरवीं ॥ वैराग्याची निकी ॥ पुरवणी मानसीं कीं॥जिती आथी॥° १४॥ वमिलिया अन्ना ॥ लाळन घोंटी जेविरसना ॥ आंगनसूये आलिंगना ॥ प्रेताचिया ॥ ५१५ ॥ विष खाणें नागवे ॥ जळत घरीं न रिघवे॥व्याघ्र विवरा नचवे । वस्ती जेवों॥५१६ धडाडीत लोहरसीं ॥ उडीन घालवे जैसी॥न करवे उशी॥ अजगराची ॥ ५१७ ॥ अर्जुना तेणें पाडें ॥ जयासी विषय वार्ता नावडे । नेदीइंद्रियांचे नि तोंडें। कहींच जावों॥५१८। जयाचें मनीं आलस्य ॥ देहीं अतिकार्श्य ॥ शमदमीं सामरस्य ॥ जयासिगा ॥ ५१९ ॥ तपो व्रतांचा मेळावा जयाचे ठायीं पांडवा ॥ युगांत जयांगांवा ॥ आंत येतां ॥ ५२० ॥ बहु योगाभ्यासीं हांव ॥ विजनाकडे धांव ॥ न साहे जो नांव ॥ संघाताचें ॥ ५२१ ॥ नाराचाचीं आथुरणें ॥ पूय पंकी लोळणें ॥ तैसें लेखी भोगणें ॥ ऐहिकींचें ॥ ५२२ ॥ आणि स्वर्गातें मानसें ॥ ऐकोनि मानी ऐसें ॥ कुहिलें पिशित जैसें ॥ श्वानाचें कां ॥ ५२३ ॥ तें हें विषय वैराग्य ॥ आत्म लाभाचें भाग्य ॥ येणें ब्रम्हानंदा योग्य ॥ होती जीव ॥ ५२४ ॥ ऐसा उभय भोगीं त्रास ॥ देखसी जेथ बहुवस ॥ जाण तेथें रहिवास ॥ ज्ञानाचा तूं ॥ ५२५ ॥ अशी विरागता असणें मनाचें कर्म होय. हें मानसिक कर्म प्रपंचामध्यें राहून ही होते. याला गृह पुत्रादिकांचा त्यागच केला पाहिजे असें नाहीं. आतां आधुनीक लोकांचा अशी समज आहे कीं ज्यांनीं गृहादिकांचा त्याग करून सर्व शरीरास रक्षाच लाविली असेल त्यासच वैराग्य संपन्न म्हणावे मग त्यांचें मन दुसऱ्याचें द्रव्य व स्त्रिया अभिलाषाचें चिंतन कां करीत असेना, परंतु राख लावली ह्मणजे बैरागी झाले. श्री ज्ञानेश्वर असें म्हणतात कीं गृहादिकांचा त्याग करून बैरागी होऊन अरण्यांत जाऊन जरी बसलास तरी ज्यांचा त्याग करावयाचा ते तर तूं आपल्या जवळच ठेविले आहेत. **अभंग** ॥ घरदार वोखटें त्यजूं ह्मणसी तरि शरीरा येवढें जाड । माप बाप वोखटीं त्यजूं म्हणसी तरी अहंकार आवडीचे कोड । बंधू सखे त्यजूं म्हणसी तरि काम क्रोध

मदमत्सर अवघड । बहिणी पाठीच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा माया अवघडरया ॥ १ ॥ त्यजिलें तें काय कासया म्हणिजे सांगपा मजपासीं ऐसें । जया भेणें तूं जासी वनांतरा तें तंव तुजचि सारिसेरया ।धृ०॥ स्त्री वोखटी त्यजूं ह्मणसी तरी इंद्रियासि नाहीं निवृत्ति । सकळ गणगोत त्यजूं म्हणसी तरी हे अष्टधाप्रकृती । अवघेचि त्यजूं पाहे म्हणसी तरी मना नाहीं निजशांतिरया ॥ २॥ अवघीचि तज जवळी दुमदुमेत असतां वरिवर मुंडिसी कां करिसी विटंबना । सहज संतोषें असोनि जैसा तैसा परितो सद्गुरु पाविजे खुणा । आपुले आश्रमीं स्वधर्मी असतां सर्वत्र एकुचि जाणा । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु इतुकियासाठीं नेईल वैकुंठ भुवना॥३॥ जो कालपर्यंत मनुष्य विषयप्राप्तीनें संतोष मानितो आणि अप्राप्तीनें दुःख मानितो तों कालपर्यंत बाहेर किती जरी वैराग्याचें सोंग आणिलें तरी तें उपयुक्त नव्हे. **अभंग** ॥ आलियाचा संतोष गेलियाची हानी ॥ नाहीं त्याचा अतिशो वेचे त्याची काहाणी ॥ ऐसें संकल्पविकल्प देहीं ॥ वरिवरि मुंडलिया होय कांहीं ॥ तरी बहुरूप्याच्याठायीं ॥ काई काई नट्टु नसेरया ॥ १ ॥ आधीं भीतरु दंडावा ॥ पाठी बाहिजुमुंडावा ॥ नाहींतरी योग भांडिवा ॥ कांकरिसी रया ॥ ध्रु० ॥ मागीतलिया भीक ॥ जरी होय निर्दोष ॥ तरि सणिये रजक काय नमगती ॥ देवपणें फुगधरिसील गाढा ॥ तरी वायावीणमूढासी तरलासी ॥ २ ॥ थिगळीघालोनिगळां ॥ ह्मणसी न भिये कळिकाळा ॥ तरि काय कर्मावेगळा ॥ केहो पाहासी ॥ योगिया ह्मणजे कैसा ॥ भीतरी काश्मिरी जैसा ॥ मीनलियापदार्था सरिसा होऊनि मिळे ॥ ३ ॥ हृदयीं नाहीं जाले पण ॥ क्रोधें भवांडिसी लोचन ॥ अंगीं भस्म उधळण ॥ राख राखेल काई ॥ खर लोळे उकरडां ॥ कायपरत्राचियाचाडा ॥ तैसा मठीं बांधोनिमूढा ॥ वर्म चुकलासी ॥ ४ ॥ तीर्थव्रत जपस्नान ॥ वाउगें करिसी ध्यान ॥ ऐसें करिता अनेजनमार्गे चुकलासी ॥ शुद्धकरूनियांमन ॥ सेवीनिवृत्तिचें चरण ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मण नाहींतरी नाडलासी ॥ ५ ॥ अशा केवल बाह्य प्रपंचाचा त्याग करून जरी तूं अरण्यांत गेलास तरी अंतःकरणरूप भूमींत जे कामक्रोधादि अंकूर फुटताहेत ते निर्बीज झाल्यावांचून शुद्ध परमार्थ कधींही व्हावयाचा नाहीं. त्या योगानें प्रपंचास व परमार्थास मुकून देहाची विटंबना मात्र होईल.

ह्मणून प्रपंचांतच वास करून विषयावर वैराग्य धारण केलें पाहिजे. या विषयांवर श्रीज्ञानेश्वरांचे बहुत अभंग आहेत; ते स्थल संकोचामुळें येथें सर्व देता येत नाहींत. आतां त्यापैकींच हा एक अभंग आहे. **अभंग**—प्रपंचाचे जगड्डाळ दुस्तर जरी मानिसी ॥ त्याग करुनि केउता जासी ॥ जें जें त्यागिलें तें तें तुजमाजी त्यागिलें ॥ तें काय सांग आह्मासी ॥ तुझें तुजचि माजि प्रपंचसि तूं सर्वांमाजी वर्तसी ॥ ऐसें जाणूनिया कां विटंबिसी ॥ बापा टाकुनि केउता जासी रया ॥ १ ॥ मनेंसि विचारी॥निर्धारुनि योग करी॥तुझे तुजमाजि अरे आतां विचारी बापा॥ ॥ धृ० ॥ आरि मित्रसम होउन मतें हें शुद्ध होय ॥ तेंचि तूं होउनि राहे बापा बाह्य त्यागिसी तरितो त्यागूचि नव्हे ॥ पालटिसी तरी विटंबना ॥ धरिसितरीचितो बंधू मोक्ष मागताहे जडपणा ॥ तरि गेलिया जडे तो मोक्षचि नव्हे ॥ साचा चुकलासि उगाणा ॥ वृत्तिशून्याकारें अवलोकितां तंव तेणें नव्हे तुजवस्तु ज्ञान ॥ ऐसें जाणोनि कां सिणसीरे बापा ॥ हेंचि धरुनि राहे निज खुण रया ॥ २ ॥ ह्मणोनि आतां इतुकें करी ॥ साचतें हें धरी ॥ तुझें मन होय तुज अधिकारी॥ तैं सर्वहि त्याग तुज फळती बापा ॥ जैं एकचि होउनि निर्धारी ॥ नलगे सिणणें दंडणें ॥ येणेचि आश्रमभावें ऐसेंचि मनें निर्धारी ॥ बाप रखुमादेविवरू विठ्ठलु चिंतितां ॥ सर्व प्रपंचाची जाली बोहरी ॥ निवृत्तिरायें खुणा दाउनि सकळा ॥ निजीं निजाचे निज निर्धारि रया ॥३॥ असो श्रीज्ञानेश्वर आणि नामदेव ज्या वेळेस तीर्थयात्रेस गेले होते, त्यावेळेस मार्गामध्यें उभयतांचीं सुबोध प्रश्नोत्तररूप भाषणें झालीं. श्री ज्ञानेश्वरानीं याची एक निष्ठता श्री विठ्ठलचरणीं किती आहे व यास पारमार्थिक ज्ञान कितपत आहे हें पाहण्याकरितां नामदेवास कांहीं प्रश्न केले आहेत. त्यांचीं उत्तरें हीं नामदेवानें दिलीं आहेत. तीं प्रश्नोत्तररूप भाषणें अभंग ग्रथित आहेत. **अभंग**—ज्ञानदेव ह्मणें परियेसा विष्णुदासा ॥ तूं सु संतोषा पात्र होसी । १ ॥ प्रेमाचा जीव्हाळा तूझ्या हृदयीं आला ॥ तूं कां वेळोवेळा खंती करिसी ॥ २॥ विचारी सावध होऊनी भक्तराजा ॥ सुखानंद्र तुझा तुजची जवळी ॥३॥ मी नेणें ज्ञानगती नेणो योग युक्ती ॥ नदेखे विश्रांती एकेवीण ॥ ४ ॥ सर्वभावें मज तेंचिरूप आवडे ॥ जें पुंडलीका पुढें उभें असे ॥ ५॥

तो माझा विठ्ठलू दावी दृष्टी भरी ॥ आस मी नकरीं आणीकाची ॥६॥ व्यापकु विठ्ठलू आहे सर्व देशीं ॥ जरी सांडोनीया पाहासी भेदु भ्रमू ॥ ७ ॥ तो नाहीं ऐसा ठाव उरला असे कवण ॥ सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ८ ॥ काया वाचा मनें मज तोचि व्हावा ॥ गीतींगात जीवा सुखवाटे ॥ ९ ॥ ऐकावा श्रवणीं पहावा तोची नयनीं ॥ नव-जावा जवळोनी दूर कोठें ॥ १० ॥ जें अक्षर अव्यक्त देश, काळ रहित ॥ ज्ञानी उपासीत सोहंभावें ॥ ११ ॥ सर्व इंद्रियांसहित आव-रुनी चित्त ॥ भोगिती अद्वैत नित्यसुख ॥ १२ ॥ सर्व सुख मज आहे त्याच्यापायीं ॥ आणिकाच्या वाही नपडे कदां ॥ १३ ॥ तेथें माझें मन रंगलेसें भावें ॥ सुख येणें जीवें देखिलें डोळा ॥ १४ ॥ सर्व गत संपूर्ण सर्वकाळ असणें ॥ होणें आणि जाणें नाहीं जया ॥१५॥ ते तुज माझारी तूं तया भीतरी ॥ अनुभवीं निर्धारी ठेउनीमनां ॥१६॥ नमनीं नमनीं लटिकीहे काहाणी ॥ जळधरावांचोनी चातकजैसा॥१७॥ तैसें माझें मन स्मरे रात्रंदिवस ॥ पंढरी निवास जीवन माझें॥१८॥ ऐसें ऐकोनी बोलणें ह्मणे ज्ञानदेवो ॥ धन्य तुझा भावो एकवीध ॥१९॥ नामाह्मणे माझा सुखाचा विसावा ॥ आवडे या जीवा पंढरीरावो॥२०॥

**अभंग**-भक्त भवगंत बहुसाल ऐकिले ॥ बहु होऊनी गेले होती पुढें ॥ १ ॥ परी नामयाचें बोलणें नव्हे हें कवित्व ॥ हा रस अद्भुत नीरोपम ॥ २ ॥ हें सुख विश्रांती नाहीं हो कल्पांती ॥ वि-चारावे संती दूरादृष्टी ॥ ३ ॥ होतु शास्त्रवक्ते वित्पत्तीचे माथे ॥ होतुं बहुश्रुत बुद्धीवंत ॥ ४ ॥ होतु कर्म नीष्ट वीधीचे उद्भट ॥ होतु सर्व श्रेष्ठ पूज्य लोका ॥ ५ ॥ होतु कळावंत ॥ कवित्व कु-शळ ॥ होतुका वाचाळ चतुरतेचे ॥ ६ ॥ होतुका पाठक होतुका साधक ॥ होतुका वाचक ग्रंथाकार ॥ ७ ॥ होतु आत्मज्ञानी होतु निजध्यानी ॥ होतु वज्रासनी बैसकेचे ॥ ८ ॥ होतु योगयुक्त होतु जीवन्मुक्त ॥ होतुका विरक्त सर्व संगी ॥ ९ ॥ ऐसे होतुका सभाग्य संपन्न सर्वज्ञ ॥ परी नमनी तुजवीण विष्णुदासा ॥ १० ॥ हेरकण जाणता एक पंढरिरावो ॥ रुक्मादेवी नाहो श्रीविठ्ठलु ॥ ११ ॥

**अभंग** ॥ १२ ॥ ऐसेनित्यानंदभरीत क्रमीतातीमार्गे हृदयीं तो अनुराग आवडीचा ॥ १ ॥ प्रेमें वोसंडीत करिती स्वहीत गोष्टी ॥ दाविती क-

सोटी अनुभवाची ॥ २ ॥ व्यापतें सुख वृष्टी होतसे अनिवार ॥ ब्रह्म-
रसपूर वोसंडत ॥ ३ ॥ ज्ञानदेव ह्मणे परियेसी नामया ॥ अद्वैत आत्म-
या प्रेममूर्ती ॥ ४ ॥ भक्तीभाव्य तुवां जोडीले अविनाश ॥ सांगपा से-
विलास मार्ग त्याचा ॥ ५ ॥ कैसा तो साधावा सांगे भजन वीधी ॥
कैसा मनबुद्धी सत्वशीळ ॥ ६ ॥ कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार ॥
हा सर्व विचार सांगे मज ॥ ७ ॥ कैसें तें श्रवण कैसें
तें मनन ॥ कैसें तें निजध्यासन दृढ होय ॥ ८ ॥ कवण ते
ते भक्ती कवण ते धृती ॥ कवण ते विश्रांती दावी मज ॥ ९ ॥ बहु
उत्कंठीत या सुखा कारणें ॥ तें मज पारणें करवी आजी ॥ १० ॥
सांगी हा अनुभवो साधनउपायो ॥ विनवि ज्ञानदेवो नामयासी ॥ ११ ॥
अभंग ॥ १३ ॥ परिसोनी ते गोष्टी चरण मीठी ॥ दाटलेंसे कंठीं
सद्गदीत॥१॥कृपेचें पोसणें मी पंढरारायाचें॥येवढे भाग्य कैचें जाणीवेचें मज
॥ २ ॥ नव्हे बहु श्रुत नव्हे ज्ञानशील ॥ दास मी दुर्बल वैष्णवाचा
॥ ३ ॥ नेणें तें नेणें तें कांहींच मी नेणें तें ॥ ह्मणोनी देवें तुमते नीरवी-
ले ॥ ४ ॥ येता जाता हात दिधला तुमच्या करीं ॥ घातले अभारी
मायबापें ॥ ५ ॥ आतां त्याचेनी कृपावसे येईल वाचेसरिसें ॥ केलें
कांहीं तैसे निवेदिन ॥ ६ ॥ मानुस देखणे करीजे अनतेजे ॥ तैसे
ज्ञान माझे स्वामी प्रती॥७॥कल्पतरू याचका कृपणाचे द्वारीं ॥ कां दै-
न्य भाकी थोरी कामधेनू ॥ ८ ॥ तैसी तुमची यांचा मजदीनाप्रती
न कळे काळगती समर्थाची ॥ ९ ॥ मातेचिया स्नेहे बाळक बोबडे ॥
खेळवी लाडे कोडे नेणे लाजो ॥ १० ॥ नामा म्हणे ऐसे तुह्मी माझे
कौतुक ॥ करुनि सुखे सुख वाढवीता ॥ ११ ॥ अभंग ॥ ज्ञानदेव
ह्मणे शका न धरीजे मनीं ॥ दृष्टी दुजेपणीं न ठेवावी ॥ १ ॥
सुखें सुख ध्यावें अनुभवोनी अनुभवावे ॥ आहे ते आधवें ब्रह्मरूप
॥ २ ॥ त्या सुखाचा अनुभवू करी सुखरूपा ॥ सुख वस्तुच्या दीपा ना-
मदेवा ॥ ३ ॥ सुखाचिये ताटीं सुखचि वोगरी ॥ तृप्ती होईल थोरी ॥
क्षुधातुरा ॥ ४ ॥ पंढरीरायाचा तूं प्रेमभांडारीं ॥ आशा पूर्णकरी मज
याचकाची ॥ ५ ॥ विश्रांतिसी पात्र तूंची विष्णुदासा ॥ हा मज भरवसा
आहे तुझा ॥ ६ ॥ म्हणोनी हा संगू धरिली थोर आशा ॥ ह्मणी होसी
उदासा भक्तराया ॥ ७ ॥ सिंधूहोनी खोल सुरस तुझे बोल ॥ आनंदाची

बोलनीत नवी ॥ ८ ॥ तें मज सादर ऐकवीं सत्वर ॥ श्रवण क्षुधांतुर जाले माझे ।। ९ ॥ जाणीव नेणीव तरीच शोभे सर्व ॥ जरी होय आयुर्भाव वैराग्याचा ॥ १० ॥ ज्ञानदेव म्हणे तूं भक्त अंतरंग ॥ नलगे तुज पांग बहुतेचा ॥११॥ **अभंग**॥ ऐसी ऐकोनी उत्तरे प्रेमा झाला पोटीं ॥ ह्मणे बोलावी ते गोष्टी अनुभवाची ॥ १ ॥ येरकर्मधर्म सर्व ही पाल्हाळ ॥ श्रमूचि केवळ जाणिवेचा ॥ २ ॥ ऐसा संत भेटी विरळा भाग्य योगें ॥ जो अथिला वैराग्य सप्रेमळु ॥ ३ ॥ भजन तया नांव वाटे मज गोड ॥ येर ते कबाड येणें वीण ॥ ४ ॥ नमन ते नम्रता न देखे गुणदोष ॥ अंतरी प्रकाश आनंदाचा ॥ ५ ॥ येर ते दांभीक जाणावी मायावी ॥ विश्वास मी जावी न धरीं त्याचा ॥ ६ ॥ ध्यान तया नांव निर्विकारनीके ॥ जे विश्वीं माझ्या देखे विठोबासी ॥ ७ ॥ अखंड हृदयीं तेचि आठवण ॥ साजिरे सम चरण विटेवरी ॥ ८ ॥ नादीं लब्ध जैसे आसक्त हरण ॥ जाय विसरोन देहभाव ॥ ९ ॥ या परी तल्लीन दृढ राखे मन ॥ या नांवे श्रवण आवडीचें ॥ १० ॥ वेवसाई चित्त ठेऊनी कृपण ॥ लाभाचें चिंतन सर्वकाळ ॥ ११ ॥ यापरी अखंड स्वहीत विचारण ॥ करीजे ते मनन सत्वशीळ ॥ १२ ॥ परपुरुषीं जैसी आसक्त व्यभिचारिणी ॥ नलगे तीच्या मनीं काम धाम ॥१३ ॥ कीटकीं भृकुटीये जैसे अनुसंधान ॥ नीके निजध्यासन एक वीध ॥ १४ ॥ सर्व भाव एक विठ्ठलाचिध्याये ॥ सर्वाभूती पाहे रूप त्यांचे ॥ १५ ॥ सर्वाहोनी निराळा रजतमावेगळा ॥ भोगी प्रेमकळा तेची भक्ती ॥ १६ ॥ सत्वाचा सुभटु असंग एकटु ॥ वैराग्या उद्भटू एकनिष्ठु ॥ १७ ॥ प्रारब्दाच्या भागीं नेणें देहस्मृती ॥ अखंड ते धृती निर्विकार ॥ १८ ॥ निर्वासिनामनें निजलाभें संपूर्ण ॥ नेणें स्वरूप ज्ञान कल्पाचे ॥ १९ ॥ अनुरागें गोविंदू गाईजे एकांती ॥ यापरती विश्रांति आणीक नाहीं ॥२०॥ तरी कायावाचामनें हा माझा अनुभव ॥ सांगितला सर्व आवडीचा ॥२१॥ नामा ह्मणे हेंची बोलाविलें तेणें ॥ उदार सर्वज्ञे पांडुरंगें ॥ २२ ॥

या प्रमाणें नामदेवाचीं यथार्थ उत्तरें ऐकून श्रीज्ञानेश्वरानीं त्याची पाठ थोपटून भाषण केलें कीं **नाम्या !** तूं परम धन्य आहेस तुझी श्रीविठ्ठल चरणीं एकनिष्ठ भावना खरी आहे, यांत संशय नाहीं.

## ॥ अष्टमोल्लासः ॥

### श्री विठ्ठल

# ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

**॥यो जीव संघे बहु पाप संवृत। सत्त्वज्ञान मोहांधक सर्प दंशितः॥**
**॥स संजीवित श्वानुभवामृतेन। श्री ज्ञानदेवं तमिमं भजाम्यहं॥१॥**

पहा! **श्री ज्ञानदेव** सर्व लोकांस निराकार देवतेच्या उपासनेविषयीं अत्यंत उपदेश करीत असत. त्यांचें असें मत असें कीं साकार दारुमयी, पाषाणमयी, व मृण्मयी मूर्ति करून तिचे ठायीं देवत्वाची भावना ठवून पूजन, सेवन, आणि उपासना करणें हें केवल अज्ञान कृत्य होय; आणि या योगानें अधिष्टान सत्य ज्ञानानंत असें जें खरें दैवत त्याची हेलना मात्र होते. कारण जगदीश्वरास साकारदेह व इंद्रियादि अवयव नसून गंध, अक्षता, पुष्प, धूप, दीप आणि नैवेद्य इत्यादिकें करून पूजन करणें ह्मणजे त्या देवाची हेलना होणार नाहीं काय? कारण, निराकार जगदीश्वरास कपाळ नसून गंध लावणें, नासिक नसून पुष्पाचा व धूपाचा सुवास देणें, मुख नसून अन्नपानाचा नैवेद्य समर्पण करणें, ही थट्टा नाहीं काय? ज्ञानेश्वरी—अ० ९ वा. ओंवी ॥ येह्वीं दिठी वेधली कवळें ॥ तैं चांदणियातें ह्मणें पिवळें ॥ तेवि माझा स्वरूपीं निर्मळें ॥ देखती दोष ॥ ४१ ॥ नातरीं ज्वरें विटाळलें मुख ॥ तें दुधातें ह्मणें कडू विख ॥ तेविं अमानुषा मानुष ॥ मानिती ॥४२॥ ह्मणऊनि पुढत पुढती धनंजया ॥ झनें विसंबसीया अभिप्राया ॥ जे यिया स्थूळ दृष्टी वांयां ॥ जाइजेलगा ॥ ४३ ॥ पैं स्थूळ दृष्टी देखतीं मातें ॥ तेंचि न देखणें जाण निरुतें ॥ जैसें स्वप्नीचेनि अमृतें अमर नोहिजे ॥ ४४ ॥ येह्वी स्थूळ दृष्टी मूढ ॥ मातें जाणती कीर दृढ ॥ परितें जाणणेंचि जाणणे या आड ॥ रिगोनि ठाके ॥ ४५ ॥ जैसा नक्षत्राचिया आभासा ॥ साठि घांत जाहला तया हंसा ॥ माजि रत्नबुद्धीचिया आशा ॥ रिगोनियां ॥ ४६ ॥ सांगे गंगा या बुद्धी मृगजळ ॥

टाकोनि आलियाचें कवण फळ ॥ कां सुरतरू ह्मणोनि बाबूळ ॥ सेविली करी ॥ ४७ ॥ हार निळयाचाचि दुसरा या बुद्धी हात घातला विखारा ॥ कां रत्नें ह्मणोनि गारा ॥ वेंचि जेविं ॥ ४८ ॥ अथवा निधान हें प्रगटल ह्मणोनि खदिरांगार खोळे भरिलें ॥ कां साउली नेणतां घातलें ॥ कुहासी हें ॥ ४९ ॥ तेविं मी ह्मणोनि प्रपंचीं ॥ जिहीं बुडी दिधली कृत निश्चयाची ॥ तिहीं चंद्रा साठी जेविं जळींची ॥ प्रभा धरिली ॥ ५० ॥ तैसा कृत निश्चय वायां गेला ॥ जैसा कोणी एक कांजी फ्याला ॥ मग परिणाम पाहों लागला ॥ अमृताचा ॥ ५१ ॥ तैसी स्थूळाकारीं नाशिवंतें ॥ भरवसा बांधोनि चित्तें ॥ जव पाहती मज अविनाशातें ॥ तरी कैंचा दिसें ॥ ५२ ॥ अगा काई पश्चिम सुमुद्राचिया तटा ॥ निगिजेत आहे पूर्विलिया वाटा ॥ कां कोंडा कांडिता सुभटा ॥ कण जोडे ॥ ५३ ॥ तैसे विकारलें हें स्थूळ ॥ जाणितले या मी जाणवतसे केवळ ॥ काइ फेण पीतां जळ ॥ सेविलें होये ॥ ५४ ॥ ह्मणोनि मोहिलेनिमनो धर्में ॥ हेंचिमी मानूनि संभ्रमें ॥ मग येथिचीं जियें जन्मकर्में ॥ तियें मजाचि ह्मणती ॥ ५५ ॥ येतुलेनि अनामा नाम ॥ मज अक्रियासि कर्म ॥ विदेहासि देहधर्म ॥ आरोपिती ॥ ५६ ॥ मज आकार शून्या आकार ॥ निरुपाधिकां उपचार ॥ मज विधिवर्जिता व्यवहार ॥ आचारादिक ॥ ५७ ॥ मज वर्ण हीनावर्ण ॥ गुणातीतासिगुण ॥ मज अचरणा चरण ॥ अपाणियां पाणी ॥ ५८ ॥ मज अप्रमेया मान ॥ सर्वगतासी स्थान ॥ जैसें सेजे माजीवन ॥ निदेला देखे ॥ ५९ ॥ तैसें अश्रवणा श्रोत्र मज अचक्षूसी नेत्र ॥ अगोत्रागोत्र ॥ अरूपा रूप ॥ ६० ॥ मज अव्यक्तासी व्यक्ती ॥ अनार्तासीं आर्ती ॥ स्वयं तृप्तातृप्ती ॥ भाविती गा ॥ ६१ ॥ मज अनावर्णा प्रावर्ण ॥ भूषणातीतासिभूषण ॥ मजसकळ कारणा कारण ॥ देखतीते ॥ ६२ ॥ मज सहजातें करिती ॥ स्वयंभातें प्रतिष्ठिती ॥ निरंतरातें अव्हानिती ॥ विसर्जितीगा ॥ ६३ ॥ मी सर्वदां स्वतः सिद्ध ॥ तोकीं बाळतरूण वृद्ध ॥ मज एक रूपा संबंध ॥ जाणती ऐसें ॥ ६४ ॥ मज अद्वैतासी दुजें ॥ मज अकर्तयासि काजें ॥ मी अभोक्ता कीं भुंजें ॥ ऐसें ह्मणती ॥ ६५ ॥ मज अकुळाचें कुळ वानिती ॥ मज नित्याचेनिधनें

शिणती ॥ मजसर्वांतरातें कल्पिती ॥ अरि मित्रगा ॥ ६६ ॥ मी स्वानंदाभिराम ॥ तया मज अनेक सुखाचा काम ॥ आघवाचि मी असें सम ॥ कीं ह्मणती एक देशी ॥ ६७ ॥ मी आत्मा एक चराचरीं ॥ ह्मणता एकाचा कैं पक्षकरीं ॥ आणि कोपोनि एका तें मारीं ॥ हेंचि रूढविती ॥ ६८ ॥ किंबहुना ऐसें समस्त ॥ जे हे मानुष धर्म प्राकृत ॥ तयाचि नाम मी ऐसें विपरीत ॥ ज्ञान तयांचें ॥ ६९ ॥ जंव अकार एक पुढां देखती ॥ तंव हा देव येणें भावें भजती ॥ मग तोचि विघडलिया टाकिती ॥ नाहीं ह्मणोनी ॥ ७० ॥ मातें येणें येणें प्रकारें ॥ जाणती मनुष्ये ऐसेनि आकारें ह्मणऊनि ज्ञानचितें आंधारें ॥ ज्ञानासि करी ॥ ७१ ॥ श्री ज्ञानेश्वरानीं साकार देवतेच्या उपासना निषेधक कांहीं अभंग ही केले आहेत. अभंग ॥—

निर्जिवा दगडाची काय करिसिल सेवा ॥ तो तुज निर्दैवा देईल काय ।१। कवणे गुणें भुलि पडलि गव्हारा । तीर्थाच्या माहेरा नोळखीसि ः २ । अष्टोत्तरशें तीर्थे जयाच्या चरणीं ॥ तो तुझ्या हृदयभुवनीं आत्मारामु ॥ ३ ॥ देह देवळीं असतां जासि आना तीर्था ॥ मुकलासि आतां ह्मणे ज्ञानदेवो ॥ ४ ॥ प्रश्न ॥ अहो पण श्रीज्ञानेश्वर पंढरपुरांतील श्रीविठ्ठलाच्या उपसनेविषयीं उपदेश करीत होते, असें त्यांच्या अभंगावरून कळतें. किंबहुना ते स्वतः त्या देवाचे उपासकच बनले होते; असेंही ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण त्यांच्या बहुतेक अभंगांमध्यें बापरखुमादेवीवरू किंवा श्रीविठ्ठलू अशीं अक्षरें येतात, त्यायोगानें असें स्पष्ट होतें कीं, तें साकार उपासकच होते आणि तुह्मी नाहीं असें कसें ह्मणता ? अभंगांत श्रीविठ्ठलू अशीं अक्षरें आली ह्मणून ते उपासक झाले असें नाहीं कारण श्रीज्ञानेश्वरानीं ज्या ज्या अभंगामध्यें श्रीविठ्ठलू या अक्षरा उच्चारचा केला आहे, तो तो उच्चार निराकार सर्वाधिष्टान ब्रह्माच्याच उद्देशानें केला आहे. यद्यपि साकाराच्या उद्देशानें केला असेल तथापी तो अज्ञान जीवांच्या वृत्तीच्या एकाग्रतेकरिताच केला असेल परंतु त्यांनीं बहुतेक ठिकाणीं चंद्रभागा पुंडरीक आणि श्रीविठ्ठल हीं नामें आपल्या देहावरच बसविली आहेत. त्यावरून ते निराकारोपासक होते यांत संशय नाहीं. अभंग ॥ चिदानंद रूप चेतविते एक ॥ एकपणें गुणागुणीं दावी अनेक ॥ १ ॥ आ-

दिअंतीं गुण सर्वत्र निर्गुण ॥ गुणासी अगुण भासतीना ॥ २ ॥ कैसें जालें अरूपीं गुणीं गुणवृत्ती ॥ सगुण पाहतां अतरले गती ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठलु नंदनु ॥ आदिअंतु एकुपूर्ण सनातनुगे मायें ॥ ४ ॥ अभंग ॥ मी तूं पण विकल्प मावळल्या मूळीं ॥ दोहीं माजी बळी कवण पाहे ॥ पाहाता पाहणे दृष्टत्व ग्रासील ॥ स्वरूपचि उरलें कवणा पाहों ॥ १ ॥ बोलीं नये ऐसें केलें वो माय येणें ॥ बोलताचि गुणें आठउ नाहीं ॥ धृ ॥ आठविता विसरू संसार नाठवा॥ हे खग स्वभावें बोल त्याचा ॥ बोलता बोलण ठकचि पडलें मुळीं ॥ स्थुळीचा स्थुळी प्रकाशलागे माये ॥ २ ॥ बापरखुमादेवावरू विठ्ठलु उघडा ॥ निजबोधीं निवाडा ऐसा जाला ॥ निवृत्तिरायें खुण लेउनि अंजन ॥ दाउनि निधान प्रगट केलें ॥ ३ ॥ अभंग ॥ स्वप्नाचेनि भ्रमें धरिसी स्थूळाकृती ॥ तरिसिद्धिनव्हे॥सत्य त्याच्या पायीं ॥ कारण महाकारणलिंग आणि चतुष्टय ॥ हे शाब्दिक उपाय बोलों ठाति ॥ १ ॥ एक नाहीं तेथें दुजें कायिसे ॥ देहद्वय पाहतां दुजें न दिसे ॥ धृ ॥ तोचि ते संकल्प स्थूळ नैश्वर्याचें भान ॥ त्या ह्मणती कारण नवल पाहीं महाकारण लिंगदेह शाद्बिकीं धरिला ॥ तो शास्त्रज्ञीं पाहिला अर्थिसाहि ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठलुचि देहीं ॥ अवस्थातीत पाही तोचि एक ॥ निवृत्तिरायें अंजन लेवउनि पायाळा निज सदन तें विश्व जालें ॥ ३ ॥ अभंग ॥ सर्वादि सर्वसाक्षी तो ॥ विश्वंभर खल्विद तोगे बाई ॥ १ ॥ आनंदा आनंद तो ॥ प्रबोध प्रबोध तोगे बाई ॥ १ ॥ परात्पर तो ॥ रखुमादेविवरू तोगे बाई ॥ ३ ॥ अभंग ॥ दुरिना जवळी त्रिभुन मंडळी ॥ ते मनाचा मुळीं बैसलेसे ॥ १ ॥ पाहतां नदिसे भानुप्रकाशें ॥ येऱ्हवि ते असे मशकिं रया ॥ २ ॥ बोलो जातां जेणें जिव्हाचि खादली पाहतां पाहतां नेली चर्मदृष्टी ॥ २ ॥ दांतेविण जेणें स्थूळदेह खादले ॥ शस्त्रेंविण छेदिले लिंगदेह ॥ ३ ॥ त्वंपादें सिद्ध निवृत्ति लाधलें ॥ गुरुलक्षीं हारपलें लक्ष ॥ ४ ॥ निवृत्तिदासा तुह्मी बहुत न बोला ॥ रखुमादेवीवराध्याइजे सु उगवला ॥५॥ या अभंगावरून ते निराकार ब्रह्मासच श्रीविठ्ठल असें ह्मणत असत असें उघड दिसतें. असो, **श्रीज्ञानेश्वरांचा** उपदेशाचाभर बहुत करून आत्मस्वरूपावर फार असे. त्यांनीं बहुतेक अभंग वगैरे ग्रंथ आत्म-

निष्ट व नामसंकीर्तनपरच केले आहेत. ॥अभंग॥त्रिभुवनापरतेंदाविसीदुरी॥ आधिं तूं आपली शुद्धि करी ॥ उदयो अस्तु कवणिये घरीं ॥ पिंडामाझारा सांग बापा ॥ १ ॥ जागृतीमध्यें कवण जागत ॥ सुषुप्तिमध्यें कवण निद्रिस्थ ॥ दोघे भ्रमलिया स्वप्न देखत ॥ जीवकींमन सांग पारे ॥ धृ ॥ जागृतीवरून काढी चेतना ॥ सुषुप्तिमध्यें रिघता ज्ञाना ॥ दोन्हींचेईलिया जाणता स्वप्ना ॥ मग अनुवादती कवण ॥ २ ॥ इंद्रियें पुत्र दारे दाटलीं ॥ जागत होतीं ते काय जालीं ॥ सांगपा कवणेठायीं लपालीं ॥ मग मिळालीं कवणेठायीं ॥ ३ ॥ शब्दातें नाईकती श्रवण ॥ पाहात पाहात डोळे जाले हीन ॥ नासाग्री ठेऊनियां सुमन ॥ पारिनेणिजे परीमळा ॥ ४ ॥ पाहेंपां येथें अनुवादुकाईचा ॥ मी माजी हरपली खुंटली वाचा॥ ज्ञानदेव ह्मणे सद्गुरूसाचा ॥ अढळपदीं बैसविलें ॥ ५ ॥ नामपर अभंग ॥ अशौचीया जपोंनये आणिकातें ऐकोंनये ॥ ऐसिया मंत्राते जगबिहे ॥ त्याचें फळणें थोडें परिक्षोभणें बहु ॥ तैसा मंत्रराज नव्हेरेरे ॥ १ ॥ नारायाणनाम नारायणनाम ॥ नारायणनाम ह्मणकोरेरे ॥ ध्रु ॥ बाह्य उभारावि त्यावरी काहाळ लावावी ॥ गातिया ऐकतिया उणीव येवों नेदावी ॥ उत्तमापासूनि अंत्यजवरी ॥ मुक्तीची सेल मागावीरेरे ॥ २ ॥ काय कराल यागें न सिणावें योगें हें तों वेसनचि वाउगें ॥ नरहरि नरहरि उदंड वाचा ह्मणाल तरि कळिकाळ राहेल उगेरेरे ॥ ३ ॥ चरणीं गंगा जन्मली अहिल्या उद्धरली ॥ नामे प्रतिष्ठा पावली गिरिजा ॥ सकळीका साधना वरिष्ट हें नाम मा मनिंभाव न धरी दुजारेरे ॥ ४ ॥ तीर्थी भाजिजाल अमरीं पूजीजाल ॥ तुमचिया भावा सारिखा देवो होईल ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु तुमचा ऋणवंई म्हणतां न लजेलरेरे ॥ ५ ॥ **अभंग** ॥ कर्म आणि धर्म आचरिजे जयालागीं साधकासिणले साधन साधितां अभागी ॥ १ ॥ बरवें वो तुझें नाम विठो आवडतमज ॥ दुजें उच्चारितां मना येत असे लाज ॥ २ ॥ भुक्ती आणि मुक्ती नामापासीं प्रत्यक्ष चाऱ्ही वेद साही शास्त्रें देताती साक्ष ॥ ३ ॥ रखुमादेविवरा बा तुझी आण ॥ कायावाचा चित्त चरणीं डुललें गाहाण ॥ ४ ॥ **अभंग** ॥ यम धर्म सांगे दूता ॥ तुम्हा परिसावी निजकथा ॥ जेथें रामनाम वार्ता ॥ तया देशा नच जावें ॥ १ ॥ नामें महा दोषांहरण नामें पतीत पावन ॥

नामें कलिमलदहन ॥ भवबंधन मोचक ॥ २ ॥ जये देशींनाम वसे ॥नाम श्रवणीं विश्वासे ॥ गाती नाचती उल्हासें ॥ ह्मणी पाहाल तयाकडे ॥३॥ जये ग्रामीं हरि पूजन जगे नगरीं हरि कीर्तन ॥ तेथें गेलिया बंधन ॥ तुम्ही पावाल त्रिशुद्धी ॥ ४ ॥ जये देशीं गरुड टका ॥ कुंचे ध्वज आणि पताका ॥ जेथें संतजन आइका ॥ तया देशा नच जावें ॥ ५ ॥ आणिक ऐकारे विचारू ॥ जेथें राम नामाचा गजरू ॥ तेथें बापरखुमादेविवरू ॥ तया बळें नागविती ॥ ६ ॥ श्रीज्ञानेश्वराची सद्गुरु परंपरा निवृत्तींनीं एका अभंगांत वर्णन केली आहे. ॥ अभंग ॥ आदिनाथ उमाबीज प्रकटिलें ॥ मछिंद्रा लाधलें सहज स्थिती ॥ १ ॥ तेंचि प्रेम मुद्रा गोरक्षीं दिधली ॥ पूर्ण कृपा केली गयनिनाथा ॥२॥ वैराग्य तापला सप्रेम निवाला॥ ठेवा जो लाधला शांति सुख॥३॥निर्द्वंद्व निःशंक विचरतां मही सुखानंद ह्रदयीं ॥ स्थीर जाला ॥ ३ ॥ विरक्तींचें पात्र अन्वयाचें मूळ ॥ देऊनि सम्यक आनंन्यता ॥ ४ ॥ निवृति गयनि कृपा केली असें पूर्ण ॥ कुळ हें पावन कृष्ण नामें ॥ ५ ॥ असो. आतां श्रीज्ञानेश्वरांचे सिद्धांतीं अमृत अनुभव आणि पासष्टी हे ग्रंथ केवल अद्वैतपरच आहेत. अमृतानुभव ग्रंथाची भाषा फार कठीण आहे. ती लोकांस एकाएकी कळत नाहीं. या ग्रंथाचा अर्थ सद्गुरु मुखेंच ऐकिला पाहिजे तरच पूर्ण अर्थ ज्ञान होईल; नाहीं तर सत्यत्वें करून अर्थ न कळतां अव्यवस्था मात्र होईल. श्रीज्ञानेश्वरानीं सकल वेदांत शास्त्र संमत असा स्वानुभव प्रकट करून मुमुक्षूस प्रत्यग् भिन्न आत्म्याचा साक्षात्कार व्हावा आणि जे जीवन्मुक्त सिद्ध पुरुष आहेत त्यांना अनंदातिशय व्हावा ह्मणोन स्वानुभवामृताख्य ग्रंथ प्राकृत भाषेनें रचिला आहे. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत करावा असा ज्ञानेश्वरांचा हेतु होता; व त्याप्रमाणें त्यानीं पांच श्लोकही केले होते. परंतु अज्ञान जीवांस गीर्वाण भाषा कळावयाची नाहीं ह्मणून प्राकृत भाषेंत कर, असें श्रीगुरु निवृत्तीनें सांगितल्यावरून याच श्लोकापुढें महाराष्ट्र भाषेनेंच केला- या ग्रंथामध्यें सर्व अद्वैत प्रतिपादन केलें आहे. यांत द्वैताच्याविषयीं यत्किंचितही वर्णन नाहीं. या ग्रंथाची शिवशक्ती नमन, सद्गुरु स्तवन, वाचाऋण निरसन, ज्ञानाभेद कथन, सच्चिदानंद विवरण, शब्दखंडण आज्ञान खंडण, ज्ञानखंडण, जविन्मुक्ती दशा कथन, आणि ग्रंथ महि-

मा कथन, अशीं दहा प्रकरणें आहेत. हा ग्रंथ जरी प्राकृत भाषेंत आहे तरी भाषेचें दुर्बोधत्व असल्यामुळें दहा टीकाकारांनीं टीका केल्या आहेत. आतां प्रथम पांच श्लोक सांगून प्रत्येक प्रकरणाचा सारांश संक्षेपानें वर्णन करितों. श्लो० यदक्षरमनाख्येयं मानंदमजमव्ययं ॥ श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥ १ ॥ गुरूरित्याख्ययालोके साक्षाद्विद्याहि शांकरी ॥ जयत्याज्ञानमस्तस्मैदयार्द्रायै निरंतरं ॥ २ ॥ साधंकेनच कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ॥ ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतछलान्मुहुः ॥ ३ ॥ अद्वैतमात्मनस्तत्वं दर्शयंतौमिथस्तरां ॥ तौवंदेजगतामादौ तयोस्तत्वाभिपत्तयोः ॥ ४ ॥. मूलाया ग्रायमध्याय मूलमध्याग्रमूर्तये ॥ क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णायशंभवे ॥५॥ असें संस्कृत भाषेनें नमन करून नंतर महाराष्ट्र भाषेनें नमन केलें आहे तें असें कीं,—**ओंवी** ॥ ऐसी इये निरूपाधिके ॥ जगाचीं जियें जनकें ॥ तीं वंदिलीं मियामूळकें ॥ देवो देवी ॥१॥ **अर्थ**—जीं जगाचीं उत्पन्न करणारीं मातापितरें असून निरूपाधीक अशीं देवदेवी तीं ग्रंथारभीं वंदिलीं. जगतास उत्पन्न करणारी असून तीं निरूपाधिक कशी असा प्रश्न निघेल, कारण जगताच्या उत्पत्तीची उपाधी त्यांना लागणार नाहीं काय ? तर यास उत्तर "यतोविश्वमिदंजातंतदेवनिरुपाधिकं" इत्यादिक श्रुतीनें जगदुत्पतीस कारणं असून ब्रह्मास निरूपाधिकत्व वर्णिलें आहे. आतां युक्तीनेंही निरूपाधिकत्व असें सिद्ध होतें कीं लौकिकीं मातापितर ते स्वकृत् शुक्रशोणित मेलनादी व जननादी उपाधीनें जसें प्रजोत्पादन करितात, त्याप्रमाणें ब्रम्हास विश्वउत्पन्न करण्याविषयीं उपाधी लागली नाहीं. कारण तें ब्रम्ह निराकार आहे. व "निराकारंनिरंजनं" असें श्रुतीनेंहीं कथिलें आहे. म्हणून जगाची जनकें आणि निरूपाधिकें किंवा अद्वैतमताप्रमाणें तें ब्रम्हच जर सकलदृश्य जगत् नटलें आहे तर मुळींच उपाधी रहात नाहीं. जशी मृत्तिकाच घटरूप झाली असतां त्या घटाची मृत्तिकेस काय उपाधी लागणार आहे ! व मृत्तिकेची घटास काय उपाधी आहे. कारण मृत्तिका आणि घट याचें भिन्नत्व मुळींच राहिलें नाहीं. मृत्तिका तोच घट आणि घट तीच

मृत्तिका तसें सकल जगत् जर ब्रम्हच आहे तर जगताची उपाधी ब्रम्हास काय लागणार? कारण विश्वाचें आणि ब्रम्हाचें अभिन्नत्व आहे. म्हणून जगाची जनकें असून निरूपाधिकें अशी देवदेवा होत. बरें, देव आणि देवी हे दोघे जर आहेत तर निरूपाधिकत्व कसें संभवेल ? कारण एकेकाची उपाधी एकमेकांस• लागते—तर—ब्रह्मासी सर्व जगताचें ऐक्य जर आहें तर देवीतरी भिन्न कसी राहील? तर देव तीच देवी आणि देवी तोच देव जसें कस्तुरीचें आणि परिमळाचें, अग्नीचें आणि उष्णतेचें, व गळाचें आणि गोडीचें जसें ऐक्य तसेंच देवदेवीचें ऐक्य होय. या ऐक्याविषयीं श्रीज्ञानेश्वरानीं वक्ष्यमाण ओंव्यामध्यें वर्णन केलें आहे.. असो, जगताचें आणि देवदेवींचें जर ऐक्य आहे तर मी नमन करणाराही जगतांतीलच आहें. ह्मणून मीही ब्रह्मच आहें. जसा सोन्याचा खंडोबा, सोन्याच्या कुत्र्यावर बसला आहे आणि त्या खंडोबास सोन्याचा भक्त नमन करीत आहे याजमध्यें सुवर्ण दृष्टीनें पाहिलें असतां खंडोबा, कुत्रा, आणि नमन करणारा भक्त हीं नामें मात्र आहेत वस्तुतः विचार केला असतां तें सर्व सुवर्ण होय. त्याप्रमाणें देवदेवीस अभेद स्थितीनें माझें वंदन आहे. बहुधा श्रीज्ञानेश्वरानीं प्रथम प्रकरणांतील सारांश ह्या ओंवींतच आणिला आहे. आतां या देवदेवीसच शिव शक्ती, प्रकृति पुरुष, इत्यादि नामें दिलीं आहेत. ओंवी ॥ जो प्रियुचि प्राणेश्वरी ॥ उलथे आवडीचे सरोभरी ॥ चारुस्थळी एकाहारी ॥ एकांगाचा ॥ २ ॥ आवडीचे निवेगें ॥ एक एकातें गिळिताहे आंगें ॥ कीं द्वैताचे निपांगें ॥ उगळितें अहा ती ॥ ३ ॥ जें एकचि नव्हे एक सरें ॥ दोघादोनिपण नाहीं पुरे ॥ काय नेणो साकारें ॥ स्वरूपें जियें॥४ कैसी स्वसुखाची आळुकीं ॥ जें दोनिपण मिळोनि एकीं ॥ नेदतीचि कौतुकीं ॥ एकपण फुटों ॥ ५ ॥ हाठावो वरि वियोग भिडें ॥ जें बाळक जगा येवढें ॥ वियालीं परी न मोडे दोघलेपण ॥ ६ ॥ आपुल्रिये आंगीं संसारा ॥ देखिलीया चराचरा॥परी नेंदितीच तीसरा ॥ झोक लागों॥७॥ ज्यां एके सत्तेचें बैसणें ॥ दोघां एका प्रकाशाचें लेणें ॥ जें आनादि एकपणें ॥ नांदती दोघें ॥ ८ ॥ भेदु लाजोनि आवडी ॥ एकरसीं देत बुडी ॥ तो भोगणे याथाव काढो ॥ अद्वैताचा जेथें ॥ ९ ॥ जेणें देवें संपूर्ण देवी ॥ जिये वीण कांहीं नातो गोसांवीं ॥ किंबहुना एकोप जि-

बीं || एकएकाची || १० || कैसा मेळु आला गोडिये || दोघें न माती
जगीं इयें || कीं परमाणुही माजी उवायें मांडिली अहाती || ११ ||
जिहीं एक एकाविणें || न कीजे तृणाचें हीं निर्माण || जियें दोघें जीव-
प्राण जिया दोघां || १२ || घर वातें मोटकीं दोघें || जै गोसांवी संजे
रिघे || तैं दंपत्यपणें जागें || स्वामिणी जे || १३ || जया दोघां माजि
एकाधें || ववायें उमजलें होय निंदें || तरी घर वात गिळुनि नुसुधें ||
कांहीं ना करी || १४ || दोहीं आंगाची आटणी || गिवसीत अहाती
एकपणीं||जालीं भेदाचिया वाहणी||आधाधी जियें||१५||विषो एक एकाचीं
जियें||एकमेकाचीं विषयी जाये||जिहीं दोघीं सुखियें||जियें दोघे||१६||स्त्रीपु
रूष नाम भेदें||शिवपण एकलें नांदें || जग सकळे अधार्थे|| पूर्णेजियें||१७
दों दांडी एक श्रुती || दोहीं फुलीं एकदती || दोहीं दिवीं दीप्ती ||
एकीचि जेवी || १८ || दाऊनि दोनिपण || एक रसाचें आरोगण ||
करित आहे मेहुण || अनादिजे || १९ || जे स्वामीचिया सत्ता || विण
असो नेणें पतिव्रता || जियेवीण सर्व कर्ता || कांहीं नाजो || २० ||जे-
कीं भाताराचें दिसणें || भातारुचि जियेचें असणें || नेणिजति दोघेजणें
निवडू जियें || २७ || गोडी आणि गुळु || कापूर आणि परिमळु ||
निवडूं जातां पांगुळू || निवाडू होये || २३ || समग्र दीप्ती घेतां || जेविं
दिपचिये हातां || तेविं जियेचिया तत्वता || शिवुचिलाभे || २४ ||
जैसा सूर्य मिरवे प्रभा || प्रभेसूर्यत्वचीं गाभा || तैसी भेद गिळित शो-
भा एकचिजें || २५ || कां बिंब प्रतिबिंबाद्योतक | प्रतिबिंब बिंबा
अनुमापक | तैसें द्वैतमिसें एक || बखतते || २६ || सर्व शून्याचा नि-
ष्कर्षु || जिया बाइला केला पुरुषु || जेणे दाटुलेन सत्ता विशेषु|| शक्ति
जालि || २७ || जिये प्राणेश्वरीवीण | शिवीं हीं शिवपण | थारो न शके ते
आपण || शिवें घाडिला || २८ || ऐश्वर्येसीं ईश्वरा || जियेचें आंग
संसारा || आपुला होउनी उभारा || आपणाचि जे || २९ || पतिचेनि
आरुपपणें || लाजोनि आंगाचें मिरवणें || केलें जगा येव्हढे लेणें ||
नाम रूपाचें || ३० || ऐक्याचाही दुकाळा || बहुपणाचा सोहळा ||
जिया सदैवेंचि या लीळा || दाखविला || ३१ || आंगाचिया आढ-
णियां || कांतु उवाया आणिला जिया || स्व संकोचें प्रिया || रूढ-
विली जेणें || ३२ || जियेतें पाहावयाचिया लोभा || चढे द्रष्टत्वाचिया

क्षोभा ॥ जयंतेंन देखतुचि उभा ॥ आंगचि सांडी ॥ ३३ ॥ कांताचिया भिडा ॥ आंबुला होय जगा एव्हढा ॥ आंगविला उघडा ॥ जियेविण ॥ ३४ ॥ जो हा ठाव मंदरूपें ॥ उवाइलेपणे हारपे ॥ तो जाला जिणेचेनि पडपें विश्वरूप ॥ ३५ ॥ जिया चेवविला शिउ ॥ वेद्याचें बोणें वहु ॥ वाढितेनसिंजेउं ॥ नियाबाला जो ॥ ३६ ॥ निदेलें न भातारें ॥ जेविये चराचरें ॥ जियेचा विसरवला दुरे ॥ आंबुलेपणही ॥ ३७ ॥ जंवं कांत लपों बैसे ॥ तंव नेणिजे जियोद्देशें ॥ जियें दोघें आरिसें ॥ जिये दोघां ॥ ३८ ॥ जिये चेनि आंगलगें ॥ आनंद आपणा आरोगुलागें ॥ सर्व भोक्तृत्व ही नेघे ॥ जिये वीण कांहीं ॥ ३९ ॥ जया प्रियाचें जें आंग ॥ जो प्रियु जियेचें चांग ॥ कालउनी दोन्हीं भाग ॥ जेवी ते अहातीं ॥ ४० ॥ जैसी कां समिरे सकट गती ॥ कां सोनिया सुकटकांती तैसी शिंवें सीं शक्ती ॥ अवघी चिजे ॥ ४१ ॥ कां कस्तूरी सकट परिमळू ॥ कां उष्मे सकट अनळु ॥ तैसा शक्तीसी केवळु ॥ श्रीशिवुचि जो ॥ ४२ ॥ नाराती आणि दिवो ॥ पातलीं सूर्याचा ठावो ॥ तैसा आपुला सांचि वावो ॥ दोघें जियें ॥ ४३ ॥ किं बहुना तियें ॥ प्रणवाक्षरीं विरूढतियें ॥ दशें चिंहीं वैरियें ॥ शिव शक्ती ॥ ४४ ॥ हे असो नामरूपाचा भेद सिरा ॥ गिळित येकार्थाचा उजिरा ॥ नमो तयां शिव वोहरां ॥ ज्ञानदेवो ह्मणे ॥ ४५ ॥ जयाचा रूप निर्धारीं ॥ गेली परेसीं वैखरी ॥ सिंधूसी प्रळय निरीं ॥ गंगा जैसी ॥ ४६ ॥ जया दोघांचा आलिंगनीं ॥ विरोनि गेलीं दोन्हीं ॥ अवघीं याची रजनी ॥ दिठीचिजे ॥ ४७ ॥ ना तरी वायू चळवळेंसि ॥ जिराला व्योमाचिये कुसीं । हारपला प्रळय प्रकासीं । सप्रभ भानु ॥ ४८ ॥ तेवि नेहाळिता ययाते ॥ गेले पाहणे नसि पाहाते ॥ पुढति घरोते वरौते ॥ वंदिली तियें ॥ ४९ ॥ जयाचां वाहाणि ॥ वेद कुवेद्यार्चे पाणीं ॥ न पियेपण सांडणी ॥ आंगाचीही करी ॥ ५० ॥ तेथें मी नमस्कारां ॥ लागीं उरों दुसरा ॥ तरीं लिंग भेद पऱ्हां ॥ जोडु जावो ॥ ५१ ॥ तरी सोनेंनसीं दुजें ॥ नव्हतु लेणें सोना भजे ॥ हें नमन करणें माझें तैसे आहे ॥ ५२ ॥ सांगतां वाचेतें वाचा ॥ ठावोवाच्य वाचकाचा ॥ पडतां काय भेदाचा ॥ विटाळू होये ॥ ५३ ॥ सिंधु आणि गंगेचि मि-

ळणीं ॥ स्त्रीपुरुष नामाचि मिरवणीं ॥ दिसतसे तरि काया पाणीं ॥ द्वैत होईल ॥ ५४ ॥ पाहेपा भास्य भासकता ॥ आपुला ठाई दावितां ॥ एक पण काय सविता ॥ मोडीतसे ॥ ५५ ॥ चांदाचिया दोंद्रावरी ॥ होत चांदचीयाचि विखुरी ॥ काय उणे दीप्तीवरी ॥ गिवसों पा दिपु ॥ ५६ ॥ मोतियाची किळ ॥ होय मोतियावरी पांगूळ ॥ आगळें निर्मळ ॥ रूपा एकीं ॥ ५७ ॥ मात्राचिया त्रिपुटिया ॥ प्रणउ काय केला चिरटिया ॥ किंणकारंतिरे घाटिया ॥ भेदला काई ॥ ५८ ॥ अहो ऐक्याचें मुद्दल नढळे ॥ आणि साजिरेपणाचा लाभ मिळे ॥ तरि स्व तरंगाचि मुकुळे ॥ तुरंबुका पाणीं ॥ ५९ ॥ ह्मणौनि भूतेशु आणि भवानी ॥ वंदिलीं नकरुनि-सिनानि ॥ मीं रिघालो नमनी ॥ तें हे ऐसे ॥ ६० ॥ दर्पणाचेनि त्यागें ॥ प्रतिबिंब बिंबीरिघे ॥ कां बुडी दीजे तरंगे ॥ वायुचा ठेला ॥६१॥ नातरि निद जात खेवो ॥ पावे आपुला ठावो ॥ तैसि बुद्धि त्यागे देवी देवो ॥ वंदिली मियां ॥ ६२ ॥ सांडुनिमीठपणाचा लोभु ॥ मिठे सिंधुत्वाचा घेतला लाभु ॥ तेवि अहं देऊनि शंभु ॥ शांभवी जालें ॥६३॥ शिव शक्ति समावेशें ॥ नमन केलें म्या ऐसें ॥ रंभागर्भ अकाशें ॥ रिघाला जैसा ॥ ६४ ॥ याप्रमाणें श्रीज्ञानेश्वरानीं प्रथम प्रकरणांत शिव शक्तींचें नमन केलें. आतां द्वितीय प्रकरणांत श्रीगुरूचें स्तवन केलें आहे. तें असें कीं, या श्रीगुरूची योग्यता काय वर्णन करावी! कीं आत्मस्वरूप प्राप्ती करितां कांडत्रय वेदोक्त, नित्यानित्य विवेक, इहामुत्र, परत्रफल भोग विराग, शमादि षट्क, शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा, समाधान, आणि मुमुक्षत्व इत्यादि जितकीं साधनें आहेत तितक्या साधनरूप वनास हा श्रीगुरू रूप वसंताचा अविर्भाव झाला म्हणजे सकल नव पुष्पित आणि सफल होतें सारांश—श्रीगुरूच्या प्रसादें करून सकल साधनें सफल होतात. यास्तव उपायवनास वसंतस्थानापन्न श्रीगुरू होय आणि जो आज्ञेचा म्हणजे श्रुतिस्मृत्यादि भगवत् आज्ञा म्हणून ज्या लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत त्या आज्ञेमध्यें जीव ब्रह्माचें ऐक्य वर्णिलें आहे. तेंच आहेवपण होय. तें जीव ब्रम्हाचें ऐक्य श्रीगुरू प्रसादावांचून होत नाहीं. तस्मात् श्रीगुरू हा सकल आज्ञेचा आहे व तंतू ( सौभाग्य तंतू ) होय. आतां सर्वाधि-

ष्टान् निराकार ब्रह्मच आमच्यासारख्या अज्ञान जीवांस ज्ञान उपदेश करण्यासाठीं श्रीगुरुरूपें अवतीर्णच झालें कीं काय? किंवा करुणा ही अमूर्त आहे, तीच मूर्तिमंत प्रगट झाली कीं काय? अविद्या अरण्याचे ठायीं भ्रमण पावणारा जो जीव त्याच्या रक्षणार्थ जगदीश्वरानीं पाठीराखा श्रीगुरूच पाठविला. कीं काय? ज्याच्या कृपाकटाक्षें करून बंधमोक्ष नाहींसें होतात; आणि स्वरूप आपण आपल्याला ओळखते. श्रीगुरुच्या कृपारूप उदकेंकरून जीव इतका शुद्ध होतो कीं शुद्ध सत्व प्रधान मायोपाधिक शिवास ओवळा ह्मणून अंगीं लावीत नाहीं. ह्मणजे जीव शिवत्वाची उपधी टाकून शुद्ध ब्रह्म होतो. काय चमत्कार सांगावा कीं अज्ञानें करून भवसमुद्रांत बुडणारा जो शिष्या त्यास ज्ञानोपदेशें करून राखो जातां श्रीगुरूनीं आपलें गुरूत्वही गमविलें. ह्मणजे शिष्यास जीव ब्रह्माचें ऐक्य व जगत् ब्रह्मादी बोध झाल्यावर श्रीगुरूचें गुरुत्व व शिष्याचें शिष्यत्व हें दोनीं हीं मावळतें. केवल भजना करितांच गुरू शिष्याचें नातें शाब्दिक राहतें. त्याजमध्यें मी शिष्या नमन करणारा वेगळा आणि ते श्रीगुरू वेगळे असें भिन्नत्व कसें राहील? याप्रमाणें बहुत प्रकारें करून अभेद रितीनें श्रीगुरूचें स्तवन केलें आहे. अमृतानुभव, प्रकरण दुसरे—ओंवी—आतां उपाय वन वसंतु ॥ जो आज्ञेचा आहेव तंतू ॥ आमूर्तेचि परी मूर्तू ॥ कारुण्याचा ॥ १ ॥ मोडोनि माया कुंजरू ॥ मुक्त मोतियाचा वोगरू ॥ जेवविता सद्गुरू ॥ श्रीनिवृत्ति वंदू ॥ २ ॥ अविद्येचें आडवें ॥ भुंजित जीच पणाचें भवे ॥ तया चैतन्याचें धांवें ॥ धावकारू जो ॥ ३ ॥ जयाचेनि अपांग पातें ॥ बंध मोक्ष पाणि आतें ॥ भेटे जाण तया जाणतें ॥ जया पासीं ॥ ४ ॥ कैवल्य कनकाचिया दाना ॥ जो न कडसी थोर साना ॥ द्रष्टयाचिया दर्शना ॥ पाठाऊ जो ॥ ५ ॥ सामर्थ्याचे निबिकें ॥ जो शिवातें हिं गुरूत्वे जिंके ॥ आत्मा आत्मसुख देखे आरिसांजियें ॥ ६ ॥ बोध चंद्राचिया कळा ॥ विखुरलियां एक वेळां ॥ कृपापुनीवलीळा ॥ करी जयाची ॥ ७ ॥ जो भेटलियाचि सर्वे ॥ पुरती उपायाचें धांवें ॥ प्रवृत्ति गंगा थिरावे ॥ सागरीं जिये ॥ ८ ॥ जयाचेनि अनवसरें ॥ द्रष्टाले दृश्याचें मोहिरें ॥ जो भेटत तरवेवसरे ॥ बहुरूपचि हें ॥ ९ ॥ अविद्येचें काळ वरवें ॥ कीं स्वबोध सुदिनें

फांकें ॥ सीतले प्रसादार्के ॥ जयाचेनि ॥ ९० ॥ जयाचेनि कृपा स-
लीलें ॥ जीवु हा ठाव वरी पाखाळें ॥ जे शिवपण हीं वोविलें-॥ आंगीं
नलवी ॥ ९१ ॥ राखो जातां शिष्यातें ॥ गुरूपण हीं धाडिलें थितें ॥
तर्‍हीं गुरु गौरव जयातें ॥ सांडिचिना ॥ ९२ ॥ असें श्रीगुरुचें बहुत
स्तवन केलें आहे. आतां अभेदवंदनाविषयीं—ओंवी—आपणा प्रती
रवी ॥ उदो न करी जेंवी ॥ हा वंद्य नव्हे तेंवी ॥ वंदनासी॥ ४४ ॥
कां समोरपण आपुले ॥ न लाहिजे कांहीं केलें ॥ तैसें वंद्यत्व घातले ॥
हारउनि येणें ॥ ४५ ॥ आकाशाचा आरीसां ॥ उठि प्रतिबिंबाचा
ठसा ॥ हा वंद्य नव्हे तैसा ॥ नमस्कारासी ॥ ४६ ॥ परी हा नव्हे
तरी नहो ॥ हेवेखासे कां घेवो ॥ परी वंदित याही ठावो ॥ उरो
नेदी ॥ ४७ ॥ आंगौनि एकुण झोलु ॥ फेडितांचि तरि तो बाहेरिळु॥
कडुफिटे आंतुलु ॥ न फेडितांचि ॥ ४८ ॥ नाना बिंबपणा सरिसें ॥
घेउनि प्रति बिंबनासे॥नेलें वंद्यत्व तैसें वंदिते नसीं॥ ४९॥नाहीं रूपाचि जेयं
सोये ॥ तेथें दृष्टिचें कांहींच नव्हे ॥आह्मा फळलें हे पाये ॥ ऐसीया
दशा ॥ ५० ॥ गुणातें लाचिया सोइरीका ॥ निर्वाही दीप कळिका ॥
ते कां होईल पुळिका ॥ कापुराचिया ॥ ५१ ॥ तया दोहोंपरस्परें ॥
होय ना जव मेल्हेरें ॥ तंव दोंहींचें हे सरे ॥ सरसेंची ॥ ५२ ॥ तेचि
देखे नामी ययातें ॥ तंव गेलें वंद्य वंदितें ॥ चेइलाया कांतें ॥ स्वप्नी
चि जेवीं ॥ ५३ ॥ किंबहुना इया भाषा ॥ द्वैताचा जेथें उ-
परवा ॥ फेडूनियां स्वसुखा ॥ श्रीगुरू वंदिला ॥ ५४ ॥ याच्या
सख्यांची नवाई ॥ आंगी येकपणा रूप नाहीं ॥ आणि गुरू शि-
शिष्यद्वुवालहीं ॥ पवाडू केला ॥ ५५ ॥ तैसा आपणया आपण ॥
दोवीण सोइरेपण ॥ हा याहूनि विलक्षण ॥ नाहींचि नोहे ॥ ५६ ॥
जग आघवे पोटमिाये ॥ गगना एव्हढे होउनी ठाये ॥ तेचि कीं सोहे
साहे ॥ नाहीपणाची ॥ ५७ ॥ कांपूर्ण तेतरी आधारू ॥ सिंधू जैसा
दुर्भरू ॥ तैसा विरुद्धा पाहुणेरु ॥ याचाघरीं ॥ ५८ ॥ ते जांत, मातें
कांहीं ॥ परस्परें निकें नाहीं ॥ परी सूर्याच्याठायीं ॥ सूर्यचि असे ॥ ५९॥
एक ह्मणतां भेदें ॥ तों कीं नानात्वे नांदे ॥ विरुद्धे आपणया विरुद्धें ॥
होतिल काई ॥ ६० ॥ ह्मणौनि शिष्य आणि गुरुनाथु ॥ या दोंहीं
शब्दाचा अर्थु ॥ श्रीगुरुचि परी होतु ॥ दोहोंठायीं ॥ ६१ ॥ कां

सुवर्ण आणि लेणें॥वसते एके सुवर्णें॥वसतें चंद्राचि चंद्र चांदिणें॥जेविं॥६२॥ नाना कापुर आणि परिमळू ॥ कापूरचि केवळू ॥ गोडी आणि गुळू ॥ गुळेंचि जेविं ॥ ६३ ॥ तैसा गुरुशिष्य मिसें ॥ हाचि एकु उल्हासें ॥ जऱ्हीं कांहीं दिसे ॥ दोनिपणें ॥ ६४ ॥ आरिसा आणि मुखीं ॥ मी दिसे हे उखी ॥ हे आपुलीये वोळखी ॥ जाणेमुख ॥ ६५ ॥ पा-हापां निरंजनी निदैला ॥ तो निर्विवाद एकला ॥ परी चेता चेवविता झाला ॥ दोनी तोचि ॥ ६६ ॥ जे तोचि चेता तोचि चेववी ॥ तेवि हाचि बुझे हाबुझावी ॥ गुरुशिष्यत्व नादंवी ॥ ऐसेनहा ॥ ६७ ॥ दर्पणेवीणडोळा ॥ आपुले भेटीचा सोहळा ॥ भोगिता तरीं लीळा ॥ सांगतों हें ॥ ६८ ॥ एवं द्वैतासि उमसों ॥ नेंदुनि ऐक्यासि विसकुसों ॥ सोइरिकेचा अतिसो ॥ पोखितसे ॥ ६९ ॥ निवृत्ति जया नांव ॥ नि-वृत्ति जया बख ॥ जया निवृत्तिची राणीव ॥ निवृत्तीची ॥ ७० ॥ वांचोनि प्रवृत्ती विरोधें ॥ कां निवृत्तिचेनि बोधें ॥ आणि जे तैसा वादें ॥ श्रीनिवृत्ति नव्हे ॥ ७१ ॥ आपणा देउनि राती ॥ दिवसा आणि उन्नति प्रवृत्तीवारी निवृत्ती ॥ नव्हे तैसा ॥ ७२ ॥ ओप सळेचें बळ ॥ घेउनी मिरवे कीळ ॥ तैसे रत्न नव्हे निखीळ चक्रवर्ती हा ॥ ७३ ॥ गगनही सुनि पोटीं ॥ जैं चंद्राचि पवळे पुष्टी ॥ तैं चां-दिणें तेणें उठी ॥ आंग जयाचें ॥ ७४ ॥ तैसें निवृत्तीपणासि कारण ॥ हाचि आपणया आपण ॥ घेयावया फुलचि जाले घ्राण ॥ आपुली द्वती ॥ ७५ ॥ दिठी मुखाचिये बरवे ॥ पाठीकडूनि जै पावे ॥ तैं आरिसे धांडोळावे ॥ लागती काई ॥ ७६ ॥ कीं राती हन गेलीयां ॥ दिवस हन पातलीयां ॥ काय सूर्यपण सूर्या ॥ हो आवे लागे ॥ ७७ ॥ ह्मणोनि बोध्य बोधोनि ॥ घेपे प्रमाणें साधोनी ॥ ऐसा नव्हे भरवसेनी ॥ गोसावी हा ॥ ७८ ॥ ऐसा करणयावीण ॥ स्वयंभाचि हें निवृत्तिपण ॥ तयाचे श्रीचरण ॥ वंदिले ऐसें ॥ ७९ ॥

असें श्रीगुरूस अभेद वंदन केलें. आतां श्रीगुरूच्या प्रणामे करून परादि वाचेचें ऋण फिटलें. याविषयीं ॥ ओंवी ॥ आतां ज्ञानदेवो ह्मणे ॥ श्रीगुरू प्रणामे येणें ॥ फेडिली वाचारुणें॥चौही वाचाचीं॥८०॥

**श्रीज्ञानदेव** ह्मणतात कीं श्रीगरू वंदनें करून चौही वाचेच्या ऋणा-पासून मुक्त झालो. वैखरीनें उपनिषदार्थ कथन केलें. ती तिची ऋण

मुक्तता–व पश्यंती सहित सर्व साक्षित्व ब्रह्म जाणऊन मग आपण नाहींसे होऊन वृत्ति शून्य साक्षात्कार करविला. हीं त्यांची ऋणमुक्तता होय. अशी चौवाचेचीं ऋणें सर्वोपाधिविनिर्मुक्त प्रत्यग् भिन्न ब्रह्म श्रीगुरू स्वरूप वर्णनें करून त्या परादिवाचेचें ऋण फेडलें, असें या प्रकरणांत आहे. आतां तृतीय प्रकरणांत द्वितीय प्रकरणीं जें चौ वाचेचें ऋण फेडिलें ह्मणून सांगितलें, परंतु तें पुरतें फिटलें नाहीं. ह्मणुनच तृतीय प्रकरणांत गत विषय घेणें भाग पडिलें. या प्रकरणास वाचा ऋण निरसन असें ह्मणतात. यांत श्रीज्ञानेश्वरानीं सत्यत्वें करून जेव्हां विचार केला तेव्हां त्याना असें वाटलें कीं जीव स्वरूप विस्मृतीनें मी देही असें ह्मणत होता त्या वेळेस परादि वाची जागृत होत्या; आणि जेव्हां श्रीगुरूचा प्रसाद झाला तेव्हां अज्ञानत्व जाऊन स्वात्मस्वरूपाची प्राप्ती झाली. तेथें अविद्याकृत ज्ञान आणि अज्ञान हीं दोन्हीं मावळलीं; व परादि वाचाही खुंटल्या. कारण स्वरूपावर, ज्ञान, अज्ञान, परादि वाचा, बंध आणि मोक्ष इत्यादि द्वैत मुळींच नाहीं. अविद्येचा जो जन्म तीच बंधाची उत्पत्ती, त्यासच अज्ञान असें ह्मणतात; आणि अविद्येचा जो मृत्यु त्यासच यथार्थ ज्ञान असें म्हणतात. वस्तुतः ज्या स्वरूपाचेठायीं अविद्येचें नांवच नाहीं तेथें अविद्याजननोद्भव बंध ह्मणजे अज्ञान कोठून असणार ? आतां जेथें बंधच नाहीं तेथें मोक्ष कशाचा ? तर बंधमोक्षाचा अज्ञानाचे घरीं उत्कर्ष आहे; आणि बंधमोक्ष हीं संज्ञा अज्ञानकृत् होय. असें बागूल बोवाच्या जन्ममरणापासून दुःख आणि सुख अज्ञान मुलास होतें, मोठ्या पुरुषास बागुलबोवाच जर नाहीं तर त्याचा जन्ममृत्यु तो कसा खरा मानील ? तसें बंधमोक्षाची प्रतिष्ठा अज्ञानाच्या घरीं होय. ती स्वरूपज्ञात्यास मुळींच नाहीं. कारण स्वात्मस्वरूप निराकार निरूपाधिक आहे त्याचे ठायीं अविद्या जननादि विकार नाहींत; असें उपनिषत् भाष्यकारानें वर्णन केलें आहे. आतां स्वरूपावर अविद्याच नाहीं तत्कार्य कोठून असणार ? जेथें वाचेचा लाग नाहीं तेथें वाचाऋण कसें राहील ? तात्पर्य स्वरूपावर वाचाऋणाचा मुळींच संबंध नाहीं. विचारेंकरून परादि वाचेच्या ऋणाचें निरसन होतें. ह्मणूनच वाचाऋण निरसन असें ह्मणतात ओंवी, अमृत अ० प्रकरण ३ रे ॥ जयाचेनि बोंभाटें ॥ आत्मयाची झोंप लाटे ॥

पूर्ण तऱ्ही ऋण नफीटे ॥ जेणेंचि नीदकीं ॥ १ ॥ येऱ्हवीं परादि गा चौघीं ॥ जीव मोक्षाचा उपेगीं ॥ अविद्ये सवें आंगीं ॥ वेचतीकीर ॥२॥ देहासवें हातपाये ॥ जाती मनासवे इंद्रियें ॥ कां सूर्यासवें जाय ॥ किरणजाळ ॥ ३ ॥ नातरी निद्रेचिये अवधी ॥ स्वप्नें मरती आधीं ॥ तेविं अविद्येचे संबधीं ॥ आरतीइया ॥ ४ ॥ मृतें लाहें होति ॥ तें रस रूपें जिती ॥ जळोनि इंधनें येतीं ॥ वन्हीदशें ॥ ५ ॥ लवणअगे विरें ॥ परी स्वादें जळीं उरे । निद्‌मरोनि जागरें ॥ जी इयेनिदें ॥६॥ तेविं अविद्ये सवें चौघी वेचति जिवें ॥ तत्व ज्ञानाचेनि नांवें ॥ उठती चियेया ॥ ७ ॥ हातत्व ज्ञान दिवा ॥ मरोनिइहीं लावावा ॥ तरी हाही सिणलेवा ॥ बोध्यरूपेचि ॥ ८ ॥ येउनि स्वप्नमेळवी ॥ गेलिया आपण पाहावी ॥ दोन्ही दिठी नांदवी ॥ निद जैसी ॥ ९ ॥ जिती अविद्या ऐसी ॥ अन्यथा बोधाते गिवसी ॥ तेचियथा बोधेसी ॥ निमाली उठी ॥१०॥ परिजितिनामेली ॥ अविद्याहेजाकळि॥बंधमोक्षघिाली॥वांधोनि ११॥ मोक्षुचि बंधु होये ॥ तरी मोक्ष शब्द कां साहे ॥ परी अज्ञाना घरीं त्रायें ॥ वाउगियाची ॥ १२ ॥ बागुलाचेंनि मरणें ॥ तोषावे कीं बाळ पणें ॥ येरा तो नाहीं मा कोणें ॥ मृत्यु मानावा ॥ १३ ॥ घटाचें नाहीं पण ॥ फुठलें याची नागवण ॥ मानीतसे ते जाण ॥ ह्मणो एकीं ॥ १४ ॥ ह्मणोनि बंधाचि तेवं वावो ॥ मामोक्षाकें प्रस्तावो ॥ पारि मरोनि केला ठावो ॥ अविद्या तया ॥ १५ ॥ आणि ज्ञान बंधू ऐसें ॥ शिवसूत्राचे निमिसें ॥ ह्मणितलें असें सदाशिवें ॥ १६ आणि वैकुंठीचे हिंसुजाणें ॥ ज्ञान पाशीं सत्वगुणें ॥ बांधिजे हें निरोपण ॥ बहूकेलें ॥ १७ ॥ परी शिवें कां श्रीवल्लभें ॥ बोलिले येणेचि लोभें ॥ मानू तें हें लाभें ॥ न बोलतां हीं ॥ १८ ॥ जें आत्मज्ञान निखळ ॥ तेंही हे ज्ञानाचें बळ ॥ तै सूर्यविंती सवळ ॥ तैसें नोहे ॥ १९ ॥ ज्ञानेंश्चावऱ्यतु आहे ॥ तै ज्ञानपण धाडिलें वायें ॥ दीप वांचोनि दिवा लाहें ॥ तैं आंग भुललाच कीं ॥ २० ॥ आपणचि आपणापाशीं ॥ नेणतां देशोदेशीं ॥ आपण पेगिवसीं ॥ हे कीरू होय ॥ २१ ॥ पारि बहुतां कां दिया ॥ आपणापे आठवलियां ॥ ह्मणे मी यया ॥ कैसा रिझो ॥ २२ ॥ तैसा ज्ञानरूप आत्मा ॥ ज्ञानेचि आपुली प्रभा ॥ करीतसे सोहंमा ॥ ऐसाबंधू ॥ २३ ॥ जें ज्ञानस्वयें बुडे ॥ ह्मणोनि भारी नावडे ॥ ज्ञानें मोक्षु घडे ॥ तो निमाले-

नि ॥ २४ ॥ ह्मणोनि परादिकाचा वाचा ॥ तो शृंगारू चौअंगाचा ॥ एवं अविद्या जीवाचा ॥ जीवत्वत्यागीं ॥ २५ ॥ अंगाचेन इंधनें उहासु ॥ उठोनि ज्ञानाग्नि प्रवेशु ॥ करी तेथें भस्मलेशु ॥ बोधाचाउरे ॥ २६ ॥ जळीं जळावेगळू ॥ कापूर न दिसे अवडळू ॥ परी होऊनि परिमळू ॥ उरे जेवि ॥ २७ ॥ आंगीं लाविलिया विभूति ॥ ते परिमाणू झडती ॥ परी पांडुरत्वे कांति ॥ राहे जैसी २८ ॥ नावो हळला आंगीं जैसें ॥ पाणी पाणीपणें नसें ॥ तरी वोल्हासाचे निमिसें ॥ अथीचतें ॥ २९ ॥ नातरी माध्यानकाळीं ॥ छाया न दिसे वेगळी ॥ असे पायातळीं ॥ रिगौनियां ॥ ३० ॥ तैसें ग्रासोनिदुसरें ॥ स्वरूपीं स्वरूपाकारें ॥ आपुलेपणें उरे ॥ बोध जोकां ॥ ३१ ॥ तें ऋण शेषवाचाइया ॥ न फेडवे मरोनियां तें पाया पडोनिमियां ॥ सोडविलें ॥ ३२ ॥ ह्मणोनि परा पश्यंती ॥ मध्यमाहन भारती ॥ यानिस्तरलिया लागती ॥ ज्ञानी आज्ञानीची ॥ ३३॥

असें तृतिय प्रकरणांत वाचा ऋणमोचन आहे. आतां चौथ्या प्रकरणांत श्रीज्ञानेश्वरानीं ज्ञानाचा आणि अज्ञानाचा अभेद सांगितला आहे. तो असा कीं अज्ञानाच्या मरणानें ज्ञानासही मृत्यु प्राप्त होतो. कारण अज्ञान पूर्वक ज्ञान स्फुरते. श्रीगुरूच्या कृपें करून मला ज्ञान झालें, या योगानें पूर्वी अज्ञान होतें. तें जाऊन आतां ज्ञान झालें असें सिद्ध होतें. म्हणून अज्ञान स्मरणेंसीसहित ज्ञानस्फूर्ती होय. जसा दिवस उगवला येणेंकरून रात्र होती ती गेली असें रात्रीचें स्मरण होतें. किंवा मी जागा झालों या योगानें पूर्वी निद्रिस्त होतो असें अर्थात होतें. रात्र किंवा निद्रा मुळींच नसती तर दिवस आणि जागृत या म्हणण्याचा व्यवहारच अगदीं खोटा होईल. म्हणून जो काल पर्यंत रात्र आणि निद्रा आहे, तो कालपर्यंत दिवस आणि जागृती आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं, तसें अज्ञान जों पर्यंत आहे तो पर्यंत ज्ञानाचाही व्यवहार. सत्य आहे. ज्या दिवशीं अज्ञानाचा होईल त्या दिवशीं ज्ञानही जाईल. म्हणून ज्ञानाचा आणि अज्ञानाचा अभेद आहे. अमृत अ० प्रकरण ४ थें, ओंवी०—

आतां अज्ञानाचे निमारे ॥ ज्ञान अभेदें वावरे ॥ निद सांडूनि जागरें ॥ नांदिजेजेवि ॥ १ ॥ कां दर्पणाचा निघाला ॥ ऐक्य बोधू पहिला ॥ मुख भोगी आपुला ॥ आपणाचि ॥ २ ॥ ज्ञान जिया तिया परी ॥ जगीं

आत्मैक्य करी ॥ तिया सुरिया स्वोचे सुरी ॥ तैसें झाले ॥ ३ ॥ लावि आंत ठाऊनि कोपटे ॥ तो साधी आपण या संकट ॥ कां बांधले या चोरटे ॥ मोठ माजी ॥ ४ –आगी पोतासाचे निमिसें ॥आपण पै जाळिले जैसे ॥ ज्ञाना ज्ञानेनाशे ॥ तैसे झाले ॥ ५ ॥ अज्ञानाचा टेका ॥ नसतां ही ज्ञान अधिका ॥ फाके जव उफका ॥ आपुला पडे ॥ ६ ॥ दशाहीते निमालियां ॥ येणे जेउ वायां ॥ ते केवळ नाशावया ॥ दिपाचे परी ॥ ७ ॥ उठणे कीं पडणे ॥ कुच भारा कोण जाणें ॥ कां फांकणे कीं सुकणे ॥ जाउळाचे ॥८॥ तरंगाचे रूपायेणें ॥ तयाचि नांव निमणें ॥ कां विद्रूचें उदैजणें ॥ तोचिअस्त ॥ ९ ॥ तैसें पीऊनि अज्ञान ॥ तववरी वाटे ज्ञान ॥ जंव आपुले निधन ॥ निःशेषसाधे ॥ १० ॥ जैसें कल्पांतींचें भरितें ॥ स्थळाजळा दोहींतें ॥ बुडविल्या आरौतें ॥ उरोंचि नेणें ॥११॥ कीं विश्वाही वेगळें ॥ वाटे जैसूर्य मंडळ ॥ तै तेजतम निखळ ॥ तेंचि होयि ॥ १२ ॥ नानानिद मारूती आपण पेंहिरोनी ॥ जागणें ठाके होउनी ॥ जागणेचि ॥ १३ ॥ तैसें अज्ञान अटोनियां ॥ ज्ञान येतें उवाया ॥ ज्ञानाज्ञान गिळोनियां ॥ ज्ञानाचि होये ॥ १४ ॥ तेव्हेळी पुनिवाभेंरं ॥ नां अवसांसरे ॥ तें चंद्रिचिउरें ॥ सतरावी जैसी ॥१५॥ कां तेजांतरें नाटोपे ॥ कोणे तमेन सिंपे ॥ ते उपमेचे जाउपें ॥ सूर्यचि होये ॥१६॥ ह्मणौनि ज्ञाने उजळें ॥ कां अज्ञानें रूळे । तैसें नव्हेनिर्वाळें ॥ ज्ञानमात्रजे ॥ १७ ॥ परिज्ञान मात्रें निखिळें ॥ तेंचिकीं तयासी कळे ॥ काइ देखिजे बुबुळें बुबुळांजेंवी ॥ १८ ॥ आकाशआपण यां रिघे ॥ काइ आंगीं आपणयां लागे ॥ आपुला माथां वळंघे॥ आपण कोण्ही ॥ १९ ॥ दिठी आपणयां देखे ॥ स्वाद आपण यां चाखे ॥ नादु आपुलें आइके ॥ नादपण ॥ २० ॥ सूर्य सूर्यासि विवळे ॥ कां फळ आपणयां फळे ॥ परिमळु परिमळें ॥ घेपत असे ॥ २१ ॥ तैसें आपणयां आपण ॥ जाणते नव्हे जाण ॥ ह्मणोनि ज्ञानपणे विण ॥ ज्ञान मात्रजें ॥ २२ ॥ असा ज्ञानाज्ञानाचा अभेद कथन केला; आणि ज्ञानाज्ञानाहून विलक्षण ज्ञान स्वरूप ब्रह्म आहे असेंही सांगितलें. आतां ब्रह्मसच्चिदानंद स्वरूप आहें, असें साधकास कळावयाकारतां सच्चिदानंद या पदत्रयाचें विवरण या पंचम प्रकरणांत केलें आहे. तें असें कीं सत्

चित् आणि आनंद या तीन पदें करून प्रतिपाद्य ब्रह्म एकच आहे. आतां सत् ( सत्य ) चित् ( ज्ञान ) आणि आनंद ( सुख ) या तीन पदांचा अर्थ वेगळा होत असतां तीन पदें करून एक ब्रह्म असें कसें होईल ? तर यांस उत्तर. अहो, या तीन पदाचा वाच्यार्थ वेगळा झाला परंतु लक्ष्यार्थ एकच आहे. तो असा कीं सताहून चित् वेगळें असें ह्मटलें तर चित् जें ज्ञान तें असत्य होईल, ज्ञानाहून सत् वेगळें असें मानलें तर सत् जड होईल; आणि आनंद सच्चिदाहून भिन्न मानल्यास आनंदास असत्यत्व व जडत्व प्राप्त होईल. ह्मणून सच्चित् आणि आनंद या पदत्रयें करून एक आनंदच होय. जसें कांती काठिण्य आणि कनक, या तीन पदे करून कनक एकच किंवा द्रवत्व, माधुर्य आणि अमृत यांहीं तीन पदें करून अमृत एकच तसें सच्चिदानंदपदत्रये करून आनंद एकच आहे म्हणून सच्चिदानंदही तीन एका ब्रह्माचीच नामें होय. दुसरे ब्रह्म नामरूपातीत असतां त्यासही नामे कशी तर ब्रह्मनामरूपातीतच आहे. परंतु साधकास बोध व्हावा म्हणून श्रुतींनीं असत्य, जड, दुःखात्मक् प्रपंचाच्चा व्यावृती करून ब्रह्मास ही तीन नामें दिली आहे असताच्या व्यावृत्तीनें सत् हें नाम होय जडाच्या-व्यावृत्तीनें चित् हें नाम होय; आणि दुःखाच्चा व्यावृत्तीनें आनंद नाम होय. सतादिकांचे प्रति योगी असतादिक् आहेत. असतादिकांच्या निरासे करून सतादिकांचा उत्कर्ष होतो. जर असतादिक् नसतें तर सतादिक् हीं नामेंच नसतीं. आतां सत्यत्वें करून विचार केला असतां ब्रह्म अनुयोगी प्रतियोगी शद्बातीत आहे. असें बहुत प्रकारें सच्चिदानंद पदांच वर्णन केलं आहे. अमृत अनुभव—प्रकरण ५ वे —ओ० सता प्रकाश सुख ॥ याति हीं तिहीं उणे लेख ॥ जैसे विषपणेचि विख ॥ विखा नाहीं ॥ १ ॥ कांति काठिण्य कनक ॥ तिन्ही मिळोनी कनक एक ॥ द्राव गोडी पियूख ॥ पियूखचि जेवीं ॥ २ ॥ उजाळ द्वती मार्दव ॥ यातिहींचि तिहीं उणीव ॥ हे देखिजे सावेव ॥ कापुरीं एके ॥ ३ ॥ आंगे कीर उजाळ ॥ कीं उजाळ तोचि मवाळ ॥ कीं दोन्हीं ना परिमळ ॥ मात्र जे ॥ ४ ॥ ऐसे एके कापुरपणीं ॥ तिन्हीं इये तिहीं उणीं ॥ इयापारे आटणीं सत्तादिकांची ॥ ५ ॥ येऱ्हवी सच्चिदानंद भेदे ॥ चालिलीं तिन्हींपदे ॥ परी तिन्ही उणी आनंदे ॥

केली येणें ॥ ६ ॥ सत्ताचिकीं प्रकाशु ॥ प्रकाशुचि सत्ता उल्हासु ॥ हे न निवडे मिठांशु ॥ अमृते जोवें ॥ ७ ॥ शुक्लपक्षींचे सोळा ॥ दिवसा वाढती कळा ॥ परी चंद्र मात्र सगळा ॥ चंद्री जेवी ॥ ८ ॥ थेंबीं पडतां उदक ॥ थेंबा धरू येलेख ॥ परि पाडिलाठायीं उदक ॥ वांचूनि आहे ॥ ९ ॥ तैसें असताचिया व्यावृत्ती ॥ सत्त ह्मणों आलें श्रुती ॥ जडाचिया समाप्ती ॥ चिद्रूप ऐसें ॥ १० ॥ दुःखाचेनि सर्व-नाशें ॥ उरले तें सुख ऐसें ॥ निगदिलें निश्वासें ॥ प्रभुचेनि ॥ ११ ॥ ऐसें सदादि प्रतियोगियें ॥ असदादि तिन्हीयें ॥ लोटितां जालीं त्रायें सत्तादिका ॥ १२ ॥ एवं सच्चिदानंदु ॥ आत्मा हा ऐसा शब्दु ॥ अन्य व्यावृत्ति सिद्धु ॥ परी वाचक नव्हे ॥ १३ ॥ सूर्याचेनि प्रकाशें ॥ जे कांहि जड अभासे ॥ तयातें तो गिवसे ॥ सूर्यकाई ॥ १४ ॥ तेविं जेणें ते जें ॥ वाचेसि वाच्य सुजे ॥ ते वाचा प्रकाशिजे ॥ हे कें आहे ॥ १५ ॥ विषो नाहीं कोण्हाही ॥ जया प्रमेयत्वचि नाहीं ॥ तया स्वप्रकाशा काई ॥ प्रमाण होये ॥ १६ ॥ प्रमेय परिछेदें ॥ प्रमाणत्वें नांदे ॥ काइस्वतासिद्धें ॥ वस्तुच्याठायीं ॥ १७ ॥ एवं वस्तूसी जाणो जातां ॥ जाणणेचि वस्तू तत्वता ॥ मग जाणते आणि जाणतां ॥ कैंचा उरे ॥ १८ ॥ह्मणोनि सच्चित्सुख ॥ हे बोल वस्तु वाचक ॥ नव्हती हे शेष ॥ विचाराचें ॥ १९ ॥ ऐसें न इयें प्रसिद्धें ॥ चालिली सच्चिदानंद पदें ॥ मग द्रष्टया स्वसंवादें ॥ भेटती जेव्हां ॥२०॥ तेव्हेळीं वरषोनि मेघु ॥ समुद्र होउनि वोघु ॥सरे दाउनि मागु ॥ राहे जैसा॥२१॥फळ विऊनि फुल सुके ॥फळ नाशे रसपाकें ॥ तोही रस उफके ॥ तृप्तिदानीं॥ २२ कां आहुति आग्निआंत ॥ घालुनि वोसरे हात॥ सुख चेवऊनिगीत ॥ उगा राहे॥२३॥ नाना मुखामुख दाउनि ॥ आरिसा जाय निगौनी ॥ कां निदलें चेवऊनि ॥ चेववितें जैसें ॥ २४॥ तैसें सच्चिदानंद चोखटा ॥ दाऊनि द्रष्टयाद्रष्टा ॥ तिन्ही पदें लागती वाटा ॥ मौनाचिया ॥२५॥ जें जें बोलिजें तें तें नव्हें ॥ होय तें तंव न बोलवें ॥ साउली वारि न मवें ॥ मवितें जैसें ॥ २६ ॥ मग आपुलियाकडे ॥ मवि तया जे सांपडे ॥तैं लाजला जो आखुडे ॥ मविता जैसा ॥ २७ ॥ सत्ताचि स्वभावें ॥ असत्ता तंव नव्हे ॥ मां सत्तत्व संभवें ॥ सत्तेसिकाई ॥ २८ ॥ आणि अचिदाचेंनि नाशें आलें जें चि-

न्मात्रदर्शें ॥ आतां चिन्मात्राचि मा कैसें ॥ चिन्मात्रीं यें ॥ २९ ॥ निद प्रबोधाच्याठाईं ॥ नसे तैसें जागणेंही ॥ तेविं चिन्मात्रचि माकाईं ॥ चिन्मात्री ये ॥ ३० ॥ ऐसें यया सुखपणें ॥ नाहीं कीरु दुःख होणें मा सुख हें गणनें ॥ सुखासिकाईं ॥ ३१ ॥ ह्मणोनि सदसदत्वे व गेलें ॥ चिद चिदत्वें मावळलें ॥ सुखासुख ज्ञालें कांहीं नाकां ॥ ३२ ॥ आतां द्वंद्वाचेंलवंचक ॥ सांडुनि दुणींचें कंचूक ॥ सुखमात्राचि एक ॥ स्वयें आथी ॥ ३३ ॥ वरि एकपणें गणिजे ॥ ते गणितेंनसीये दुजें ॥ ह्मणोनि हे न गणिजे ॥ ऐसें एक ॥ ३४ ॥ सुखा आतोनि निघणें ॥ ते सुखियें सुखीं तेणें ॥ हे सुख मात्रचि मां कोणें ॥ अनुभवावें ॥ ३५ ॥

असे सच्चिदानंद पदार्चे विवरण बहुत रीतीनें केलें आहे. आतां सहाव्या प्रकरणांत आत्मा स्वयं प्रकाश आहे. तो शद्बें करून प्रकाशीत होत नाहीं. ह्मणून स्वरूपाचेठायीं शद्बाचें खंडण होय. या प्रकरणास शद्ब खंडण असें म्हणतात. यांत श्रीज्ञानेश्वरानीं प्रथम शद्बाची प्रतिष्ठा वर्णन केली आहे. ज्या तुरीय भूमीचेठायीं अहंब्रह्मास्मि ह्मणून सर्व साक्षित्वे करून आत्मानुसंधान घडतें, त्या वर्णात्मक शद्बास परानाद असें ह्मणतात. तो शद्ब निरवयव असून सच्चिदानंद जो आत्मा त्यास दाखवण्याकरितां दर्पणच होय. जो शद्ब आपण निराकार असून जगत्रयांतील जितक्या साकार वस्तू आहेत तितक्या वस्तुस तें हें अमूक ह्मणून जाणवितो, जो शद्ब वेदोक्त विधीनिषेधाचे मार्ग दाखऊन हा बंध आणि हा मोक्ष असें समजवितो. शुद्ध निर्मल शिवाचेंठायीं अहंब्रह्म असा शद्ब उत्पन्न झाला. ह्मणून शद्ब हा शिवाचा पुत्र होय. परंतु त्या शिवाचेंठायीं मी देही जीव आहें. या शद्बें करूनच जीवत्व स्थापन करितो किंबहुना काय सांगावें कीं तें जीवत्व श्रीगुरूच्या तत्वमस्यादि शद्बे करूनच नष्ट होतें. तस्मात् शद्बाची प्रतिष्टा अवर्णनींय आहे. आतां त्या शद्बच्या स्वरूपावर मुळींच उपयोग नाहीं. कारण आत्मा स्वयं प्रकाश आहे. तो मी जीव आहें या शद्बें करून त्याचें आत्मत्व भ्रष्ट होत नाहीं. आणि मी ब्रह्म आहें या शद्बे करून त्यास आत्मत्व येत नाहीं. आत्मा अनादी, अव्यय, जसाचा तसाच आहे. त्याचेठायीं शद्ब उपयुक्त नव्हे. आत्मा स्वसंवेद्य आहे. आणि शद्ब अविद्याकृत आहे.

आतां अविद्या जर मिथ्या आहे तर शद्ब कोठून सत्य असणार ? ह्मणून स्वरूपावर शद्बाचें खंडण होतें. अमृत० प्रकरण ६ वे–ओंवी—बाप उपेगीवस्तु शब्दु ॥ स्मरणदानी प्रसिध्दु ॥ अमूर्तांचा विशदु ॥ अरिसा नव्हे ॥ १ ॥ पाहते आरिसां पाहे ॥ येथें कांहींच नवल नव्हे ॥ परी दर्पणे येणे होये ॥ न पाहतें पाहते ॥ २ ॥ वडिल अव्यक्ताचिया वंशा ॥ उद्योतकार सूर्य जैसा ॥ येणें एके गुणे आकाशा ॥ अंबरत्व ॥ ३ ॥ आपण तरी खपुष्य ॥ परि फळ दे जगद्रूप ॥ शद्बमविते आमुप ॥ कोण आहे ॥ ४ ॥ विधीनिषेधाचिया वाटा॥ दाविता हाचि दिवटा ॥ बंध मोक्ष कळिकटा ॥ शिष्ट हाचि ॥ ५ ॥ हा अविद्येचिया आंगी पडे ॥ तैं नाथिले ऐसे रूढे ॥ न ल्हाइजे तिन कधडे ॥ साचावस्तु ॥ ६ ॥ शुद्ध शिवाच्या शरिरीं ॥ कुमारु हाचि जि उभरी ॥ जेवि आंगे पंचाक्षरी ॥ तोवीचि बोलू ॥ ७ ॥ जीवदेहे बांधला ॥ तो बोले एके सुटला ॥ आत्मा बोले भेटला ॥ आपणयां ॥ ८ ॥ दिवदातें उगो गेला ॥ तव रात्रीचा द्रोहो आला । ह्मणोनि सूर्या या बोला ॥ उपमा नव्हेची ॥ ९ ॥ जे प्रवृत्ती आणि निवृत्ती ॥ विरुद्ध इया हातु धरिती ॥ मग शद्बेंचि चालती ॥ एकलेनि ॥ १० ॥ सहाय आत्मविद्येचें ॥ करावया आपण वेचे ॥ गोमटे काय शद्बाचे ॥ एकैक वानु ॥ ११ ॥ किंबहुना शब्दु ॥ स्मरणदानी प्रसिध्दु ॥ परि तयांही समंधु ॥ नाहीं येथें ॥ १२ ॥ आत्म या बोलाचें ॥ कांहीं उपयोगा नवचे ॥ स्वसंवेद्या कोणाचे ॥ ओझे आथी ॥ १३ ॥ आठवे कां विसरे विषो होऊनि अवतरे ॥ तरि वस्तुसि वस्तु दुसरे ॥ असेंनाकीं ॥ १४ ॥ आपण आपण यातें ॥ आठवि विसरे केउतें ॥ कायजिभी जिभेतें ॥ चाखे न चाखे ॥ १५ ॥ जागणें या निद नाहीं ॥ मां जागणे घडे काई ॥ स्मरणास्मरण दोन्हींही ॥ स्वरूपिं तैसी ॥ १६ ॥ सूर्यों रात्रीं पानेणे ॥ मा दिवो काय जाणें ॥ तेवि स्मरणास्मरणें ॥ आपण वस्तु ॥ १७ ॥ एवं स्मरणा स्मरण नाहीं ॥ तरी स्मारकें काज काई ॥ ह्मणोनि इयेठाई ॥ बोलु नसरे १८ आणिक एक शब्दें ॥ काज कीरू भलें साधे ॥ परिधिवसा न बंधे ॥ विचारू येथें ॥ १९ ॥ कां जें बोलें अविद्या नासे ॥ मग आत्मेन आत्मा भासे ॥ ह्मणत खेव पिसे ॥ आलेचि कीं ॥ २० ॥ सूर्यो रात्रीपा मारील ॥ मां आपण यां उदो करील ॥ हें कुडे न सरती बोल ॥ सा-

चाचां गांवि ॥ २१ ॥ असे बहुत रीतीनें शब्दाचें खंडण केलें आहे. आतां या सातव्या प्रकरणीं श्रीज्ञानेश्वरानीं अज्ञानाचें खंडण केलें आहे. तें असें कीं या जगतांत अज्ञान ह्मणून मुळींच नाहीं अज्ञानाची प्रतिष्ठा विचारापूर्वीं असते. विचार केल्यास अज्ञान कोठेंच सांपडत नाहीं. तर जसे स्वप्नाचें महात्म्य स्वप्नामध्यें किंवा रात्रीचें महात्म्य रात्रीमध्यें तसेंच अज्ञानाचें महात्म्य अज्ञानामध्येंच होय. असें अज्ञान स्वरूपाचे ठायीं आहे असें जर ह्मणावें तर आत्माज्ञान स्वरूप आहे. त्याचे ठायीं अज्ञान मुळींच राहणार नाहीं; आणि जरी आहे म्हणावे तरी त्याचें कार्य ही दिसत नाहीं. म्हणून तें नाहींच असें म्हटलें पाहिजे. अज्ञान म्हणजे त्यानें स्वतः आपणास जाणू नये, आणि दुसऱ्या पदार्थासहीं जाणू नयें, यां नांव अज्ञान— आतां अज्ञानी पुरूष "**अहं मां न जानामि**" मी मजप्रत जाणत नाहीं, असें म्हणतो तरी हें बोलणें ज्ञानाचेंच होय. कारण ज्ञानावाचून असें भाषणच व्हावयाचें नाहीं. म्हणून हें अज्ञानाचे खरें रूपच नव्हे. जसें जड पदार्थ आपल्याला जाणत नाहीं आणि दुसऱ्याला ही जाणत नाहीं. तद्वत् अज्ञान हीं कांहींच जाणत नाहीं; व अज्ञानी सर्व दृश्य विषयांप्रत जाणतो, म्हणून अज्ञान नाहींच यांत संशय नाहीं. बरें यां जगतांत अज्ञान आहें असें म्हणावें तर जगत् चिन्मात्र आहें, तेथें तरी अज्ञान कसें राहील? एवंच विचार केला असतां अज्ञान नाहीं असें स्पष्ट होतें, अमृत अनु० प्रकरण ७ वें—ओंवी—येऱ्हवीं तऱ्हीं अज्ञाना ॥ जैं ज्ञानाचि नसे क्षोभना ॥ तैं तंऽहि काना ॥ खालिचि दडे ॥ १ ॥ आडसूनि आंधारीं ॥ खद्योत दिसी झीरमिरि ॥ तैसें लटिकें वरि ॥ आनादि होये ॥ २ ॥ जैसि स्वप्नीं स्वप्न महिमां ॥ तमीं मानु असे तमां ॥ तेवि अज्ञाना गरीमां ॥ अज्ञानीची ॥ ३ ॥ कोल्हेरीचे वारु ॥ न येती धारकीं धरूं ॥ नये लेणा शृंगारू ॥ वोडंबरिचा ॥ ४ ॥ हे जाणण याच्या घरीं ॥ खोंचिलें हीं आन नकरी ॥ कइ चांदीणां उठे लहरी ॥ मृग जळाची ॥ ५ ॥ आणि ज्ञान हें जें म्हणिजे ॥ तें अज्ञानचिपादुजें ॥ एक लपऊनि दाविजे ॥ ऐका जैसें ॥ ६ ॥ असो आतां हा प्रस्तावो ॥ आधीं अज्ञानाचा धांडोळा घेवों ॥ मग तयाचा साची लाहों ॥ ज्ञान ही लटिकें ॥ ७ ॥ या इअज्ञातज्ञा ॥

आधीष्टुनी जरी असें जीतें ॥ जेथें असें तयातें ॥ नेण कां न करी ॥८॥ अज्ञानें जेथें असावें ॥ तेणें सर्व नेण हो आवें ॥ ऐसि जाति स्वभावें ॥ अज्ञानाची ॥ ९ ॥ तरि शास्त्र मत ऐसें ॥ जे आत्मीच अज्ञान असें ॥ आणि तेणें तो गिवसे ॥ आश्रो जरि ॥ १० ॥ तरि नुठितां दुजे ॥ अज्ञान असें विजें ॥ तें ताचि आथी हें बुझें ॥ कोण येथें ॥ ११ ॥ अज्ञान तंव आपण यांतें ॥ जडपणें नेणें निरुतें ॥ आणि प्रमाण प्रमाणातें ॥ होत आहे ॥ १२ ॥ यालागी जरी अज्ञान ॥ करील आपुलें ज्ञान ॥ हं ह्मणत खेव घेववी मौन ॥ विरोधुचे ॥ १३ ॥ आणि जाणतां वस्तु एक ॥ येणें अज्ञानें केला मूर्ख ॥ तैं अज्ञान हे लेख ॥ कवण धरी ॥ १४ ॥ अहो आपण याहीं पुरता ॥ नेणुन करवें माणतां ॥ तया अज्ञान ह्मणतां ॥ लाजिजे कीं ॥ १५ ॥ आभाळें भानु ग्रासें ॥ तैं आभाळ कोणें प्रकाशे ॥ सुषुप्ति सुषुप्तेया रुसें ॥ तैं तोचि कोणा ॥ १६ ॥ तैसें अज्ञान असें जर्थे ॥ तेच जरि अज्ञान आतें ॥ तरी अज्ञान अज्ञानातें ॥ नेणतां गेलें ॥ १७ ॥ नातरी अज्ञान एक बडे ॥ हें जयास्तव निवडे ॥ ते अज्ञान नव्हे फुडें ॥ कोण्हेंकाळीं॥१८॥ पडळही आथी डोळां ॥ आणि डोळानव्हे आंधळा ॥ तारि आथि यया पोकळा ॥ बोलियाकीं ॥ १९ ॥ इंधनाचा आंगी ॥ खवळले न आगी॥ तेनजळे तरि वाउगी ॥ शक्तिचिते ॥ २० ॥ आंधारु कोंडोनि घरी ॥ घरा पडसाई नकरी ॥ तैं आंधारु इहीं अक्षरीं ॥ नह्मणावा कीं ॥२१॥ वो जावो नींदि जागणें ॥ तिये नीदेतें निद कोण ह्मणें ॥ दिवसाना आणि उणें ॥ तै रात्रि कैचि ॥ २२ ॥ तैसा आत्मा अज्ञान असिकें ॥ असतां तो नमुके ॥ तैं अज्ञान शद्वा लाटकें ॥ आलेंचि कीं ॥ २३ ॥ ये-ह्वीं तऱ्हीं आत्मया ॥ माजी अज्ञान असावया ॥ कारण ह्मणतां न्याया ॥ चुकी येईल कीं ॥ २४ ॥ असें बहुत प्रकारें अज्ञानाचें खंडण केलें. आतां या आठव्या प्रकरणांत ज्ञानाचेंहीं खंडण केलें. तें असें कीं अज्ञानाचें नाशन करणें हें कार्य ज्ञानाचें होय. असें कार्य झाल्यावर ( अज्ञान नाशन झाल्यावर ) ज्ञानाचें ही ज्ञानत्व जातें. जसा कोणी एक पुरुष निद्रेला धरण्याकरितां टपून बसला, त्यावेळेस जागृती होतें असें टपून बसला या योगानें कळतें. अर्थात निद्रा तर नाहींशीच झाली, इतकच नाहीं तर जागणेंही तिच्या बरोबर मावळलें.

ह्मणजे मी जागा आहें असें स्मरण राहिलें नाहीं. तद्वत् विचार केला असतां अज्ञानाचा तर नाशच झाला; आणि त्याजबरोबर ज्ञानाचाही झाला; ह्मणजे मी ज्ञानी आहें असें स्मरण राहिलें नाहीं. असो, अज्ञान निवर्तक ज्ञान आणि ज्ञानाचें प्रतियोगी अज्ञान या दोघाचाही संबंध स्वरूपावर नाहीं. स्वरूप ज्ञानाज्ञानाहून विलक्षण ज्ञानस्वरूप आहे, ह्मणून तेथें अज्ञान निवर्तक ज्ञानाचा उपयोग कांहीं नाहीं. अमृत अनु० प्रकरण ८ वे० ओंवी—तैसें आमुचेंनि नांवें ॥ अज्ञानामें ज्ञानही नव्हे ॥ आह्मालागी गुरुदेवें ॥ आह्मीच केलों ॥ १ ॥ परि आम्हा आम्ही आहों ॥ तें कैसें पाहों जावों ॥ परि काय कीजे हा ठावों ॥ लाजिजे ऐसा ॥ २ ॥ हा ठावो वऱ्ही गुरुरायें ॥ नांदविलो उवायें ॥ जे आम्हीं नसमायें ॥ आम्हा मांजी ॥ ३ ॥ अहो आत्मपणीं न संटों ॥ स्वसंविती न घसवटों ॥ आंगीं लागलें न फुटों ॥ कैवल्यहीं ॥ ४ ॥ आमुचि करवे गोठी ॥ ते जालीच नाहीं वागशृष्टी ॥ आमुतें देखे दिठी ॥ ते दिठीच नव्हे ॥ ५ ॥ आमुतें करुनि विखो ॥ भोगुं शके पारखो ॥ तैं आमुतें न देखों ॥ आम्हीपणां ॥ ६ ॥ प्रकटों लपों न लाहों येथें नाहीं नवलाहें ॥ परि कैसेंनहीं विपावों ॥ असणें याचा ॥ ७ ॥ किंबहुना श्रीनिवृत्ति ॥ ठेविलों असों जये स्थिति ॥ ते काय देउं हातीं ॥ वाचेचिया ॥ ८ ॥ तेथें समोर व्हावया ॥ अज्ञानाचा पाडूकासया ॥ केउतें मेळियां माया ॥ होउं पाहिजे ॥ ९ ॥ अज्ञानाचा प्रवर्तु ॥ नाहीं जया गांवां आंतु ॥ तेथें ज्ञानाची तऱ्हीं मातु ॥ कोण जाणें ॥ १० ॥ रात्रि म्हणोनि दिवे ॥ पडति किं लावावे ॥ वांचूनि सूर्या सवें ॥ सिणणें होये ॥ ११ ॥ म्हणोनि अज्ञान नाहीं ॥ तेथेंचि गेलें ज्ञानही ॥ आतां निमिषोन्मेषा दोहीं ॥ ठेली वाट ॥ १२ ॥ येऱ्हावि तऱ्ही ज्ञान अज्ञानें ॥ दोहींची अभिधानें ॥ अर्थाचेंनि अनानें ॥ उपलविलीं ॥ १३ ॥ जैसी दंपतें परस्परें ॥ तोडूनि पालठिलीं शिरें ॥ पालटु नाहीं पण सरें ॥ दोहींचें जिणें ॥ १४ ॥ कां पार्था लाविला होये ॥ तो दिपुचि वाथां जाये ॥ दिठीं अंधारें पाहें ॥ तै तेचि वृथा ॥ १५ ॥ तैसें निपटू नेणिजे ॥ तें ज्ञान शब्दें बोलिजे ॥ आतां सर्वहीं जेणें सुजे ॥ तें अज्ञान कैसें ॥ १६ ॥ ऐसें ज्ञानीं अज्ञान आलें ॥ अज्ञानी ज्ञान गेलें ॥ हें दोन्हीं वाझोलें ॥ मिळुनि जाली ॥ १७ ॥ जाणें तेचि नेणें ॥ नेणें तोचि जाणें ॥ आतां कें असणें ॥

ज्ञानाज्ञाना ||१८|| एवं ज्ञानाज्ञान दोन्हीं || इये पोटीमूनि अहाणी ||
उदेला चिद्गगनीं || चिदाइित्यु हा ||१९|| असें ज्ञानाचेंही खंडन केलें.
आतां या नवव्या प्रकरणीं ज्ञानाज्ञानाहून भिन्न जें आत्मस्वरूप तें जा-
णल्यावर जीवन्मुक्ति दशा प्राप्त होते, ती अशी कीं, " **सर्वं खल्विदं
ब्रम्ह " नेहनानास्ति किंचन " आत्मैवेदं सर्वं ब्रम्हैवेद "**
इत्यादि श्रुत्यन्व यानें सर्व विश्व ब्रम्हरूपच होतें. येथें भोक्ता, भोग्य
आणि भोग, कर्ता, कर्म आणि कार्य, ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय, ध्याता
ध्यान आणि ध्येय, इत्यादि त्रिपुटी स्वरूप सिद्ध पुरुषास राहत नाहीं.
जो सकल जगत् ब्रह्म आणि स्वयं ब्रम्हरूप झाला त्यास कोणचें कां-
हींच कार्य उरले नाहीं. यासच जीवन्मुक्तिदशा असें म्हणतात.
अमृत अनु० प्रकरण ९ वे—ओंवी || आतां अमोद सुनास जाले ||
श्रुतिस श्रवण निघाले || आरिसे उठिले || लोचनेंसी ||१|| आपुलेनि
समरपणे || वेल्हावती विजणे || कीं माथेचि चाचपणे || बहकताती||२||
जिव्हां लोधली रसे || कमळ सूर्यपणे विकशे || चकोरेचि जैसे ||
चंद्रमा जालिं ||३|| फुलेंचिं जालिं भ्रमर || तरुणीच जाले नर || जाले
आपुले सेजार || निद्राळुची || ४ || दिठिचि या बरवा || नानारूपा-
चीया ठेवा || घडिला कां कोरिवां || परि जैसा || ५ || तैसें भोग्य
आणि भोक्ता || दिसे आणि देखता|| हें सरलें अद्वैता||अफुटा माजी||६
सेंवर्तेपणा बाहेरी || न निगताचि परी || पाति सहस्त्रवरी|| उपलवि-
जे || ७ || तैसें नाना अनुभवीं || वाजतां वाधावीं || अक्रियेच्या
गांवीं || नेणिजे तें || ८ || म्हणोनि विषयाचेनि नांवें || सूनि इंद्रियां-
चे थवें || सैंव घेती धावें || समोरहीं || ९ || परि अरिसासिवेंसिवें ||
तंव दिठीसी दिठी फावे || तैसें जाले धावें || वृत्तिचिया || १० || नाग
मुदी कंकण || त्रिलिंगी भेदली खूण || घेतां तरी सुवर्ण||घेइजे कीं||११
वेचूनि आणू कल्लोळ || म्हणोनि घापे करतळ || तेथें तरी निखळ ||
पाणिच फांके || १२ || हातापासीं स्पर्शु || डोळ्यापासी रूपसु || जि-
भेंपासीं भिठांशु || कोण्हीं येका || १३ || तऱ्ही परिमळा परौते ||
देखणें नाहीं कापुरातें || तैसें बहुतापरी स्फुरतें || तोंचि स्फुरे || १४ ||
म्हणोनि शब्दादि पदार्थ || श्रोत्रादिकाचे हातें || घ्यावया जेथें || उजु
होती || १५ || तेथें समंध होय न होयें || तंव इंद्रियांचें तें नोहें || मग

असताचि आहे ॥ समंधुना ॥ १६ ॥ जिये परी दिसती उसी ॥ तियें लाभती कीं रसीं ॥ कां कळा निवडती शशी ॥ पुनिवेचिया ॥ १७ ॥ पाडिलें चांदावरी चांदिणें ॥ समुद्रीं जालें वरखणें ॥ विषया करणें ॥ भेटती तैसी ॥ १८ ॥ म्हणोनि तोंडा आडपडे ॥ तेंहिवाचा वावडे ॥ परि समाधी न मोडे ॥ मौन मुद्रेचि ॥ १९ ॥ असें बहूत जीवन्मुक्त दशेचें विवरण केलें. आतां या दहाव्या प्रकरणांत ग्रंथाचा महिमा वर्णन केला आहे. हा अमृत अनुभवाख्य ग्रंथ अद्वैत ज्ञान प्राप्तीचें द्वारच होय. श्रीज्ञानेश्वरानी दहांहीं उपनिषदांचा सारांश या दहा प्रकरणांत आणिला आहे. किंबहुना अमृत अनुभवाच्या शब्दा पुढें उपनिषदांचें एक हीं पाऊल पडावयाचे नाहीं. हा श्रीगुरू निवृत्तीच्या प्रसादे करून अद्वैत ज्ञान भरित ग्रंथ पूर्णतेप्रत पावला. अमृत अनु० प्रकरण १० वे ओंवी० परिगाश्री निवृत्तिराया ॥ हातातळीं सुख दिधले- ले तुयां॥ परिनिवांताचि मियां॥ भोगावे की ते ॥१॥ परि महेशे सूर्या हातीं ॥दिधली ते जाची सुति॥ तया भासा अंतर्वार्ति ॥ जगेंचि केले ॥२॥ चंद्रासि अमृत घातलें॥तें तयाचि काइये तुले ॥ किं सिंधु मेघा दिधलें ॥ मेघाचि भागु॥३॥दिवां जो उजिवडु॥तो घरांचाचि सुरवाडू॥गगनीं आ- थिपवाडू ॥ जगाचाचि कीं ॥४॥ अगाधे हीं उचंबळति ॥ त चंद्राची ना शक्ती॥ वसंत करी तैं होती ॥ झाडाचे दानी॥५॥ म्हणोनि हे असंवर्य॥ हे देवीकेचे औदार्य॥वाचूनि स्वांततर्य॥माझे नाहीं ॥६॥ आणि हा येव्ह- ढा ऐसा॥परिहार देऊं कायसा ॥ प्रभूप्रभाविन्यासा ॥ आड ठाउनि ॥७॥ आम्ही बोलिलो जे जे कांहीं॥ ते प्रगटेचि असे ठाईं ॥ मास्वयं प्रकाशा काई॥प्रकाशावे बोले ॥ ८ ॥ नाना विषाये आह्मीहन ॥ कीजे ते पां मौन॥तरी काय जनी जन॥दिसते ना॥९॥जनाते जनांत देखतां॥ दृष्टेचिदृश्य तत्वता ॥ कोण्ही नहोनि आइता ॥ सिद्धांताचिहा ॥१०॥ यया परौते कांहीं ॥ सच्चिद्रहस्य नाहीं ॥ आणि हें तया आधिहीं ॥ असतचि असे ॥११॥ तऱ्ही ग्रंथ प्रस्तावो ॥ नघडे हे म्हणोपावो । तरी सिद्धा- नुवाद लाहो ॥ आवडीकरूं ॥१२॥ पढियंते सदातेचि ॥ परी भोगीं न विनवी रुचि ॥ म्हणोनि हाउचितुचि ॥ अनुवादु सिद्धु ॥ १३ ॥ या कारणे मियां ॥ गोप्य दाविले बोलोनियां ॥ ऐसे नाहीं आपैसया ॥ प्र- काशुचि ॥ १४ ॥ आणि पूर्णाहंतावेठलो ॥ सैघ आम्हींच दाटलो ॥

माल्लोपलो नाप्रगटलो ॥ कोण्हां होउनि ॥१५॥ आपणया आपण पे ॥ निरोपण काय वोपे ॥ मा उगेपणे हारपे॥ऐसे आहे ॥१६॥ म्हणो- नि माझी वैखरी ॥ मौनाचें ही मौन करी ॥ हे पाणि यावरी मकरी राखिलीया ॥ १७ ॥ एवं दशोप निषदे ॥ पुढारी न ढळती पदें ॥ देखोनि बुडिबोधे ॥ येथाचि दिघली ॥ १८ ॥ ज्ञानदेव म्हणे श्रीमंत हें अनुभवामृत ॥ सउनि जीवन्मुक्त ॥ हेचि होतु १९ ॥ मुक्ति कीर वेल्हाळ ॥ ॥ अनुभवामृत निखिल ॥ परी अमृताही उठिलाळ ॥ अमृतें येणें ॥ २० ॥ निशीं चांदु होये ॥ परिपुनिवे आनु आहे ॥ हें कांमि म्हणों लाहें ॥ सूर्य दिठि ॥ २१ ॥ प्रिया सावाइलें होये ॥ तें आंगीचे आंगी नसमाय ॥ येन्हवीं तेथेंचि आहे ॥ तारूण्य किं ॥ २२ ॥ वसंताचा आला फळिफुलीं आपुला ॥ गगनाचिया डाळा॥ पेलती सांडें ॥ २३ ॥ ययालागीं हें बोलणें ॥ अनुभवांमृतपणानें ॥ स्वानुभूतींपरिगु- णें ॥ वोगरिलें ॥ २४ ॥ आणि मुक्तमुमुक्षूबद्धे ॥ हे तववरी योग्यता भेदें ॥ अनुभवामृतस्वादें ॥ विरूध्येंजवं ॥ २५ ॥ गंगावगहनाआलीं ॥ पाणियें गंगाजाली ॥ कांतिमिरेभेटली ॥ सूर्याजैसिं ॥ २६ ॥ नांहिपरि- साचिकसवटीं ॥ तवंवरीचवानियाच्या गोष्ठी ॥ मग पंधरावयाच्यापाठीं॥ बैसावेंकीं ॥२७ ॥ तैसें जेयांअक्षरां ॥ भेटतींगाभारां ॥ ते वोघजैसेंसा- गरां ॥ आंतुंआलें ॥ २८॥ जैस्याआकारादिअक्षरा ॥ भेटतींपंन्नास- हीमात्रा ॥ तैसेंयाचराचरा ॥ दुसरें नाहीं ॥ २९ ॥ तैसेंतियेंईश्वरीं ॥ आंगोळीनुभेचिदुसरी ॥ किंबहुनासरोभरी ॥ श्रीशिवेंसीचि ॥ ३० ॥ ह्मणोनिज्ञानदेवो म्हणे ॥ अनुभवामृतेंयेणें ॥ सणुभोगिजसणें ॥ विश्वा- चेनि ॥ ३१ ॥ असा अनुभवांमृतग्रंथाच्या दहा ही प्रकणांतील सा रांश यथामतीनें योडक्यात कथन केला. आतां श्रीज्ञानेश्वरानी जे जे ग्रंथ केलें आहेत ; व ज्याज्या ग्रंथांची माहिती मिळाली आहे त्या त्या ग्रंथाजे सार्थ विवेचन केलें असतें परंतु स्थलसंकोच्यामुळें व ग्रंथ विस्ताराच्या भीतीनें करीत नाहीं. तर त्यात्या ग्रंथाचें कांहीं कांहीं वेचेमात्र खालीं लिहिलें आहेत. ओं० ॥ योगवाशिष्ट ॥ ओंनमो श्री अनादी ॥ जेथ कुंठित मन बुद्धी ॥ तेथ वाचेची उपाधी ॥ केउती लागे ॥ १ ॥ तुचि सकल बुद्धीचा दाता ॥ ह्मणोन गणेशु तत्वता ॥ सर्वार्थपुरविता ॥ तुचि होसी ॥ २ ॥ हे शब्द ब्रह्म सर्व ॥ तेचि मूर्ती

निरवयव ॥ जें रहीतरूप नांव ॥ मिरवत असे ॥ ३ ॥ जेथें स्मृतीचें अवयव ॥ देखा सर्वांगीक भाव ॥ तेथें लावण्याची ठेव ॥ अर्थ शोभा ४ अठरांहीं पुराणें ॥ तेंच सर्वांगीं भूषणें ॥ तेथें कांती शोभणें ॥ प्रमेय रत्नाची ॥ ५ ॥ ऐसिया गणेशा अनादी ॥ माया विद्या सिद्धिबुद्धी ॥ दर्शनें तुटती जीव संधी ॥ सांसारीक ॥ ६ ॥ असो आतां हा पस्तावो ॥ श्रोते म्हणतील केला वावो ॥ तरी कथानु संधान पहावो ॥ बोलिजे ते ॥ ७ ॥ जो तापसाचाराणीव ॥ श्रुतिसार कथक अभिन्नव ॥ तो ह्मणे वशिष्ट देव ॥ ऐक रामा ॥ ८ ॥ जे तिन्ही अवस्थेचे साक्षी ॥ जें दृश्य जात भक्षी ॥ तें तू लक्षी ॥ स्वरूप तुझें ॥ ९ ॥ जें ज्ञान निखळ ॥ जें शांतीचें महास्थळ ॥ तो तू आत्मा सोज्वळ ॥ निर्मायीक ॥ १० ॥

**श्रीज्ञानदेव कृत पासष्ठी** ॥ ओंवी० ॥ स्वस्तिश्रीवटेश॥लपोनि जगदाभासु ॥दावी मग ग्रासु॥प्रगटला करी॥१॥प्रगटे तंव तंव न दिसे॥लपे तव तव अभासें॥ प्रगट ना लपालासें॥ नखेमताहीं ॥ २॥ कोहं जंव जंव होय ॥ तंव तंव कांहीं न होय ॥ कांहीं न होऊनि उत हे ॥ आववोचि जो ॥ ३ ॥ सोने सोनपणाउणें ॥ न येताचि झालें लेणें ॥ न वेचतां जग होणें ॥ अंगें जया ॥ ४ ॥ कल्लोळाचें कंचूक ॥ न फेडितां उघडें उदक ॥ तेंवि जगेसी सम्यक् ॥ स्वरूप जो ॥ ५ ॥ परमाणू चिया मांदिया ॥ पृथ्वीपण नवचे याया ॥ तेंवि विश्वस्फूर्ती इया ॥ झोकवेना जो ॥ ६ ॥ कळाचेनिपांवुरणें ॥ चंद्रमाहारपू नेणें ॥ कां वन्ही दीपपणें ॥ आन नोव्हे ॥ ७ ॥ ह्मणोनि अवघे हें मिथ्या ॥ द्रष्टा दृश्यत्वें वर्तता ॥ तें मी ही नेणें आइता ॥ ऐसेंचि आहे ॥८॥ जैसें नाममात्राचि लुगडें ॥ एऱ्हवी सूतचि उघडें ॥ कां माती मृद्भांडें ॥ मातीच सत्य ॥ ९ ॥ तेंवि द्रष्टा दृश्य दर्शन ऐसें ॥ आतांत हा गमला दिसे ॥ तेंचि द्रष्टा दृश्य मिसे ॥ केवळ हा ॥ १० ॥ अलंकार येणें नामें ॥ असिजे निखिल हेमें ॥ ना अवेवसंभ्रमें ॥ अवेविया जेवी ॥ ११ ॥ तेंवि पृथ्वीवरी ॥ भासत ययाची थोरी ॥ प्रकाशे एकेसरी ॥ सविता हा ॥ १२ ॥ वांधि याचिया मोडी ॥ वांधा न होऊनि गुळाची गोडी ॥ तया परी नगपरवडी ॥ सेविती जाण ॥१३॥ नाहीं जे चित्र दाविती ॥ परी असिजे एकाचि भिंती ॥ प्रकार तें सं- [illegible]वती जगहाकारें ॥ १४ ॥ वडियाचे निअकारें ॥ प्रकाशे जेवि

अंबरें ॥ तेंवि विश्वस्फूर्ती स्फुरें ॥ स्फुरती हाची ॥ १५ ॥ श्रीज्ञानेश्वराचें स्वात्मज्ञान ॥ ओंनमोजी वक्रतुंडा ॥ कृपानिधी तू प्रचंडा ॥ परिपूर्णत्वें उदंडा ॥ परिवेगळाची ॥ १ ॥ मग नमो ते भारथी ॥ जें निजानंदे निज शांती ॥ जिणें अव्यक्त आणिले व्यक्ती॥सत्तामात्रें॥२॥ आतां नमू तो अरूप सद्गुरू॥जो पूर्णानंद अमृत करू॥जयाचे निकृपेचा निर्धारू॥कळे स्वरूपाचा॥३॥तो शिष्य समुदाईपियुषु॥कीं कृपेचा सुधारसु॥जयाचें अवलोकनें आयासु॥ चुकताती ॥४॥ तो सर्वदा मंगळ मूर्ती॥आणि नित्यानंदे नित्य तृप्ती ॥ आणि जयाचे वचनीवृत्ति ॥ स्थिरत्वे राहे॥५॥स्थिरा वृत्तिचें चिन्ह ॥आया नाहीं हो साधन ॥ जें वंदावें श्री चरण॥सद्गुरूचें॥६॥ईया निदानावरी॥गुरू असती घरोघरी॥मंत्र अगम्य कुसरी॥उपदेशावया॥७॥शिष्याचे लोभें करून॥उपदेशमात्र करिती जाण || परी शिष्याचें जन्ममरण ॥ चुकवी तो सद्गुरू॥८॥ तैसा माझा नव्हे निवृत्ती॥कीरु सखा बोले स्थिती ॥करुनि अकुळाची युक्ती ॥सामावली॥९॥तेथें शब्दाचें कारण॥वचेन सांगे उपदेश वीण॥सर्वांगेचि देखणें पण॥जयाचेनि॥१०॥अवस्था त्रयाचा देखणा॥तुर्यारूप आवसाना॥उन्मनी चिया मूर्छना॥ जाणता तो॥११॥ दशाचा होय निरासु॥ दर्शनाचा चुके आयासु॥दृष्टे पणें डोळसु ॥ तोचि सद्गुरू॥१२॥ गुरूचिया चरणारविंदा॥सुरवावे पावे दोंदा॥मागे सोडूनि आनंदा॥ परताचि होये॥१३॥ नेत्रापुढें जें धावतें॥असोनि चक्षूसी अतीत॥चक्षुरूपें जें वर्तत॥ते जोरूप॥१४ दशइंद्रियाचें वोडवणें ॥एकादशापै कारणें॥ययाचें समुह उथानें॥प्रभाषपै ॥१५ ॥ **श्रीज्ञानदेव कृत उत्तर गीता** ॥ ओं० ॥ ओं नमोजी गणेश्वरा॥उमाशंकराचिया कुमरा ॥ तारावया भवसागरा॥तूचि एक ॥१॥ तुझिया कृपा लीले ||ज्ञान दृष्टी पाल्हाळीले डोळे॥तेणें करून सर्व विवळे॥शिवशक्ती विचारणा ॥२॥ तारक ब्रह्मचा विवरू॥त्वंपद तत्पद शोधन करू॥असिपदाचा निर्धारू ॥ तुझेनिचिकीं॥३॥अज्ञान त्रिमिर सांजवेळे॥ज्ञान शलाका बुद्धीचें डोळे॥उघडूनि शुद्धचि विवळे॥प्रकाशवस्तु॥४ गुरुत्वं होसी दिवटा ॥आगम निगमाचिया वाटा॥शड दर्शनाचा चोहटा॥ दाखविसि हेळा॥५॥आधारा पासूनि सहस्त्रदळवरी ॥ पूर्व मार्गीची कुसरी॥पन्नास मात्रुकाचि भरोवरी ॥ शृष्टी रचनेची॥६ ॥ साताहि चक्राचा जपु ॥ ध्यान वर्ण दळी संकल्पु ॥ पूजा तर्पण निवेदन युक्त ॥ मंत्र

राज सहज ॥ ७ ॥ पश्चिमेचे सात चक्रवाट ॥ त्रिकूट श्रीहाट गोल्हाट॥ औठपीठ भ्रमर गुंफा चैतन्य नीट ॥ ब्रह्मरंध्र गुरु मुखें ॥ ८ ॥ ऐसा चौदा विद्येचा गोसावी ॥ अध ऊर्ध्व मध्य सावेवी ॥ सबाह्य अभ्यंतरी भक्ती भावी ॥ वंदिलासि तूं ॥ ९ ॥ जो कां आदि अंतु एकु ॥ ह्मणोनि बोलिजे विनायकू ॥ एकाचि नव पर्यंकू ॥ मायावी जाला ॥ १० ॥ शुन्यापासूनि धरितां ॥ रवांजणिया अखेंअख वाढवितां ॥ वाढली संसाराची वार्ता ॥ शृष्टीक्रम ॥ ११ ॥ परतोनि तोचि अंकु भांजिला ॥ अंके अंकु नाहीं जाला ॥ शुन्याचा ही ठाव पुसिला ॥ ब्रह्मविद्या कलापी ॥ १२ ॥ ऐसा शोधन क्रम साधू मुखें ॥ तें तूंचि जीवशीव विशेखें ॥ प्रपंच झडल्या मन सेखें ॥ असि पद सिद्धाचि ॥ १३ ॥ शिव शक्ती संन्निधानी ॥ एक एक ह्मणतां दोनी ॥ वोंकाराची वडणी ॥ काय सांगो ॥ १४ ॥ ब्रम्ह बीजा झालें चळण ॥ तेंचि वोंकार अक्षर वळण ॥ दोमिळणीचें लक्षण ॥ अगोचर तें ॥१५॥ अभंग ॥ **हरीपाठ॥**

देवाचियेद्वारी उभाक्षणभरी ॥ तेणें मुक्ती चारी ॥ साधियेल्या ॥ १ ॥ हरी मुखे म्हणा हरी मुखे म्हणा ॥ पुण्याची गणना ॥ कोण करी धृ० असोनि संसारी ॥ जिव्हे वेग करी ॥ वेद शास्त्र उभारी॥बाह्य सदां॥२ ज्ञानदेव ह्मणें व्यासाची ये खूणें ॥ द्वारकेचें राणें पांडवा घरीं ॥ ३ ॥ अं० २ चहू वेदीं जाण ॥ षड्शास्त्री कारण ॥ अठराही पुराणें ॥ हरिसी गाती ॥ १ ॥ मंथुनी नवनीता ॥ तैसें घे अनंता ॥ वायां व्यर्थ कथा सांडी मार्ग ॥ २ ॥ एक हरी आत्मा ॥ जीव शीव समा ॥ वाया तूं दुर्गमा ॥ न घाली मन ॥ ३ ॥ ज्ञानदेवा पाठ हरी हा वैकूंठ ॥ भरला घनदाट ॥ हरि दिसे ॥ ४ ॥ अभंग ३ रा ॥ त्रिगुण असार ॥ निर्गूण हें सार ॥ सारासार विचार ॥ हरी पाठ ॥ १ ॥ सगूण निर्गूण गुणाचें अवगूण ॥ हरिवीण मन ॥ व्यर्थ जाय ॥ २ ॥ अव्यक्त निराकार ॥ नाहीं ज्या अकार ॥ जेथूनि चराचर ॥ त्यासी भजे ॥ ३ ॥ ज्ञानदेवा ध्यानीं ॥ कृष्णनाम मनीं ॥ अनंत जन्मोनी ॥ पुण्य होय॥४॥ अं० ४ था ॥ भावे वीण भक्ती ॥ भक्ती वीण मुक्ती ॥ बळंवीण शक्ती॥ बोलूं नयें ॥ १ ॥ कैसेंनि दैवत ॥ प्रसन्न त्वरीत ॥ उगा राहे निवांत शिणसीवाया ॥ २ ॥ सायास करिसी ॥ प्रपंच दिननिशीं ॥ हरीसी न भजसी ॥ कोण्या गुणें ॥ ३ ॥ ज्ञानदेव ह्मणें हरी जप करणें ॥ तुटेल

धरणें प्रपंचाचें ॥ ४ ॥ अं० ९ ॥ योगयाग विधी ॥ येणें नोव्हे सिद्धी ॥ वायाची उपाधी ॥ दंभधर्म ॥ १ ॥ भावें वीण देव ॥ न कळे निःसंदेह ॥ गुरू वीण अनुभव ॥ कैसा चढे ॥ २ ॥ तपें वीण दैवत ॥ दिधल्या वीण प्राप्त ॥ गुजें वीण हीत ॥ कोण सांगे ॥ ३ ॥ ज्ञानदेव शांत ॥ तया दृष्टांत मत ॥ साधूचा सांगात ॥ तरुणोपाव ॥ ४ ॥ अभंग ६ ॥ साधू बोध झाला ॥ उरोनिया ठेला ॥ ठाईंच मुराला ॥ अनुभव ॥ १ ॥ कापुराची वाती ॥ उजळली जोती ॥ ठाईंच समाप्ती ॥ झाली जैसी ॥ २ मोक्ष रेखे आला ॥ भाग्यें विनटला ॥ साधूचा अंकिला ॥ हरी भक्त ॥ ३ ॥ ज्ञानदेवा गोडी संगती सज्जन ॥ हरी दिसे जनवन ॥ आत्म तत्वी ॥ ४ ॥ पर्वता प्रमाणे. पातक करणें ॥ वज्रलेप होणें ॥ अभक्तासी ॥ १ ॥ नाहीं ज्यासी भक्ती ॥ तो पतीत अभक्त ॥ हरीसी न भजत ॥ कवण्या गुणें ॥ २ ॥ अनंत वाचाळ ॥ बरळती बरळ ॥ त्या कैसे नि गोपाळ ॥ पावे हरी ॥ ३ ॥ ज्ञानदेवा प्रमाण ॥ आत्मा हा निधान ॥ सर्वांघटी पूर्ण ॥ एकनांदे ॥ ४ ॥ अं० ८ ॥ संताचें संमती ॥ मनो मार्गे गती ॥ आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ १ ॥ रामकृष्ण वाचा ॥ भाव हा जिवाचा ॥ आत्मा जो शिवाचा ॥ राम जप ॥ २ ॥ एक तत्वनाम साधिती साधन ॥ द्वैताचें बंधन न बांधिजें ॥ ३ ॥ नामामृत गोडी वैष्णवा लाधली ॥ योगिया साधली जीवन कळा ॥ ४ सत्वर उच्चार प्रऱ्हादीं बिंबला उद्धवा लाधला ॥ कृष्णदाता ॥ ५ ॥ ज्ञानदेव ह्मणे नाम हें सुलभ ॥ सर्वत्र दुर्लभ ॥ विरळा जाणें ॥ ६ ॥ असो **श्रीज्ञानेश्वरानीं** अभंग, डौर, मदालसा, दिवटा, अंधळें, पांगूळ, मुके, बहिरे, सौरी, वासुदेव, बाळ संतोष, पंचीकरण, आदी करून उपदेशपर, उपासनापर, आत्मपर व ज्ञानपर, अशीं बहुत प्रकरणें केलीं आहेत. त्याचा कांहीं कांहीं उल्लेख या ग्रंथांत दिला आहे.

॥ नवमोल्लासः ॥

श्री वि ठ्ठ ल

# ॥ श्रीज्ञानेश्वरायनमः ॥

॥ श्लोक ॥

**यस्यास्त्यतर्क्यं सुचरित्र मद्भुतं। स्तोतुं न देवाह्यपि शक्नुवंतिते ॥**
**कुतोमनुष्याः प्रभवोल्पबुद्धयः। समाधिस्थ मूर्ति भजे ज्ञानदेवं ॥१॥**

पहा! *श्रीज्ञानेश्वरानीं आपल्या स्वकपोल कल्पित् ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पासष्ठी, व कांहीं अभंग इत्यादि ग्रंथाच्या योगानें अनेक जडजीवांचा उद्धार केला. कितीएक विषयांध मनुष्य जगदीश्वराच्या उपासनेस लाविलें. किती एक मूढ लोकांस ज्ञान संपन्न केलें. कित्येकांचे संसारिक हेतु पूर्ण करून त्यांना आपल्या कृपा कटाक्षें करून जीवन्मुक्त केलें. जीं कृत्यें देवादिकांच्या हातून झालीं नाहींत व ज्यांचें कोठें वर्णन ही नाहीं व जीं पुढें होणार ही नाहींत अशीं, रेड्यांच्या मुखानें वेद बोलविणें, जड भिंतीनें मनुष्याप्रमाणें चालणें, मशीदीनें प्रत्युत्तर देणें, आणि मृत् जीवास जिवंत करणें, इत्यादि अनेक अद्भुत कृत्यें केलीं. आसों श्रीज्ञानेश्वरांच्या समाधिस्थ होण्याविषयीं सोळा वर्षाचें वयापासून नाद होता. याचें कारण असें आहें कीं ज्या वेळेस श्रीज्ञानेश्वर पैठणास, नेवाशास व पुलतांब्यास जाऊन तेथें अघटित कृत्यें करून पुनरपि अळंदींत परत आले त्यावेळेत त्यांच्या दर्शनास लांब लांबच्या देशाचे लोक येऊं लागले. त्या लोकांनीं श्रीज्ञानेश्वरास नमस्कार करून, कोणी ह्मणावें कीं महाराज! मला संतती केव्हां होईल? कोणी ह्मणावें कीं मला द्रव्य केव्हां मिळेल कोणी ह्मणावें कीं माझें लग्न केव्हां होईल? कोणी ह्मणावें कीं माझा

* ही कथा नामदेवानें आदीमध्यें, मत्सेंद्रसंहितेमध्यें, व भक्तितत्वांमृतामध्यें वर्णिली आहे. या विषयीं एकनाथाचे व निळोबाचे अभंग प्रमाण आहेत.

पुत्र बंदांतून केव्हां सुटेल ? याप्रमाणें लोकांनीं श्रीज्ञानेश्वरास अनेक रितीनें छळावें--कारण सर्व लोक आशाबद्धच आहेत, त्या योगानें श्रीज्ञानेश्वरास फार त्रास होऊं लागला. त्यानीं जनोपाधी असह्य झाल्यामुळें एकेदिवशीं श्रीगुरू निवृत्तीनाथास नमस्कार करून भाषण केलें कीं महाराज ! माझ्या मनांत एक हेतु आहे तो असा कीं आतां या जगतांत वास करणें पुरें झालें--कारण आपण जों जों वास. करूं तों तों जनांची उपाधी मात्र जास्त लागते; आणि त्या योगानें जगदीश्वराचें एकाग्र वृत्तीनें चिंतन होत नाहीं. ह्मणून कोठें तरी सुस्थळीं जाऊन समाधिस्थ बसावें. अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे; व आपणाकडे श्रीगुरूचें व वडील बंधूचें अशीं दोन नातीं आहेत, तर आपण स्वसंतोषानें समाधिस्थ होण्याविषयीं आज्ञा देऊन हा माझा हेतु पूर्ण करावा. पहा ! श्रीनिवृत्तिनाथ महाज्ञाते व मोठे ब्रह्मवेत्ते जरी होते तरी त्यांनां बंधु विरह जन्य दुःख झाल्या वाचून कधीं राहिलें नाहीं. श्रीज्ञानेश्वरांचे समाधिस्थ होण्याचें भाषण निवृत्तिनाथाचें अंतःकरणांत तीव्र भाल्या प्रमाणें लागलें; आणि मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन ते नेत्रांतून अश्रुगाळीतच ह्मणाले कीं ज्ञानेश्वरा! माझ्या अधीं तूं समाधिस्थ बसावें हें तुला चांगले दिसतें काय ? अरे ! अधीं मी समाधिस्त व्हावें आणि मागून तूं समाधिस्थ व्हावेस. असें असतां तूं हें असें कसें विपरीत भाषण करितोस, मला तरी तुझ्यावाचून या जगतांत दुसरे कोण आहे? अरे, मी तुझा वडील बंधु आहे. जेष्ट भ्राता पितुःसमः या वचनाप्रमाणें वडील बंधु ह्मणजे बापाप्रमाणें होय. आणि त्या वडील बंधूस दुःख समुद्रांत बुडवून आपण समाधिस्थ बसावें हें युक्त दिसतें काय ? तर जशी तूं मला समाधी घेण्याविषयीं आज्ञा मागतोस, त्याप्रमाणें माझीही तुला अशी आज्ञा आहे कीं, आणखी दोनवर्षेंपर्यंत तूं समाधिस्थ होऊ नये. ही आज्ञा श्रीज्ञानेश्वरानीं मान्य करून श्रीगुरु निवृत्तिच्या अंतःकरणास दुःख न देता ते त्यांच्या मनोनुकूल वर्तन करू लागले. त्याच दोन वर्षांमध्यें त्यांनीं तीर्थ यात्रा केल्या. पुढें श्रीगुरूच्या आज्ञेप्रमाणें दोन वर्षें पूर्ण झालीं, नंतर पुनरपि श्रीज्ञानेश्वरांनीं समाधिस्थ होण्याविषयीं निवृत्तिनाथाची प्रार्थना केली. त्या वेळेस तेथें सोपानदेव होते. सोपानदेवानेंही श्री-

ज्ञानेश्वरापासून आणखी दोन वर्षेंपर्यंत समाधी घेऊ नये असें वचन घेतलें. आपल्या उपदेशात्मक वाणीनें जगाचा उद्धार करीत असतां तींहीं दोन वर्षें पुरीं झाल्यावर मुक्ताबाईनें आणखी समाधी न घेण्याची मुदत दोन वर्षें वाढविली अशीं निवृत्तिनाथाची दोन वर्षें, सोपानदेवाची दोन वर्षें आणखी मुक्ताबाईची दोन वर्षें एकंदर सहा वर्षें आणि पूर्वीची सोळा वर्षें मिळून श्रीज्ञानेश्वरांचें वय बाविस वर्षांचें झाल्यानंतर त्याच वर्षीं ते निवृत्तिनाथादिकास बरोबर घेऊन आषाढाच्या महिन्यांत पंढरपुरीं श्रीविठ्ठलाची आज्ञा मागावयास गेले. त्याच्या अर्धीं पंढरपुरांतून रामराजानें श्रीविठ्ठलास अनागोंदीस नेलें होतें. पंढरपुरीं आषाढीचें यात्रेंकरितां नामदेव, गोरा कुंभार, सावता माळी, परिसा भागवत, कूर्मदास, कबीर, रोहिदास, चोखामेळा, सुरदास, भानूदास, धनजाट, नरहरी सोनार, दादू पिंजारी आदी करून बहुत संतमंडळी जमा झाली होती. इतक्यांत श्रीनिवृत्तिनाथ, श्रीज्ञानेश्वर सोपानदेव आणि मुक्ताबाई हेही पंढरपुरांत येऊन पोहचले. श्रीनिवृत्तिनाथ ज्ञानेश्वरादिकास पाहून सर्व संतमंडळींनीं साष्टांग प्रणिपात करून त्यांचा मोठा सन्मान ठेविला. ते नामदेवाच्या घरीं येऊन उतरल्यावर आषाढी एकादशीच्या दिवशीं निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर सोपानदेव, आणि मुक्ताबाई, हे चवघे व सर्व संतमंडळी राउळांत श्रीविठ्ठलाच्या दर्शनास गेली. तेथें जों पहातात तों श्रीविठ्ठल विटेवर नाहींत. हें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. शोध केल्यावर कांहीं वेळानें तत्रस्थ पूज्याऱ्याकडून अशी बातमी लागली कीं, श्रीविठ्ठलास रामराजानें आपले अनागोंदीस नेले आहे. तें वाक्य श्रवण करितांच सर्वांस मोठें दुःख झालें. त्या सर्व संतमंडळींमध्यें एक ऋग्वेदी ब्राह्मण पैठणक्षेत्रस्थ महा वैष्णव श्रीविठ्ठलाचा परम भक्त भानुदास या नांवाचा होता तो मात्र श्रीज्ञानेश्वरापाशीं प्रतिज्ञापूर्वक बोलून श्रीविठ्ठलास आणण्याकरितां अनागोंदीस गेला. तेथें त्यानें बहुत सायास करून शेवटीं तो शूळावरही जाण्यास तयार झाला. कथेचा अति प्रसंग होता ह्मणून भानुदासाचें कथानक देत नाहीं असो, अशा भगीरथ प्रयत्नानें तो श्रीविठ्ठलास घेऊन पंढरीस परत आला. या गोष्टीला त्याला चार महिने लागले. आषाढ शुद्ध एकादशीच्या दिवशीं पंढर-

पुरांतून जों निघाला तों श्रीविठ्ठलास बरोबर घेऊन कार्तिक शुद्ध दशमीच्या दिवशीं पुनरपि पंढरपुरास परत आला. श्रीविठ्ठलास पाहून सर्वांस मोठा आनंद झाला. सर्वत्रांनीं भानुदासाचे फार उपकार मानिले आणि त्याचा मोठा जयजयकार केला. मग कार्तीकी एकादशीच्या दिवशीं प्रातःकालीं श्रीविठ्ठलास थोरल्या रथावर बसऊन टाळ, वीणा, मृदंग, दिंडी, पताका, आणि मंगलवाद्यें इत्यादि मोठ्या समारंभानें मिरवत आणिले. आषाढीचा जो उत्साह राहिला तो सर्वांनीं कार्तीकमासीं केला. पूर्वीं सर्व संतमंडळी आषाढीचीच वारी करीत होते परंतु त्या दिवसापासूनच कार्तिकीची यात्रा भरूं लागली. द्वादशी, त्रयोदशी आणि चतुर्दशी असा तीन दिवस उत्साहाचा मोठा समारंभ होऊन पौर्णिमेच्या दिवशीं गोपाळपुरचा काला केला. प्रतिपदेच्या दिवशीं महाद्वाराचा काला करून सर्व संत जे निघणार तों इतक्यांत नामदेव प्रभृति सर्व साधूंच्या समक्ष ज्ञानेश्वरांनीं श्रीविठ्ठलाची अशी प्रार्थना केली कीं, महाराज! माझ्या मनांत समाधिस्थ बसण्याचा फार हेतु आहे; तर श्रीविठ्ठला तुह्मी व सर्व संतमंडळींनीं येऊन मला समाधिस्थ बसवावें, ही माझी सर्वांस विनंति आहे. हे शब्द ऐकतांच सर्वांच्या अंतःकरणास एकाएकीं धक्का बसल्यासारखा झाला. श्रीविठ्ठलाच्या नेत्रांतून अस्खलित अश्रु धारा वाहूं लागल्या. श्रीविठ्ठलांनीं ज्ञानेश्वरास विचारिलें कीं, ज्ञानेश्वरा! आपण अल्प वयांतच असें मनांत आणिलें हें काय? ज्ञानेश्वरांनीं उत्तर दिलें कीं, श्रीविठ्ठला! आतां या जगतांत राहून सोय नाहीं कारण लोकेषणाची उपाधी मात्र अधीक वाढते, आणि त्यायोगानें खरा परमार्थ कांहीं होत नाहीं. तर सर्वत्रांनीं कृपा करून एखाद्या सुक्षेत्रीं मला समाधिस्थ बसवावें असें आग्रहाचें वचन ऐकून श्रीविठ्ठलास व सर्व संतमंडळींस मोठें दुःख झालें, परंतु करतात काय? श्रीज्ञानेश्वराच्या आग्रहापुढें कांहीं उपाय नाहीं. श्रीज्ञानेश्वर सर्व साधूमध्यें ज्ञानानें, क्रियेनें, अधिकारानें आणि अघटित घटणात्मक शक्तीनें श्रेष्ठ असल्यामुळें त्याच्यापुढें कोणाचेंही भाषण चालेना. श्रीविठ्ठलानीं ज्ञानेश्वरास सांगितलें कीं, आपणास समाधिस्थ बसण्यास क्षेत्र अळंकापूर ( आळंदी ) हेंच उत्तम होय. कारण एक अनादी शिवक्षेत्र आणि दुसरें आपलें

जन्मस्थान तर असें सुक्षेत्र मिळायाचे नाहीं. हें वचन ऐकून श्रीज्ञानेश्वरास फार आनंद झाला. अधीं त्यांच्या मनांत अळंदींत बसण्याचें होतेच आणि त्यावर श्रीविठ्ठलाची आज्ञा मग काय विचारावें ? जसे अधींच साखर खाण्याची प्रीतिच आणि त्यांत वैद्यानेंही तीच खाण्यास सांगितली. मग काय ? जसा आनंद तसेच झाले. असो, श्रीविठ्ठलानीं सर्व साधूस आळंदीस निघण्याची आज्ञा केली. मग त्याच दिवशीं दोनप्रहरीं श्रीविठ्ठल, ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान, आणि मुक्ताबाई, नामदेव, गोराकुंभार, सावता माळी, कूर्मदास, सजन् कसाइ, रोहीदास, नरहरी सोनार, भानुदास आणि चेखामेळा इत्यादिक वे सर्व पंढरपुरांतून निघाले. मोठ्या आनंदानें श्रीविश्रीविठ्ठल नामाचा गजर करून मार्ग क्रमण करीत असतां पांच दिवसांनीं श्रीक्षेत्र अळंदी येथें येऊन पोहचले. • त्या सर्व साधू मंडळीस पाहून अळंदी ग्रामस्थ लोक परस्पर आपणांत बोलू लागले कीं अहो! हें काय आश्चर्य ! आज सर्व साधूंचा समुदाय उपास्य दैवत जे श्री विठ्ठल त्या सहवर्तमान येथें आला आहे, याचें कारण काय बरें असावें ? कोणी म्हणाले कीं ज्ञानेश्वर हे आपल्या बापाच्या पुण्यतिथीचा मोठा उत्साह करणार आहेत. कोणी ह्मणाले कीं छेः तसें नसेल. तर सर्व साधूंस श्रीज्ञानेश्वर हे मेजवानगी करून पोषाक देणार आहेत. याप्रमाणें ग्रामस्थ लोकांनीं कांहीं तरी कल्पना काढून भाषणें केलीं. त्या पैकीं एका मनुष्यानें नामदेवास विचारिलें कीं ही सर्व संत मंडळी कशा करितां आली, आणि यांचें येण्याचें कारण काय ? नामदेवानें उत्तर दिलें कीं श्री, ज्ञानेश्वर हे समाधिस्थ बसणार आहेत एव्हढ्याच करितां ही संतमंडळी सर्व जमा झाली आहे. तें वर्तमान त्या मनुष्यानें सर्व ग्रामस्थ लोकास श्रुत केलें. श्रीज्ञानेश्वर समाधिस्थ बसणार हें वचन ऐकतांच सर्वांस जें दुःख झालें त्याचें तर वर्णनच करितां येत नाहीं. असो एक दिवस झाल्यावर कार्तीक वद्य ८ मीचें दिवशीं श्रीविठ्ठलानीं श्री ज्ञानेश्वर समाधिस्थ बसणार ह्मणून तत्संबंधी मोठा उत्साह करण्यास आरंभ केला. तो असा कीं अगाध शक्ती जे श्रीविठ्ठल त्यानीं प्रथम विश्वकर्म्यास बोलाऊन इंद्रायणीच्या तीरीं महा विस्तृत् मंडप घालण्यास

आज्ञा केली. त्याचप्रमाणें गरुडास पाचारून ब्रम्हा, विष्णु, महेश, इंद्र, वरुण, कुबेरादिक देवास सहकुटुंब बोलवावे अशी त्यास आज्ञा केली; आणि अंजनीपुत्र जो मारुती त्यास सांगितलें कीं पृथ्वीतलांवर जितकें ऋषीगण तत्ववेत्ते पर्वताच्या दरींमध्यें तपाचरण करितात, कोणी आत्मचिंतन करितात व जे साधू बालोन्मत्त पिशाचवत् संचार करिताहेत त्यां सर्वांनां घेऊन ये. तसेच गोकुल मथुरे मध्यें जाऊन उद्धव अक्रुरादि यादवगणास, गोपगणास व रुक्मिणी आदिकरून माझ्या कुटुंबांस त्वरीत आण. असो, श्रीविठ्ठलाचे आज्ञे प्रमाणें विश्वकर्म्यानें इंद्रायणीच्या तीरीं एक क्षण न लागतां आत्युन्नत् महारमणीय मंडप तयार केला. त्या मंडपास रत्नखचित् उत्तम प्रकारचे स्तंभ लाविले आहेत. त्याजमध्यें नानाप्रकारची देव, दानव, यक्ष, सिद्ध, साध्य, ऋषिगणांचीं चित्रें काढिलीं आहेत. कांहीं स्तंभावर हंस, कारंडव, शूक, कोकिला, मैना, साळुंक्या इत्यादि चित्रांच्या मुखांत पाचूचे हार देऊन तीं आतांच बोलतील कीं काय ? अशी हुबेहूब रेखलीं आहेत. मंडपाच्या मध्यप्रदेशीं सुवर्ण मौक्तिकांचे घोस लोंबत आहत, ठिकठिकाणीं अनेक रत्नदीप लाविल्यामुळें सर्व मंडपांत सहस्र सूर्याप्रमाणें प्रकाश पडला आहे, असा सुशोभित मंडप पाहून श्रीविठ्ठलास व सर्व संतमंडळीस मोठा आनंद झाला. इतक्यांत गरुडानें स्वर्गाहून ब्रह्मा, विष्णु, शिव, इंद्रादि सर्व देवगण आणिले; व लक्ष्मी, पार्वती, सावित्री, इंद्राणी, तारा इत्यादि सर्व देवांगना आणिल्या. तसेच काश्यप, अत्री, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नी, वशिष्ठ, वामदेव, पराशर, व्यास, अगस्ती, कण्व, चवन भार्गव आदिकरून ऋषीगण लोपामुद्रा, आरुंधती, अनुसूया इत्यादि स्वकुटुंबा सहवर्तमान वायुपुत्रा बरोबर अळंकापुरीस येते झाले. इतक्यांत सनत्कुमार, जयविजय, उद्धव, अक्रूर, अंगद, नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, रुक्मिणी, राही, सत्यभामा, जांबुवती, नीला, इत्यादि सर्व मंडळी जमा झाल्या नंतर श्रीविठ्ठलानीं मंडळीच्या भोजनाची उत्तम व्यवस्था ठेवावी असें विश्वकर्म्यास सांगितलें. तदनुसार विश्वकर्म्यानेंही अनेक रीतीचीं पक्वान्नें तयार करवून सर्व देवगणादि ऋषि मंडळीस व साधू मंडळीस भोजन घातले. असा उत्साह होत असतां नवमी, दशमी गेल्यावर एकाद-

शीचे दिवशीं पूर्वोक्त सभामंडपांत देवगण, ऋषीगण, व साधूंचा समु. दाय बसला असतां नामदेवाचा वडील पुत्र नारायण या नांवाचा होता- त्यानें सर्वांस असा प्रश्न केला कीं अलंकापूर ( अळंदी ) हें क्षेत्र केव्हांपासून झालें या क्षेत्राचें मुख्य दैवत कोणते? व येथें कोण कोण तपस्वी तपाचरण करून सिद्ध झाले. हें सर्व मज दीनावर कृपाकरून सांगावें. श्रीज्ञानेश्वरादि सर्व संत मंडळी, ऋषीगण, आणि ब्रह्मा, विष्णु, आदीकरून देव हे सर्व सभेंत बसले असतां नामदेव पुत्राच्या प्रश्नावर कोणीही उत्तर दिलें नाहीं. नंतर श्रीविठ्ठलानीं अलंकापुर महात्म्य वर्णन करण्यास आरंभ केला. श्रीविठ्ठल भाषण करितात कीं पूर्वीं एके समयीं घोर तपाचरणामध्यें निमग्न होणारा मंत्रवेत्ते ऋषींचा अग्रणी साक्षात्शंकराचा अवतार आणि तमोगुणाचा केवळ पुतळाच कीं काय, असा दुर्वास ऋषी तो इंद्र लोकास गेला. देवेंद्र अप्सरे स- हवर्तमान ऐरावतावर बसून नंदनवनास क्रीडा करावयास जाणार तोंच मध्यें त्याची व दुर्वासाची गाठ पडली. दुर्वासास पाहून देवेंद्र ऐरा- रावताहून खालीं उतरला; आणि साष्टांग प्रणिपात करून दुर्वासाची शोडषोपचारें पूजा केली. स्वस्तिक्षेमाचें भाषण एक घटिकाभर करून मी नंदनवनास क्रीडा करावयास जात आहे असें ही कळविलें. शेवटीं दुर्वासानें आपल्या गळ्यांतील कमलपुष्पमाळा काढून इंद्राच्या कंठीं आर्पण केली; आणि सांगितले कीं इंद्रा ही माझी प्रसादिक माळा घे. या योगानें समरंगणीं शत्रुपासून तुला जयाचीच प्राप्ती होईल, यांत संशय नाहीं. असें बोलून दुर्वास तेथून निघता झाला. इंद्रही आपल्या ऐरावतावर आरूढ झाला. इतक्यांत इंद्रानें दुर्वासदत्त प्रसादमाला आपल्या कंठांतून काढून माहूताच्या स्वाधीन केली. माहुतानें ऐराव- ताच्या गंडस्थलावर ती माला ठेविली. ऐरावतानें आपल्या शुंडेनें ती गंडस्थलावरची माला भूतलावर आणून तिचें शतशः चूर्ण केलें. हें सर्व वृत्त दुर्वासानें दुरून अवलोकन केलें. अधीं तमोगुणाची मूर्तीच आणि त्यावर प्रसादमालेचा अपमान मग काय विचारावें। त्या कोपास तर पारावारच नाहीं. नंतर तो दुर्वासऋषी मोठ्या वेगानें कोपयुक्त होऊन इंद्राच्या अग्रभागीं आला; आणि भाषण केलें कीं मूर्खा, इतका सं- पत्तीनें उन्मत्त कां झालास? अरे! तुला ऋषिगणांची अगदीं परवाच

नाहीं. परंतु माझा अधिकार कसा आहे हे तुला माहीत नाहीं? मी तुला प्रसादिक माला दिली असतां त्या मालेचें ऐरावताच्या मालेनें चूर्ण केलेस असा माझ्या प्रसादाचा अपमान करणारा जो तूं शाप घेण्यास योग्य आहेस. थोडक्याच कालानें तुझे शत्रू समरंगणीं तुला जिंकून तुझी संपत्ति हरण करतील. असें बोलून तो दुर्वास जाता झाला. हें पाहून इंद्रानें ऐरावताहून उतरून दुर्वासास साष्टांग प्रणिपात केला; आणि उश्शापवचन मागितलें. दयाभूत होऊन दुर्वासानें असें सांगितलें कीं सहस्त्रवर्षे गेल्यावर तुला ब्रम्हा विष्णु महेशादि देवगण सहाय होऊन समुद्र मंथनाच्या वेळेस तुझी संपत्ति तुला मिळेल; आणि शत्रूंचाही पराजय होईल. इंद्रानें विचारिले कीं महाराज! तो कालपर्यंत मी काय करावें? दुर्वासानें उत्तर दिलें कीं मृत्युलोकीं जाऊन तूं शंकराची अराधना कर, असें बोलून दुर्वास निघून गेला. शापानुरूप समरंगणामध्यें बळीनें इंद्रास जिंकून त्याची सर्व संपत्ति हरण केली. **श्री विठ्ठल ह्मणतात** देव ऋषि गणादि सर्व संत मंडळी हो! नंतर त्या इंद्रानें मृत्यु लोकीं येऊन कांहीं दिवस चौर्य वृत्तीनें वास करून या **स्थळीं [ आळंदी येथें ]** एक शंकराचें लिंग केलें आणि प्रत्यहीं या नदीचें स्नान करून श्रीशंकराचें पूजन व ओं नमःशिवाय या पंचाक्षरी मंत्राचा सहस्त्रवेळा जप असें तप करण्यास आरंभ केला. देवांची सहस्त्र वर्षे पर्यंत इंद्राचें तप झाल्यावर एके दिवशीं श्रीशंकर इंद्रास सुप्रसन्न झाले. माझी संपत्ति मला मिळावी असें इंद्रानें वर प्रदान मागितल्यानंतर शंकरानें विष्णवादि देवांस साह्य करून नारदाच्या हातें बळीस उपदेश करून देवदानवानें मिळून समुद्र मंथन करावें असें ठरविलें. असो, समुद्र मंथन कसें झालें व त्या वेळेस देवास कोणती विघ्नें झालीं हा सर्व वृत्तांत भागवतादि ग्रंथांत प्रसिद्धच आहे, त्याचा येथें विस्तार करण्याचें कारण नाहीं. मग इंद्राची संपत्ति इंद्रास प्राप्त झाली व बळी आदी करून दैत्यांचा पराजय झाला. त्या सभेमध्यें सर्व देवगणासह वर्तमान इंद्र जर बसला होता तर त्यानें हें वृत्त कसें सांगितलें नाहीं असा प्रश्न निघेल तर यास उत्तर हेंच कीं ब्रह्म देवाच्या एका दिवसांत चौदा पुरंदर होतात; त्यामध्यें आळंदी येथें ज्या इंद्रानें तप केलें तो इंद्र या इंद्राच्या पूर्वीचा होय. तर य.स हें वृत्त कोठून माहीत

असणार ? असो, श्रीविठ्ठल ह्मणतात, अहो संत मंडळी हो ! त्या दिवसापासूनच हें अलंकापुर क्षेत्र प्रसिद्धीस आले. त्या इंद्राचे मनोरथ अत्रस्थ शंकराची पूजा करून सिद्ध झाले. ह्मणूनच या लिंगास श्री सिद्धेश्वर असें ह्मणतात. हे अळंदी क्षेत्राचें मुख्य दैवत होय. **इंद्रस्य अयनं यस्यां** ( या नदीच्या तीरीं इंद्राचें तप करण्याचें स्थान होय ) ह्मणून इला इंद्रायणी असें ह्मणतात. या क्षेत्रांमध्यें जे लोक तपाचरण करतील त्यांचे मनोरथ अलंददाति, ह्मणजे पुरे असें वचन होई तों पर्यंत पूर्ण होतात ह्मणूनच या क्षेत्रास " अळंदी " असें ह्मणतात. हें अळंदी क्षेत्र अनादि शिव पीठ आहे. या क्षेत्राची पंचक्रोशी अशी आहे कीं पूर्वेच्या बाजूस मर्कळ मुक्कामीं चतुर्भुज केशव राजाचें स्थान होय. दक्षिण बाजूस पुणें मुक्कामीं नागेश्वर महादेव होय पश्चिमेस इंदुरी ग्रामीं ब्रह्मेश्वर महादेवाचें स्थान होय. आणि उत्तरेस खेटक ग्रामीं [खिडास ] सिद्धेश्वर महादेवाचें स्थान होय. या प्रमाणें जे कोणी पंचक्रोशी करतील, त्यांचें अनंत जन्मींचीं पातकें भस्म होतील ही दक्षिण वाहिनी जी इंद्रायणी इचें स्नान जर केलें तर काशिप्रयागादि तीर्थांमध्यें कोटवेळा स्नान केल्याचें जें पुण्य तें पुण्य येथें प्राप्त होतें. या श्री सिद्धेश्वराचें जो नित्य अर्चन करील, त्यास अकल्प पर्यंत वैकुंठ किंवा कैलास प्राप्त होऊन ती शेवटीं ब्रह्मरूप होईल. या ठिकाणीं अजान वृक्ष आहे त्याची मुळी किंवा पत्र जो कोणी भक्षण करील तो सकल रोगापासून मुक्त होईल. किंबहुना फार काय सांगावें कीं या क्षेत्रांमध्यें योग यागादि अनुष्टान केलें असतां तो मद्रूप होऊन जीवन्मुक्त दशेप्रत पावेल. आतां इतकें होण्यास श्रद्धायुक्त भावना मात्र पाहिजे. हें माझें प्रतिज्ञा पूर्वक भाषण होय. या प्रमाणें श्रीविठ्ठलानीं अलंकापूर महात्म्य कथन केलें. तें ऐकून सर्व देवगणादि मंडळींनीं टाळी वाजविली. सर्वांना असें वाटलें कीं आज आह्मी या महात्म्य श्रवणानें कृतकृत्य झालों. असो, एकादशीचे रात्री नामदेवास कीर्तनास उभे करून हरी जागर केला. दुसरे दिवशीं ह्मणजे द्वादशीचे दिवशीं सर्वांचें भोजन यथास्थित झालें. संध्याकाळचें वेळेस श्री ज्ञानेश्वरांचा एक स्नेही कान्हू पाठक या नांवाचा केंदुर मुक्कामीं रहात होता, त्यानें श्री ज्ञानेश्वर समाधिस्थ बसणार व सर्व संत मंडळी

अलंकापुरी जमली आहेत, हें वर्तमान ऐकतांच तो द्वादशीचें संध्याकाळीं तेथें धावत आला. श्रीज्ञानेश्वराची व त्याची भेट झाल्या नंतर देवगणादि ऋषीगण मंडळीस पाहून त्यास परम आल्हाद झाला. सर्व मंडळींनीं त्यारात्री कान्हू पाटकासच कीर्तन करण्यास उभे करून त्याच्या हातें खिरापत करविली. खिरापत झाल्यावर श्रीज्ञानेश्वर श्रीविठ्ठलाच्या पुढें हातजोडून मोठ्या नम्रवाणीनें भाषण करितात कीं महाराज! आपण व सर्व संतमंडळी येऊन फार दिवस झाले. आतां हा उत्साह पुरे झाला. उदयीक प्रातःकालीं मला समाधिस्त बसविण्याची योजना करावी हें भाषण मान्यकरून श्रीविठ्ठलानीं श्रीज्ञानेश्वरास व कांहीं मंडळीस बरोबर घेऊन ते सिद्धेश्वराच्या वाम बाजूस सरोवराच्या काठीं आले. श्रीविठ्ठलानीं ज्ञानेश्वरास विचारलें कीं ज्ञानदेवा! ही अजानवृक्षाच्या छायेखालीं समाधिस्त बसण्यास जागा चांगली आहेना? श्रीज्ञानेश्वरानीं उत्तर दिलें कीं आपणास जी जागा पसंत पडेल ती मला मान्य आहे. मग श्रीविठ्ठलानीं तितक्या रात्रीं कांहीं मंडळीस सरोवराच्या काठीं एक गुहा करावयास सांगितली; आणि त्यागुहेचा प्रदेश दोन खणाचा असावा, व गुहेचेंद्वार सिद्धेश्वराच्या नंदीच्या दक्षिणबाजूस असावे, अशी ही अज्ञा केली. तदनुरूप त्या मंडळीनीं प्रातःकाल होईतो पर्यंत एक उत्तम प्रकारची गुहा तयार केली. मग त्रयोदशीच्या पहाटेस श्रीज्ञानेश्वर, देवगण, ऋषीगण, आणि सर्व संतमंडळी इत्यादि सर्वत्रांनीं इंद्रायणीच्या तीरावर स्नानें केलीं. सर्वांच्या नित्य क्रिया झाल्यानंतर श्रीज्ञानेश्वरानीं सर्वांची अशी प्रार्थना केली कीं विलंब न लावितां सर्वांनीं मला समाधिस्थ बसवावे.असें भाषण ऐकून मग मात्र सर्वांस फारच दुःख झालें ते सर्व इंद्रायणीच्या तीराहून निघून जेथें अजानवृक्षाच्या खालीं गुहा केली होती, तेथें आले. हें वर्तमान बाहेर गांवोगांवीं बहुतच पसरलें होतें,आणि त्रयोदशीच्या दिवशींच समाधिस्थ बसणार हें ऐकून त्यावेळेस गांवचे व परगांवचे लोक हस्तामध्यें पूजेचा संभार घेऊन आले. अशी बहुत लोकांची गर्दी झाली. नंतर श्रीविठ्ठलानीं एका रत्नखचित् सिंहासनावर श्रीज्ञानेश्वरास बसऊन स्वतः यथाविधी पूजन करण्यास आरंभ केला. श्रीज्ञानेश्वराचें भाळीं केशरीगंध लावून कंठामध्यें सुगंध पुष्पाचा हार आर्पण केला; आणि मुखाकडे अवलोकन

करितांच श्रीविठ्ठलाचा कंठ एकाएकी सद्गदींत होऊन नेत्रांतून ढळढळ अश्रुधारा वाहूं लागल्या तेथें रुक्मिणी जवळच उभी होती, तिजला श्रीविठ्ठल मोठ्या प्रेमानें सांगतात कीं रुक्मिणी! श्रीज्ञानेश्वरासारखा योगींद्र या ब्रम्हांडांत पुनरपि दृष्टीस पडावयाचा नाहीं. मागे म्हणजे कृत्, त्रेत, द्वापार या तीन युगांत सनत्कुमार, प्रल्हाद, नारद, अंबरीष, पराशर, मांधाता, भगीरथ, हरिश्चंद्र, नळ, व्यास, शूक, आणि शौनक आदिकरून बहुत साधू झाले, व पुढें ही पुष्कळ होतील, परंतु श्रीज्ञानेश्वर सदृश योगी, ज्ञानी, अद्वयानंद स्वरूपाचा अनुभवी आणि आपल्या तत्वज्ञानोपदेशाच्या योगानें अधिकारी व अनधिकारी या सर्व लोकांस जीवन्मुक्त करणारा असा पुरुष मात्र झाला नाहीं, व्हावयाचा नाहीं व पुढें ही होणार नाहीं. हा केवळ त्रैलोक्याची ज्ञान संजिवनीच होय. पहा ज्याच्या अद्वैत क्रियोत्कर्षानें रेड्यानें सांगवेदाचें पठण केलें; व भिंतीनें प्रत्युतर हीं दिलें. इत्यादि अवर्णनीय अद्भुत कृत्यें झालीं, किंबहुना अशा पुरुषाचें दर्शन जर झालें तर महापातकी लोकहीं पवित्र होतील. दर्शनानें मनुष्यास पवित्रत्व येईल यांत अधिक काय? परंतु अशा पुरुषाच्या चरण रजाभिवंदनें करून मलाही पवित्रपणा येतो मग इतराची कथा काय? हा सर्व तीर्थाचा तीर्थरूप आणि सज्जन वृंदांतील अग्रणी होय. श्रीज्ञानेश्वर या चतुराक्षरी मंत्राचा नित्य नेमानें जे लोक जप करतील, ते सर्व पातकापासून मुक्त होतील, यांत संशय नाहीं. असें प्रेम भरीत बोलत असतां श्रीविठ्ठल एकाएकीं शोकाकुलीत होऊन हंबरडा फोडून ह्मणाले कीं रुक्मिणी! आतां अशा पुरुषास समाधिस्थ बसवावे असें माझें धैर्य होत नाहीं परंतु काय! ज्ञानेश्वराच्या अग्रहापुढें उपाय नाहीं असो श्रीविठ्ठलानीं श्रीज्ञानदेवाची यथासांग पूजा केली. मग शंकर प्रभृती देवांनीं ही पूजा करून श्रीज्ञानदेवाचें स्तवन केलें, तसेच कश्यपादि ऋषींनींहीं पूजन केलें. उद्धव, अक्रूर, नामदेव, गोराकुंभार, सावतामाळी आदिकरून सर्व संतमंडळीनीं साष्टांग प्रणिपात करून श्रीज्ञानदेवाचें अर्चन केल्यावर मागाहून गांवच्या व परगांवच्या लोकांनीं ही पूजा केल्या. इतक्यांत शुकाचार्य, याज्ञवल्की, कपिल महामुनी, श्रीगुरूदत्त, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, आणि गैनीनाथ यांना श्रीज्ञानदेवाच्या समाधीचें वर्तमान

कळतांच हेही तेथें प्राप्त झाले. श्रीज्ञानदेवानीं शुकाचार्य प्रमुख महाब्रम्हत्तेवे व श्रीगुरुदत्त आदिकरून गुरू व परम गुरू या सर्वांना पाहून साष्टांग प्रणिपात केला, आणि भाषण केलें कीं आज या सर्वांच्या आगमानानें मी कृतकार्य झालों. माझ्या सारिखा धन्यया जगतींत कोणी नसेल. मग त्यांनीं शुकाचार्य, श्रीगुरूदत्त आदीकरून सर्व ब्रम्हवेत्यांची पूजा केली. त्याकालीं आकाश मार्गाचे ठायीं देवांच्या विमानांची एकच गर्दी होऊन गेली, हाहा हूहू चित्रसेन प्रमुख गंधर्व आणि रंभा, ऊर्वशी, तिलोत्तमा, मेनका इत्यादि गंधर्वांचीं व अप्सरांचीं गायनें सुरू झालीं. निर्जर, यक्ष, सिद्ध, साध्य, यांनीं विमानामध्यें बसून पुष्पवृष्टी करण्यास आरंभ केला. दशदिशा प्रफुल्लित होऊन गेल्या. बुक्का, पुष्पें, धूप, इत्यादिकांच्या योगानें चहूंकडे सुगंध सुटला आहे, देव, ऋषी, साधू, व कांहीं मंडळी, याजमध्यें श्रीज्ञानेश्वरांचा मोठा जयजयकार शद्ब झाला. याप्रमाणें त्या दिवशीं अलंकापुर ( आळंदी ) अप्सरांच्या मंडलरूप गायनें करून व मंडळीच्या जयजयकार शद्वें करून दुमदुमून गेली. त्यावेळेस श्रीज्ञानेश्वर वैकुंठवासी चतुर्भुज नारायणाप्रमाणें दिसूं लागले. असो श्रीज्ञानेश्वरानीं सर्व मंडळीस साष्टांग प्रणिपात करून मोठे प्रेम भरीत भाषण केलें कीं महाराज ! मी आतां समाधिस्थ बसणार, तर श्रीदत्त, शुकाचार्य प्रभृती सर्व संतमंडळींनीं मजवर कृपा ठेवावी. व या दासाकडून अधिकोत्तर व अमर्याद जीं भाषणें निघालीं असतील, त्याची क्षमा असावी, कारण मी सर्वांचें लेंकरू आहें. असें दीनवाणीचें भाषण ऐकतांच सर्वांचा कंठ सद्गदीत होऊन नेत्रांतून अश्रु बिंदू भूमीवर पडू लागले. इतक्यांत निवृति सोपान, मुक्ताबाई हे तिघे जवळ आले आणि हंबरडा फोडून निवृत्ति नाथ ह्मणाले कीं, ज्ञानदेवा ! सद्बघो ! आतां तुझा व माझा वियोग होईलना ? मला तुझा पूर्ण भरवसा होता कीं, तूं मला अधीं समाधिस्थ बसविशील आणि मग आपण बसशील, असें असतां बंधूराया असें कसें करितोस ? इतका मजवरती निष्ठूर कां झालास ? बंधूवियोगजन्यदुःख असह्य होऊन निवृत्तिनाथ अश्रु गाळीत ह्मणाले कीं, ज्ञानदेवा श्रीगुरू निवृत्तिदादा ह्मणून मला कोण हांका मारील ? ज्या वेळेस मला मांडे खाण्याची इच्छा उत्पन्न झाली, त्या वेळेस तूं आपल्या

पाठीवर ते मांडे जठराग्नी तप्त करून तयार केलेस; आणि माझी इ-च्छा पूर्ण केलीस, आतां तुझ्यावाचून माझी इच्छा पूर्ण करणारा दु-सरा कोण आहे ? असो, इतक्या कालांत सोपानदेव आणि मुक्ताबाई या दोघांनीं ज्ञानेश्वराच्या कठांत मिठी मारून उच्चस्वरानें भाषण के-लें कीं ज्ञानेश्वरा? आपण तर समाधिस्थ बसणार, परंतु आमची व्य-वस्था काय केली ? व आह्मांस कोणाच्या हातीं निरविले. ज्या वे-ळेस बाबा आणि आई बद्रिकाश्रमीं जावयास निघाले त्या वेळेस आह्मां दोघांना तुमच्या हातीं देऊन गेले. जातांना आईनें आपणास काय सांगितलें. त्या वचनाचें विस्मरण झालें कीं काय? अहो असा ज्ञानी बंधु अ-म्हांस तरी फार दिवस कोठून लाभणार कारण आम्हीच हतभागी आहोत. ज्या पुरुषाची संगती व्हावी ह्मणून ब्रह्मादिक देवही इच्छा करतात. त्याची संगती अह्माला सहज बंधुत्वाच्या नात्यानें प्राप्त झाली. बरें ती तरि पुष्कळ दिवस असावी किंवा नाहीं? परंतु आह्मीच भाग्यहीन पडलो त्यास उपाय काय? मुक्ताबाई मोठा अक्रोश करून ह्मणाली कीं अहो ज्ञानदेवा! आम्हाला सोडून तुह्मी समाधिस्थ बसणार कीं काय? अहो! माझ्यावर इतके निर्दय कां झाला? माझ्या उद्धट भाष-णाचा अपणास जर राग आला असेल तर त्याची क्षमा करावी. अहो आमच्या हातून आपली सेवा कांहींच झाली नाहीं. आम्हास आई, बाप, चुलते, काके हे सर्व आपणच आहात; आणि आतां आमची उपेक्षा करून आपण समाधिस्थ बसणार हें आपणास युक्त दिसतें काय? असें बोलून मुक्ताबाई मूर्च्छना येऊन पडते. हें पाहून श्रीज्ञानदे-वानीं मुक्ताबाईस व सोपानास आपल्या पोटीशीं धरून भाषण केले कीं सोपाना व मुक्ताबाई? तुह्मास सर्वस्वें पालन करणारा नारायण जगदीश आहे. त्याचें अनन्य भावानें चिंतन केलें असतां तो कधींहीं तुह्मास कोणत्या गोष्टींविषयीं कमी पडू देणार नाहीं. कारण सर्व जगताचा माता पिता तोच होय. असें बोलून सोपानाचा व मुक्ताबाईचा हात श्रीविठ्ठलाचे हातांत घालून सांगतात कीं श्रीविठ्ठला माझ्या मागे या दोघांची सांभाळ करण्याविषयीं काळजी आपण ठेविली पाहिजे, कारण यांना आपल्यावांचून दुसरा कोणताच आश्रय नाहीं. तर यांच्यावर वारंवार कृपादृष्टीनें अवलोकन करीत जावे. जसा इतक्या दिवसपर्यंत

माझ्यावर लोभ ठेविला त्याचप्रमाणें माझ्या मार्गें निवृत्ति दादावर व सोपान मुक्ताबाईवर लोभ ठेवावा.ही माझी आपणास विनंती आहे.असें बोलतात तों नामदेवाचा कंठ सद्गदित होऊन त्यानेंही श्रीज्ञानेश्वराच्या कंठांत मिठी मारून भाषण केलें कीं महाराज आपण!सर्वांची व्यवस्था केली व सर्वांना निरविलें परंतु माझी तजवीज काय केली ? तीर्थ यात्रेला जातांना मार्गांमध्यें माझें आपण तीर्थरूपा प्रमाणें संरक्षण केलें. व कधीं कधीं मार्गांत मला दुःख झालें असतां आपण तत्व ज्ञानोपदेशानें माझें शांतवन करावें. आणि आतांच माझ्यावर इतके निष्ठुर कां झाला ? मला तुमच्या वाचून क्षणभर ही चैन पडावयाचे नाहीं. या भव समुद्रांतून उतीर्ण करणारा मला तुमच्या वाचून श्रीगुरू दुसरा कोण आहे ! अशीं नामदेवाचीं प्रेम भरीत भाषणें ऐकून श्रीज्ञानदेव ह्मणाले कीं नामदेवा ! श्रीविठ्ठल हे तुझे सर्व प्रकारे ऋणी आहेत. तूं आपल्या सप्रेम भक्तिपाशानें याना बद्ध केले आहेस, आतां तुझे पालन करणारे सर्वस्वी श्रीविठ्ठलच आहेत. नंतर अशा शोक युक्त भाषणांनीं समाधिस्थ बसण्यास फार विलंब झाला, व अशीं भाषणें बहुत झालीं तरी संपावयाची नाहींत. तर त्वरा करावी असें मनांत आणून श्रीज्ञानदेवानीं सर्वांस साष्टांग प्रणिपात करून श्रीविठ्ठलास व शुकाचार्य प्रभृती गुरू परम गुरूस विचारून त्या गुहें मध्यें प्रवेश केला. तेथें कुशासन व मृगाजिन् घालून त्यावर पद्मासन विधीनें बसले; आणि अग्रभागीं ज्ञानेश्वरी, अमृत अनुभव, पासष्ठी, योगवाशिष्ठ, स्वात्मज्ञान, हरिपाठ आणि कांहीं अभंग इत्यादी स्वकपोल कल्पित पस्तकें ठेविलीं. त्या वेळेस आकाशामध्यें देवांनीं दुंदुभीचा नाद करून पुष्पवृष्टी केली. नंतर श्रीज्ञानदेवानीं श्रीगुरूचें व. श्रीविठ्ठलाचें नामस्मरण करून प्राणापान वायु रोधानें सर्व इंद्रियद्वारें बंद केली; आणि आपण त्रिकुट, गोल्हाट, औठपीठ, ब्रह्मरंध्र, भ्रमर गुंफा आणि सहस्त्रदल इत्यादि षड्चक्राच्यावर जाऊन ब्रह्मतेजांत निमग्न झाले. हें पाहून देव ऋषिगणादी व सर्व संत मंडळींनीं श्रीज्ञानदेवो जयति अशा नामांचा एकसारखा जयजयकार करून टाळी वाजविली. मग त्या गुहेमध्यें अखंड प्रकाश असावा म्हणून श्रीविठ्ठलानीं विश्वकर्म्याकडून सुप्रकाशित चार रत्नदीप लावविले. आणि श्रीज्ञानदेवाच्या मस्त-

कावर गंध अक्षतादि पुष्प तुलसीपत्रें समर्पण करून साष्टांग प्रणिपात केला. तद्वत् सर्व मंडळींनींहीं नमस्कार करून श्रीज्ञानदेवाचें स्तवन केलें. नंतर श्रीविठ्ठलानी एक पाषाणमय चिरा बसवून त्या गुहेचें द्वार बंद केलें. मग श्रीविठ्ठल आदिकरून सर्व संत मंडळी तेथून निघून इंद्रायणीच्या तीरावर आली. सर्वांनीं श्रीज्ञानदेवाच्या प्रीत्यर्थ बहूत शोक केला. श्रीविठ्ठलानी श्रीज्ञानदेवाचे जन्मापासून सर्व कथानक संत मंडळीस निवेदन केले. श्रीविठ्ठल म्हणतात कीं सर्व जनहो या ज्ञानदेवाची योग्यता काय वर्णन करावी? असा लोकोपकारी योगींद्र पुनरपि दृष्टीस पडावयाचा नाहीं. जो याची प्रत्येक कृष्णपक्षाच्या एकादशीस यात्रा करील तो सकल पूर्वजाचा उद्धार करून सायोज्यतेप्रत पावेल. म्हणून सर्वत्रांनीं शुद्ध एकादशीस पंढरपुरांत यावे आणि कृष्ण एकादशीस आळंदीस यावे. ज्यास शुद्ध एकादशीस पंढरपुरीं येण्याचे घडत नसेल त्यानीं आळंदीस येऊन श्रीज्ञानदेवाचें दर्शन घ्यावें. कारण हें क्षेत्रकाशी प्रयागादि तीर्थाहून श्रेष्ठ होय, किंबहुना भूवैकुंठ जे पंढरपूर त्याहूनही उत्तम आहे. श्रीज्ञानदेव हे लोकांच्या पातकरूप पर्वतास भेद करण्याकरितां वज्रच निर्माण झालें कीं काय? पूर्वी द्वापारयुगाचे अंतीं कृष्ण अवतार समाप्त झाल्यावर व धर्मराज आदिकरून पांडव निजधामास गेल्यानंतर कलियुगाच्या प्रारंभीं जन्मेजय राजानें राज्य केलें. त्याच्या मागें पुण्यशील जो विक्रम राजा त्यानें हीं आपला शक बराच गाजिवला. त्या नंतर पैठणा मध्यें शालिवाहन या नांवाचा राजा शककर्ता झाला. त्याच्या शकांत भोजराजा मोठा पुण्य पुरूष होऊन गेला. नंतर यवनी राज्य होऊन सर्व वैदिकी धर्माचा तर लयच होत चालला; त्या योगानें सर्व लोक पापसमुद्रांमध्यें बुचकळ्या मारूं लागले. मग वैदिकी धर्माची स्थापना व्हावी किंवा सर्व जीवांनीं पातका पासून मुक्त व्हावे ह्मणून ब्रम्हा, विष्णु, महेश आणि आदिशक्ती हे निवृत्ति ज्ञानदेव सोपान आणि मुक्ताबाई यांच्या रूपानें अवतीर्ण झाले. तर जे लोक यांचें नामस्मरण करतील ते सर्व दोषापासून मुक्त होतील. आतां प्रत्येक कृष्ण पक्षाच्या एकादशीस मी स्वतः श्रीज्ञानदेवाच्या दर्शनास येत जाईन असें श्रीविठ्ठलाचें भाषण ऐकतांच श्रीज्ञानदेवाचें दर्शन घेत जाऊ.

असेंच सर्व मंडळींनीं सांगितलें. असो, त्या दिवशीं भोजनाचा व कीर्तनाचा समारंभ ही उत्तम झाला. सर्वत्रांनीं आळंदी मध्यें दोन दिवस पर्यंत वास्तव्य केलें. श्रीज्ञानदेवाच्या वियोगानें नामदेव फार व्याकूल झाला म्हणून श्रीविठ्ठलानीं त्याचें शांतवन करून त्यास पुनरपि श्रीज्ञानेश्वराचें दर्शन दिलें. या प्रतिपदेच्या दिवशीं श्रीविठ्ठलादीक सर्व जाण्यास निघाले. तो इतक्यांत निवृत्ति सोपान आणि मुक्ताबाई या त्रिवर्गांनी सर्वांची अशी विनंती केली कीं ज्ञानेश्वराच्या समाधीच्या वेळेस जशी सर्वत्रांनीं येण्याची कृपा केली त्याप्रमाणें आमच्या समाधिस्थ होण्याच्या वेळेस हीं सर्वत्रांनीं यावे. हें भाषण सर्वांनीं मान्य केलें. नंतर निघते वेळेस श्रीविठ्ठल म्हणतात कीं सर्व भक्तजनहो ! श्रवण करा. आतां श्रीज्ञानदेवाच्या समाधीचा उत्साह आपण आठ दिवसपर्यंत केला तर जे लोक कार्तिक वद्य ८ मीस नवमीस व दशमीस श्रीज्ञानदेवाचें नाम स्मरण करतील व दर्शन घेतील ते निश्चये करून अकल्पदर्यंत वैकुंठा वास करतील. एकादशीच्या दिवशीं हरी जागर द्वादशीच्या दिवशीं खिरापत, त्रयोदशीच्या दिवशीं काला आणि चतुर्दशी अमावास्येस श्रीज्ञानेश्वराचें जन्मापासून समाधीपर्यंत चारित्र श्रवण व अजान वृक्षाच्या खालीं भजन इतक्या गोष्टी जे पुरूष आलंकापुरीं येऊन करतील त्यांना अगणित यज्ञाचें पुण्य मिळून ते अखंड सच्चिदानंद स्वरूप होतील हें माझें प्रतिज्ञापूर्वक भाषण होय. इतक्यांत आकाशवाणी अशी झाली कीं, सर्व जनहो ! या कलियुगामध्यें श्रीज्ञानदेवाच्या समाधी दर्शनें करून व श्रीज्ञानदेव या पंचाक्षरी मंत्र जपें करूनच सकल जीवास मुक्ती प्राप्त होईल अशी अशरीर वाणी ऐकून सर्वत्रांनीं टाळी वाजविली. असो असा सोहळा होऊन श्रीविठलादिक मंडळी आपआपल्या स्थानाप्रत निघून गेली. याप्रमाणें श्रीज्ञानेश्वराच्या समाधीचा समारंभ शके १२१८ कार्तिक वद्य त्रयोदशी ते दिवशीं प्रातःकालीं झाला. पुढें कांहीं दिवस गेल्यानंतर शके १२१९ वैशाख शुद्ध एकादशीच्या दिवशीं सोपानदेव यानीं सासवड येथें समाधी घेतली. शके १२२० वैशाख वद्य एकादशीस मुक्ताबाई यानीं तापी नदीच्या काठीं समाधी घेतली; आणि त्याच वर्षी पौष वद्य एकादशीस श्रीनिवृत्तिनाथ त्र्यंबकेश्वरीं समाधिस्थ झाले. निवृत्तिनाथ,

सोपानदेव आणि मुक्ताबाई यांच्या समाधीचा समारंभ श्रीज्ञानेश्वराच्या समाधि समारंभाप्रमाणेंच झाला. श्रीज्ञानेश्वराचे समाधि समारंभास जसा संत मंडळीचा जमाव, कीर्तन भजनाचा थाट, व ब्राम्हणादि संत मंडळीस भोजन इत्यादि उत्साह ज्याप्रमाणें झाला होता, तो तसाच पुढें तुकारामाचा अवतार समाप्त होईपर्यंत चालू होता. परंतु पुढें त्याचें मान हयबतराव या नांवाचे साधूचें अलंकापुरीं अगमन होई तोपर्यंत कमी झालें होतें. हयबतराव हे सातारकर महाराजाचे पदरीं सरदार होते. परंतु कांहीं कारणानें वैराग्य उत्पन्न होऊन त्यानीं सर्वस्वाचा त्यागकरून अलंकापुरीं अखंड वास्तव्य केलें. त्याना श्रीज्ञानेश्वर महाराजांचा साक्षात्कार झाला होता असें ऐकण्यांत आहे. ते मोठे ज्ञानी, भक्तिमान् आणि वैराग्य संपन्न असे होते. श्रीज्ञानेश्वराचा उत्साह तुकारामाच्या मागे कमी झाला हे पाहून त्यास फार वाईट वाटले. मग त्यानीं लागलेच पूर्ववत् उत्साह व प्रत्येक एकादशीस यात्रा सुरू करून श्रीज्ञानेश्वराच्या पालखीचा सोहळा ही बराच जास्त वाढविला. ज्याप्रमाणें अलंकापुरीं प्रति वर्षीं कार्तिकमासीं वद्य एकादशीस यात्रा भरत असते, त्याचप्रमाणें त्र्यंबकेश्वरीं श्रीनिवृत्तिनाथाची समाधी संन्निध व सासवडीं सोपानदेवाच्या सन्निध आणि तापी नदीच्या काठीं वटेश्वरीं मुक्ताबाईचे सन्निध प्रतिवर्षी त्यांच्या समाधिस्थ होण्याच्या तिथीस बरीच यात्रा जमते. हैबतराव बाबा यानीं श्रीज्ञानदेवाच्या भजन कीर्तनाचा व पालखीचा समारंभ जसा वाढविला तो तसाच अद्यापी चालू आहे. किंबहुना तो भजन कीर्तनाचा समारंभ उत्तरोत्तर जास्त वाढत चालला आहे.

# परिशिष्ट.

## श्रीज्ञानेश्वर महाराज यांचे पूजेचे संबधानें हकिकत.

कितीएक लोकांचें म्हणणें असें आहे कीं, श्रीज्ञानेश्वर महाराजांची पूजा ही ब्राम्हणाकडे असोन, त्याकामीं श्रीमंत महादजी सिंदे पाटील याणीं गुरवाकडील पक्ष घेऊन, अन्यायानें ब्राम्हणाकडून पूजा काढून गुरवास करावयास सांगितली. व सर्व हिंदुस्थानामध्यें शहाण-पणाचें कामीं नावाजलेले राज्यकार्यधुरंधर असे जे नाना फडणवीस याचेंही या कामीं मस्तक फिरून अन्याय पूर्वक गुरवास मदत मिळाली, असें म्हणतात. परंतु नाना फडणविसासारख्या सुज्ञ पुरुषावर, व कारस्थानांत प्रवीण पाटील बावावर असा अक्षेप करणें म्हणजे काव-ळ्यांनीं गरुडाच्या उड्डाणास तिरस्कृत करण्यासारखें होय.

पूर्वीं शके १७०१ विकारी नाम सवंत्सरे माहे अश्वीन शुद्ध ७ छ० ६ सव्वाल रोजीं कृष्णाजी बीन गोपाळजी गुरव गोसावी सासवडकर, या उभयतांचा वाद लागला होता. त्यावेळीं पाटील बावा याणीं उभयतांच्या मस्त-कावर बुक्का व तुळसी ठेऊन पुरावे विचारले, श्री सिद्धे-श्वर महादेव याची पूजा पूर्वीपासून गुरवच करीत आले आहेत. तदन्वयें श्रीची समाधीची पूजा सदरी लिहि-लेले पूजारी हेच करितात असें विषयीं चिंचवडकर देव व तुकाराम यांचा वंशस्थ खंडुजी गोसावी देहुकर, कान्हु पाटक केंदूरकर यांचें वंशस्थ दामोदर राजपाटक व आ-ळंदीकर देशमुख व देशपांडे व पाटील व कुलकर्णी व बारा बलुते मंडळी आणि बारा गांवचे लोक या सर्वांनीं आपले बेच्याळीस स्मरून श्रीची समाधीची पूजा गुरवच करीत आहेत अशाविषयीं साक्षी दिल्या आहेत. व सा-सवडकर ब्राम्हणाकडून पूजेविषयीं विशेष पुरावा झाला

नाहीं. सनदापत्र माझे जवळ नाहीं, व ज्या ठिकाणीं ठेविलें होतें त्या ठिकाणाहून हरवलें. असा लेख सासवडकर यानें गुरवास लिहून दिला आहे त्या अन्वयें श्रीमंत महादजी सिंदे पाटील याणीं श्री.च्या समाधीची पूजा वंशपरंपरा गुरवांनीं करावी. सासवडकर ब्राम्हण यांचा मुळींच संबंध नाहीं असें यथान्यायें ठराव करून तो गुरवास दिला आहे आणि मी पुराव्यांच्या भागांत खोटा आहे व जिकलों गेलों, असें यजित पत्र व खोटें पत्र सासवडकर ब्राम्हणानें स्वदस्तुर लिहून दिलें आहे.

श्रीमंत राजाराम महाराज छत्रपति व श्रीमंत बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब प्रधान याणीं श्रीज्ञानेश्वरास पूजा व नैवेद्य व नंदादीप वगैरे खर्चाकरितां सनदा दिल्या आहेत त्या सनदा येणें प्रमाणें—

॥ श्री ॥

शिक्का.

स्वस्तिश्री राज्याभीषेक शके १८ प्रजापती नाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध ३ रविवासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजाराम छत्रपति यांणीं राजेश्री बाळाजी नारायण देशाधिकारी व लेखक प्रांत जुन्नर यासी आज्ञा केली ऐसीजे ज्ञानेश्वरस्वामींची समाधी मौजे आळंदी तर्फ चाकण परगणे मजकूर येथें आहे त्या समाधीस्थळीं पूजा पुनस्कार

चालला पाहिजे म्हणोन कैलासवासी महाराज व कैला-
वासीं मातोश्री जिजाऊ व कैलासवासी राजेसाहेब आप-
आपले वेळेस नियत करून दिला तेणेंप्रमाणें श्रीस्वामी-
ची पूजा सांग चालत आली त्या उपरीतांग्रहाचें अवंत-
राकरितां भोगवटा तुटला आहे ऐशीयास पूर्वीं मोहीने
प्रमाणें चालवावें व स्वामिंनीं आपल्याकडूनही विशेष
मोहीन करून देऊन यथासांग पूजा पुनस्कार चालावया-
स स्वामिनीं आज्ञापत्र करून देवविलें पाहिजे म्हणोन
मोरो भास्कर कुलकरणी मौजे मजकूर यांणीं चंदीं मुक्कामीं स्वा
मीसन्निध येऊन विनंती केली. त्यावरून मनास. आणितां
श्रीस्वामीचे सिद्धस्थान या स्थळीं बहुत साक्षात्कार आहे
येथें पूजा पुनस्कार यथाकाळ चालले पाहिजेत. या नि-
मित्त पूर्वीं कैलासवासी त्रिवर्ग नेहमीं पूजेस नियत करू-
न दिधला आहे तेणेंप्रमाणें चालवावें या वेगळे स्वामीं-
नीं आपल्याकडून मोहीने पूजेस करून दिले आहे. पूर्वीं
व हल्लीं मोहीने बितपसील. * *

शिक्का.

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राज-
मान्य राजेश्री बाळाजी पंडीत तालुका मोकदम मौजे आ-
ळंदी तालुका चाकण प्रांत जुन्नर सूरसन अरबैन खमसेन
मया व अल्लफ मौजे मजकूर पेशजीं महाराज कैलासवा-
सीं छत्रपती स्वामी यांणीं समाधीस्थ वास्तव्य मौजे मज-

कूर यांच्या पूजा नैवेद्यास व नंदादिपास वगैरे खर्चास वेगमीबद्दल मौजेमकूर कुलबाब कुलकानु श्रीकडे इनाम करार करून देऊन इनामपत्रें करून दिलीं आहेत त्यास इनामपत्राप्रमाणें गांवचा ऐवज श्रीकडे चालत नाहीं-चवथाईचा मात्र ऐवज श्रीकडे पावतो तेवढ्या ऐवजांनीं श्रीच्या संवस्थानाचा खर्च चालून पूजा अर्चा यथास्थित चालत नाहीं. हें वर्तमान श्रुत झालें त्यावरून हल्लीं श्रीची पूजा नैवेद्य व नंदादीप वगैरे चालविला पाहिजे. राजेश्री स्वामीस व स्वामीच्या राज्यास श्रयस्कर हें जाणून मौजे मजकूर स्वराज्य व मोगलाई व सरदेशमुखी व बाबती व साबोत्रा व सरपाटीलकी व इनामपट्टी वगैरे कुलबाब कुनकानु हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खातें हक्कदार व इनामदार करून तेथील वेठ बिगार मौजेमजकूर श्रीकडे इनाम करार करून दिला आहे तरी तुम्ही श्रीशीं रुजू मौजेमजकूरचा अम्मल दरोबस्त श्रीकडे चालवित जाणे प्रतिवर्षीं नूतन पत्राचा आक्षेप नकरणें पत्राची प्रति लिहून घेऊन अस्सल पत्र भोगवट्यास परतून देणें जाणिजे छ २७ सफर आज्ञा प्रमाण.